पादक व प्रसारक मंडळीची ग्रंथमाला-ग्रंथ ९ वा.

# दुर्गेशनंदिनी

अथवा



# किल्लेदाराची मुलगी.

एक ऐतिहासिक बोधपर कादंबरी.)

लेखक,

रा. रा. शिवराम गोविंद फाळके, त्र्यंबककर.

शिवछत्रपति ' आणि ' शास्त्र व कला ' ह्या पुस्तकांचे कर्ते.

प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी,

प्रिंटर्स, पब्लिशर्स व कमिशन एजंट्स्—मुंबई.

आवृत्ति दुसरी.

मुंबई ' इंदुप्रकाश ' स्टीम प्रेसमध्यें छापिली.

सन १९१०.

किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.



हिंदुस्थानांत आजपर्यंत जे जे म्हणून कादंबरीकार होऊन गेले, त्या सर्वांत राय बंकिमचंद्र चट्टोपाध्याय बहादूर ह्याच्या इतका जबरदस्त लेखक एकही झाला नाहीं. बंगाली भाषेची उन्नति ह्याच्याइतकी कोणींच केली नाहीं, व लिहिण्याची पद्धतीही ह्याच्याइंतकी कोणींच सुधारली नाहीं. तद्देशीय व तत्कालीन लेखकसमूहाचे निरुपयोगी व क्षीणायु लेखांवर त्यानें जी कडक टीका केली आहे, तिच्या योगानें त्यानें आपल्या लोकांच्या चालचलणुकींत व समजुतींत जीं व्यंगें व चुका आहेत; त्यांचें कोणासही न भितां जें आपल्या लेखांत आविष्करण केलें आहे, त्यामुळें, व आपल्या धर्मांत जे कांहीं अशुद्ध व भ्रममूलक दोष शिरले आहेत, व त्यामुळें जीं कांहीं नुकसानें होत आहेत; त्यांचा आपल्या ग्रंथांत जो स्फोट केला आहे, त्यामुळें, बंगसाधनाचे इतिहासांत एक मोठा जबरदस्त फेरफार होऊन राहिला आहे.

तो स्वतः जंगी लेखक होता. त्याचे ग्रंथांत वर्णनचातुर्य फारच उत्तम दृष्टीस पडतें, व त्याचप्रमाणें त्यांत मानवी चरित्रांचीं व स्वभावांचीं चित्रेंही फारच मनोरम काढलेलीं असल्यामुळें वाचकाचे मनांवर त्यांचा उत्तम ठसा उठून, त्यास जागजागीं उत्तम तऱ्हेचें शिक्षणही मिळतें. त्याचा पहिला ग्रंथ म्हणजे ही आमची 'दुर्गेशनंदिनी,' त्यानें इ. स. १८६४ सालीं लिहिली. आमच्या ग्रंथकाराचे अगदीं प्रारंभींचे सर्व ग्रंथ ऐतिहासिक आणि सामाजिक विषयांवरच होते. ह्याचा कादंबऱ्यांपैकीं 'विषवृक्ष,' 'दुर्गेशनंदिनी,' 'कपालकुंडला' व 'कृष्णकांतेर उइल' ह्या चार कादंबऱ्यांचीं इंग्रजी भाषेंत भाषांतरें झालीं आहेत. ह्या

भाषांतरांपैकीं 'विषवृक्ष' व 'कृष्णकांतेर उइल,' ह्या दोन कादंबऱ्यांचें भाषांतर नॅशनल इंडियन असोसिएशन ह्या संस्थेच्या सेक्रेटरी, व हिंदुस्थान व त्यांतील लोक यांच्या जबरदस्त कैवारी, व हिंदु लोकांच्या सामाजिक कल्याणासाठीं सतत झटणाऱ्या, मरिअम् एस्. नाइट, ह्या बाईनीं केलें आहे. 'कपालकुंडला' ह्या ग्रंथाचें भाषांतर सी. क्लेम ह्या साहेबांनीं तर जर्मन भाषेंतही केलें आहे, व तें लेप्झिग येथें इ. स. १८८६ त छापून प्रसिद्ध झालें आहे.

बंगाली लोकांनांच ह्या आमच्या ग्रंथकाराचे ग्रंथ परमप्रिय झाले आहेत असें नाहीं, तर ह्या ग्रंथकाराच्या कांहीं ग्रंथांचीं भाषांतरें हिंदी, गुजराथी व मराठींतही झालीं आहेत.

ह्या ग्रंथकाराचे वयाचे उत्तर भागांत म्हणजे सुमारें दहाबारा वर्षांपूर्वीं हिंदुधर्माच्या न[illegible] सुधारलेल्या पद्धतीचें चालकत्व ह्यानें आपल्या हातांत घेतलें होतें, व भगवद्गीतेंतील अत्युत्तम विचाररत्नांची माला गुंफून आर्यबंधूंच्या गळ्यांत घालण्याच्या कामांत त्याचा दीर्घ यत्न सुरू होता. ह्या ग्रंथकारानें लिहिलेलें 'कृष्णचरित्र' हें त्याच्या सर्व ग्रंथांत अत्युत्तम आहे, असें पुष्कळ मोठमोठ्या लोकांचें मत आहे. ह्या 'कृष्णचरित्रा' ची पहिली आवृत्ति इ. स. १८८६ त 'प्रचार' नामक मासिकपुस्तकांतून छापून प्रसिद्ध झाली होती, ती संपल्यावर दुसरी आवृत्ति काढली; पण तीही संपून गेल्यामुळें ग्रंथकारानें आपले वयाचे अगदीं शेवटले दिवस ह्या ग्रंथाची तिसरी आवृत्ति काढण्यांत घालविले असें म्हणतात. ह्या तीनही आवृत्तींचें परिशीलन केलें असतां आपणांस असें दिसून येईल कीं, प्रत्येक आवृत्तींत ग्रंथकाराचें मतांतर झालें आहे.

तो आपल्या ह्या ग्रंथाच्या तिसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेच्या शेवटीं असें लिहितो कीं, ' शेवटीं मला एवढेंच सांगणें आहे कीं, श्रीकृष्णाचें ईश्वरत्व प्रतिपादन करण्याचा ह्या ग्रंथाचा उद्देश नाहीं; त्याचे मानवचारित्राचीच समालोचना करण्याचा माझा उद्देश आहे. श्रीकृष्ण हा ईश्वरच खरा होता, असा माझा पूर्ण विश्वास आहे—व हें माझें मत मी लपवीत नाहीं. पण माझे वाचकांनीं ह्या मताचें अवलंबन करावें, असा माझा मुळींच यत्न नाहीं.' ह्या त्याच्या लिहिण्यावरून आमच्या वाचकांस त्याचा दृढ विश्वास व सत्यावरील प्रेम हीं पूर्ण अवगत होतीलच. असो.

आमचा ग्रंथकार हा इंग्रजी भाषेंत व त्याचप्रमाणें संस्कृतांत उत्तम प्रवीण होता. ह्यानें आधुनिक शास्त्रांचा अभ्यास पुरा करून त्यांची आपले देशबांधवांस गोडी लागावी, व माहिती व्हावी म्हणून ' बंगदर्शन ' ह्या नांवाचें इ. स. १८७२ त एक मासिकपुस्तक बंगाली भाषेंत सुरू केलें. ह्या मासिकपुस्तकाची भाषाशैली व विषयांची मनोरमता हीं पाहून त्याची मोठी ख्याति झाली होती; ह्याशिवाय ह्या आमच्या ग्रंथकाराचा ' प्रचार ' व ' नवजीवन ' ह्या मासिकपुस्तकांशींही लेखक ह्या नात्यानें संबंध बराच दृढ होता. ह्या ग्रंथकाराचें ' कविताप्रकाशक' ह्या नांवाचें एक कवितासंग्रहाचें पुस्तक इ.स. १८७८ त प्रसिद्ध झालें आहे. ह्या कवितांचें भाषामाधुर्य व त्यांतील विचारपद्धति फारच आश्चर्यकारक आहेत व त्यांत उपमांची रेलचेल आहे.

ह्याचे गृहस्थितीची विश्वसनीय माहिती मिळत नाहीं; कारण ह्याचें चारित्र अजून प्रसिद्ध झालें नाहीं. ह्याच्या

वडिलांचें नांव यादवचंद्र असें होतें व ह्यास तीन सहोदर होते. आमच्या ग्रंथकाराचा पहिल्यानें हुगळी कॉलेजांत अभ्यास झाला व पुढें त्यानें कायद्याचा अभ्यास प्रेसिडेन्सी कॉलेजांत केला. कलकत्ता येथील विश्वविद्यालयांतून जे विद्यार्थी अगदीं पहिल्यानें उत्तीर्ण झाले, त्यांपैकीं हा होता. हा आमचा ग्रंथकार डेप्युटी मॅजिस्ट्रेट व कलेक्टर ह्या मोठ्या अधिकारावर पुष्कळ दिवस होता, व त्यास सरकारांतून 'सी. आय्. ई.' व 'रायबहादूर' हे किताब मिळाले होते. आमचा प्रसिद्ध ग्रंथकार आपल्या मागें आपली ग्रंथरूपी कीर्ति अमर ठेवून ह्या नश्वर विश्वांतून इ. स. १८९४ चे मे महिन्यांत आपल्या वयाच्या ५७ वे वर्षी उठून गेला.

इतका वेळ ग्रंथकारासंबंधानें चार शब्द, जी माहिती मिळाली तिजवरून लिहून, वाचकांच्या सेवेस सादर केली. आतां ग्रंथाकडे वळूं या. ही कादंबरी मूळ ग्रंथ जो बंगाली भाषेंत लिहिला आहे, त्याचे आधारानें जितकें शब्दशः भाषांतर करवलें तितकें करून लिहिली आहे. भाषांतर करितांना मराठी भाषेला साजेल तितका व तसाच कायतो फेरफार केला आहे. बाकी म्हणण्यासारखा कांहीं कोठेंही फेरफार केला नाहीं. ह्या कादंबरी वाचीत असतां कोठें कोठें जगत्प्रसिद्ध कादंबरीकार सर वॉल्टर स्कॉट ह्याच्या कादंबऱ्यांतील कांहीं कांहीं स्थलांचें स्मरण होतें; पण हीं स्थलें केवळ भासवत् असल्यामुळें तीं अमकींच आहेत, असें सांगून आमच्या कादंबरी वाचनपांडित्यानें प्रिय वाचकांस कंटाळा आणावा असा आमचा मुळींच हेतु नाहीं. जे सहृदय आहेत ते तीं तीं स्थलें समजल्याशिवाय राहणार नाहींत, अशी आमची पूर्ण खात्री आहे. बंकिम-

चंद्र हा स्कॉटचे ग्रंथ वाचणारा होता एवढें मात्र खरें आहे; म्हणून त्यानें स्कॉटच्या स्थलांचें किंवा पात्रांचें अनुकरण आपल्या ग्रंथांत केलें आहे, असें मात्र म्हणण्याचें कोणीं धाडस करूं नये. कारण मानव मस्तिष्कयंत्र हें सर्व जगतीतलावर एकच आहे हें निर्विवाद आहे. त्याच्यासंबंधानें दाखले देणें म्हणजे दिवा लावून सूर्य हुडकण्यासारखेंच आहे. परममान्य महाराष्ट्र लेखकवर कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, ह्यांची 'निबंधमाला' ज्यांनीं ज्यांनीं वाचली असेल त्यांस आमचें म्हणणें साधार नाहीं असें म्हणवणार नाहीं. त्यांनीं आपल्या 'मालें' त निरनिराळ्या देशांतील निरनिराळ्या वेळच्या सुप्रसिद्ध लेखकांचे विचार एकमेकांशीं किती मिळतात हें साधार दाखविलेंच आहे.

आमची प्रस्तावना पुरी करण्याचे अगोदर आमच्या ग्रंथांतील उपनायिकाच कां होईना, जी 'आयेषा' तिचे संबंधानें चार शब्द लिहिल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. आमच्या ग्रंथकारास हें नांव कदाचित् औरंगजेबाच्या कन्येवरून आठवलें नसेल कशावरून? हा प्रश्न सहज उत्पन्न होतो. ह्या औरंगजेबाच्या कन्येचें व चिरमंगलस्मरणीय जो शिवराय त्याच्या नातवाचें म्हणजे शाहूमहाराजांचें स्मरण झालें म्हणजे कोणा मराठ्यास आयेषा बिबीविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न झाल्याशिवाय राहील बरें? तीच पूज्यबुद्धि ह्या आमच्या आयेषेविषयींही ही कादंबरी वाचल्यावर होते, असें आमचे वाचकांस कबूल करावें लागेल, असें आम्हांला वाटतें. आतां ह्या आमच्या कादंबरीच्या दुसऱ्या खंडांतील कथाभागाचा व शाहूमहाराज ह्यांच्या पूर्ववयांतील दिल्ली येथील कारागृहवासाचा कांहीं संबंध आहे कीं काय, हें मात्र आमच्यानें

कांहीं सांगवत नाहीं. तरी पण ह्या दुसऱ्या खंडांत घडलेल्या गोष्टींत कांहींएक अद्भुत नसून सर्व सृष्टीच्या नित्यक्रमांतील घडणाऱ्याच गोष्टी असल्यामुळें, कोण जाणे, ग्रंथकाराचे मनांत ग्रंथ लिहितांना कदाचित् ही ऐतिहासिक गोष्ट आली असावी, असें मानण्यास सबळ कारण नाहीं असें नाहीं. असो.

आतां 'ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळी' च्या ग्रंथलेखकांकरितां नियमांतील सहाव्या नियमाप्रमाणें 'सारांश' हा दिला पाहिजे होता, पण हें आमचें गरीबसें पुस्तक तितक्या योग्यतेचें नाहीं ह्याचेबद्दल 'मंडळी' ची माफी मागून तिनें हें पुस्तक प्रकाशांत आणल्याबद्दल तिचे सविनय आभार मानून हा प्रस्तावलेख पुरा करून आमच्या प्रिय वाचकांची रजा घेतों.

बडोदें,
१५ डिसेंबर
१८९८.

शिवराम गोविंद फाळके, त्र्यंबककर.
ग्रंथकर्ता.

---

## प्रकाशकाचे दोन शब्द.

ह्या कादंबरीची पहिली आवृत्ति संपली, व लोकांच्या मागण्या सारख्या येऊं लागल्या. म्हणून ही दुसरी अवृत्ति वाचकांच्या सेवेंत सादर करीत आहोंत. ह्या पुस्तकाची किंमत दीड रुपया होती, ती कमी करून हल्लीं फक्त एक रुपया किंमत ठेविली आहे. वाचकवर्ग पहिल्या आवृत्ती प्रमाणें ह्या आवृत्तीसही योग्य आश्रय देतील अशी आशा आहे,

प्रकाशक.

---

# दुर्गेशनंदिनी.

## प्रकरण १ लें

### देवमंदिर.

बंगाब्द ९९८ ह्मणजे इसवी सन १६९१ च्या उन्हाळा अखेर एके दिवशीं एक तरुण पुरुष घोड्यावर स्वार होऊन विष्णुपुराहून जहानबादेच्या मार्गें एकटाच चालला होता दिनमणि अस्ताचलाकडे वळला, असें पाहून त्यानें आपल्या घोड्यास जरा टांच मारिली. कां कीं, त्याच्यापुढें एक मोठें विस्तीर्ण मैदान होतें, तेव्हां, न जाणों कालधर्मानुसार सायंकाळीं मोठा तुफानाचा वारा सुटून त्यांतच पावसानें एक गर्दी करून सोडली आणि तसल्या प्रसंगीं आपणांस या वैराण मैदानांत अडकून निराश्रित राहावें लागलें, तर मग आपल्या त्या विपत्तीस पारावार रहाणार नाहीं, असें त्यास वाटलें असावें. मैदान आटोपतां आटोपतां सूर्यास्त तर होऊन गेला. हळू हळू संध्याकाळचें आकाश मेघांनीं व्याप्त होऊं लागून अंधार पडूं लागला. अंधार पडतां पडतां सर्व भूतल अंधारमय होऊन गेलें, व त्यामुळें घोडा चालविण्यास त्यास फार मुशकील पडूं लागली. मधून मधून विजा चमकत, व वीज चमकली कीं घोडा चालवावा, असा प्रसंग त्यावर येऊन ठेपला.

थोड्या वेळांत मोठ्या वेगानें तुफानाचा वारा सुटला, व त्याबरोबर जोरानें पाऊसही कोसळूं लागला. घोडेस्वाराला जाण्याचा रस्ता कांहीं सुचेना. त्यानें हातची लगाम सोडून दिल्यामुळें घोडा आपल्या इच्छेप्रमाणें जाऊं लागला. अशा रीतीनें कांहीं मजल निघून गेल्यावर कांहींतरी कठीण वस्तूला टाप लागल्याचा अवाज होऊन घोड्यानें ठोकर खाल्ली, व त्याचवेळीं वीज चमकली, त्यामुळें आमच्या ह्या मुशाफराला समोर एक मोठा पांढरा पदार्थ चमकतो आहेसें दिसलें. तो पांढरा टेंकडीच्या आकाराचा पदार्थ कांहीं तरी वसतिस्थान असावें असें वाटून तो घोडेस्वार उडी मारून जमिनीवर उतरला. उतरतांच त्याला कळून आलें, कीं ज्या कठीण वस्तूला घोड्याचा पाय अडखळला होता ती एक दगडाची पायरी आहे. तेव्हां जवळच आश्रयस्थान असावें असें जाणून त्यानें घोड्याला सोडून दिलें, आणि स्वत: तो त्या अंधारांत फार जपून एक एक पायरी चढूं लागला. इतक्यांत विजेच्या चमकण्यानें समोरची इमारत, एक देवालय आहे, असें त्यास स्पष्ट दिसलें. मोठ्या सावधगिरीनें तो कसाबसा त्या मंदिराच्या धाकट्या दरवाजाशीं येऊन पोहोंचला, आणि पाहतो तों बंद आहे. आसपास हात फिरवून पहातां तो बाहेरून बंद नव्हता. या निर्जन मैदानांतील मंदिरांत ह्या वेळीं कोणी बरें आंतून कडी लाविली असावी, असा विचार त्याचे मनांत येतांच त्याला किंचित् आश्चर्य वाटलें. आमचे ह्या प्रवाशाच्या मस्तकावर पावसानें संतत धार धरिली असल्यामुळें मंदिरांत कोणीही येऊन राहिलें असो, त्याचा विचार करण्याच्या भरीस न पडतां तो दर-

याजावर हातानें धक्के मारूं लागला. दरवाजा उघडण्यास कोणीही येईना, हें पाहून त्याचे मनांत आलें कीं, लत्ताप्रहार करून दार उघडावें. पण तसें केल्यानें देवालयाची अमर्यादा होणार, असा विचार करून तो तसाच हातानें धक्के देत राहिला. दार लांकडी असल्यानें त्याचा त्या वज्रप्राय हातापुढें निभव लागेना. थोडयाच वेळांत त्याची कडी निखळून पडली व तें उघडलें. दार उघडून आंत जातांच तेथें कोणी कुजबुजल्याचा आवाज त्याचे कानीं आला, आणि दार उघडें असल्यामुळें त्यांतून वाऱ्याचा सोंसाटा येऊन त्या योगानें तेथील दिवा मालवला. त्यामुळें मंदिरांत कोण माणसें आहेत, कोणत्या देवाची मूर्ति आहे, हें त्यास पाहतां आलें नाहीं. आपली अशी स्थिति पाहून त्या धीट तरुणानें हांसल्यासारखें करून प्रथम भक्तिभावानें मंदिरस्थ आदृश्य देवमूर्तीला साष्टांग प्रणाम केला आणि उठून ' येथें मंदिरांत कोण आहे?' असा अंधारांतच प्रश्न केला. प्रश्नाला उत्तर मिळालें नाहीं, पण कंकणाचा मात्र ध्वनि त्याच कानीं आला. मुशाफरानें त्या वेळीं जास्ती बोलण्याचे नादीं न लागतां, पावसाची झड आणि झोंबणारा वारा यांपासून रक्षण होण्याकरितां दरवाजा बंद करून घेतला आणि त्या मोडक्या दाराशीं आपली पाठ लावून तो ह्मणाला, ' कोणीही मंदिरांत असो, ' त्यास मी सांगतों कीं, मी दरवाजावर सशस्त्र बसलों आहे. माझ्या विश्रांतींत विघ्न न व्हावें. जर विघ्न आणणारा पुरुष असेल तर त्यास कृतकर्माचें फळ मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं. आणि स्त्री असल्यास तिनें निश्चिंतपणें झोंप घ्यावी; रजपूताचे हातांत जोंपर्यंत

ढालतलवार आहे तोंपर्यंत तुमच्या पायांत एक कुशांकु-रही रुतणार नाहीं.'

हें ऐकून 'आपण कोण आहांत?' हा प्रश्न एका स्त्रीचे-कंठांतून निघाला. तेव्हां मुशाफरानें मोठ्या आश्चर्यानें जबाब दिला. 'आवाजावरून स्पष्ट कळून येत आहे कीं, हा प्रश्न कोणी स्त्रीनेंच केला असावा; पण माझी ओळख झाल्यानें आपल्यास काय लाभ होणार आहे?'

त्यावर 'आह्मी फार भ्यालों आहोंत' असा जबाब त्यास मिळाला.

तो तरुण ह्मणाला, 'मी कोणीही असो, आमच्यांत आपली ओळख देण्याची चाल नाहीं. पण मी हजर असतां अबला जातीला भय बाळगण्याचें कारण नाहीं.'

स्त्री ह्मणाली, 'आपलें बोलणें ऐकून आतां आह्मांस धीर आला. एवढा वेळ आह्मी भयानें मेल्यासारख्या झालों होतों. अद्यापि ही माझी सखी अर्धी बेहोष होऊन पडली आहे. आह्मी सायंकाळीं या शैलेश्वर शिवपूजनार्थ आलों होतों, इतक्यांत असें तुफान झालें. तेव्हां आमच्या दास-दासी आह्मांस सोडून कोणीकडे गेल्या आहेत तें कांहीं सांगतां येत नाहीं.

तो तरुण ह्मणाला, 'चिंता करूं नका, तुह्मी सुखानें निद्रा करा. उद्यां सकाळीं मी तुह्मांस तुमच्या घरीं पोंचवून देईन.' तें ऐकून ती स्त्री ह्मणाली, 'शैलेश्वर आपलें कल्याण करो.

मध्यरात्रीचे सुमारास वारा व पाऊस बंद झाला. तेव्हां तो तरुण ह्मणाला, 'तुह्मीं येथें थोडा वेळपर्यंत असाच धीर

धरून रहा, मी जवळच्या गांवीं जाऊन दिवा घेऊन येतों.'

हें ऐकून, बोलत होती ती स्त्री ह्मणाली, 'महाराज! गांवांत जाण्याची कांहीं जरूर नाहीं. या मंदिराचा गुरव येथें जवळच राहातो. चांदणें पडलें आहे, मंदिराबाहेरून त्याचें खोपट सहज दिसेल. तो येथें मैदानांत एकटा रहातो आहे, ह्मणून त्याची धुनी सर्वदां पेटलेलीच असते.'

हें ऐकून तो तरुण तेथें गेला आणि तेथील गुरवास जागें करून त्याजपाशीं तो दिवा मागूं लागला. मंदिरचा गुरव दचकून उठून प्रथम दाराच्या फटींतून बाहेर कोण आहे तें पाहूं लागला. निरखून पहातां ह्या आमच्या प्रवाशाच्या मुखचर्येंत लुटारूपणाचें लक्षण त्यास कांहीं दिसेना, व त्यांतूनही त्याच्या त्या देऊं केलेल्या मोहोरेची लालूच सोडून देणें त्यास मोठ्या मुशकिलीचें झालें. हो ना हो ना करितां करितां गुरवानें दार उघडून दिवा तर लावून दिला.

मुशाफरानें दिवा आणल्यावर पाहिलें, तों मंदिरांत लिंगमधी शुभ्रपाषाण शिवमूर्ति स्थापित असून तिच्या मागील भागीं दोन स्त्रिया उभ्या आहेत. दिवा पाहतांच त्यांतील धाकट्या स्त्रीनें तोंडावर बुरखा घेऊन मान खालीं घातली. परंतु तिच्या उघड्या हातांतील रत्नजडित कंकणें आणि तिचा तो अतिशय मौल्यवान् पोशाख पाहून, निःसंशय ती कोणा श्रीमंताच्या घरची स्त्री असावी, व त्या दुसऱ्या स्त्रीच्या थाटावरून ती त्या तरुणीची दासी असावी, असें त्यास वाटलें. तरी तिचा वेष केवळ दासीप्रमाणें हलका नव्हता.

तिचें वय अजमासें ३५ वर्षांचें होतें. आपण ह्याच स्त्रीशीं बोलत होतों असें तिला पाहून आमचे तरुणास वाटलें. त्या स्त्रियांचा पोषाख तिकडील स्त्रियांच्यासारखा नसून पश्चिमेकडील ह्मणजे हिंदुस्थानी स्त्रियांसारखा आहे, हें पाहून त्यास आश्चर्य वाटलें. योग्य स्थळीं दिवा ठेवून तो तरुण त्या स्त्रियांसमोर उभा राहिला. त्यावेळीं दिव्याचा उजेड त्याजवर पडल्यामुळें त्या स्त्रियांना ह्या आमच्या तरुणाचें वय पंचविशीच्या आंतील असून तो शरीरानें मोठा धिप्पाड आहे असें दिसलें. त्याची छाती विशाल असून सर्वांग सौंदर्याच्या गुणांनीं पूर्ण मंडित होतें व त्यामुळें त्याचे अंगावर एक प्रकारची अलौकिक श्री संपादन झाली आहे असें दिसे. त्यानें अंगांत चिलखत घातलें होतें व कमरेस तलवार लटकावून दिली होती; हातांत मोठा भाला धरिला होता व डोक्याला मंदील घातला होता व त्यावर शिरपेंच झळकत होता. त्याचे कानांत मोत्याचीं कुंडलें होतीं व गळ्यांत रत्नहार होता.

परस्परांस पाहून उभयपक्षीं ओळख होण्याची उत्सुकता उत्पन्न झाली, परंतु प्रथम ओळख पुसण्याचा उद्धटपणा पदरीं घेण्यास कोणीही तयार होईना.

# प्रकरण २ रें

## संभाषण.

प्रथम, हा आमचा तरुण अत्युत्सुक होऊन त्या थोरल्या स्त्रीला ह्मणाला, 'मला जो जगताचा अनुभव आहे त्यावरून आपण कोणा श्रीमंताच्या घरच्या स्त्रिया असाव्यात असें मला वाटतें, पण आपलें नांव विचारण्यास मला संकोच वाटतो; तरि मला स्वतःचें नांव सांगण्यास जी हरकत आहे तीच अथवा तशीच हरकत आपणांस नसेल असें मानून, आपण कोणाच्या कोण आहांत, हें जाणण्याची इच्छा करितों.'

त्या स्त्रीनें उत्तर केलें, 'आह्मां स्त्रियांची ओळख आणखी ती कशी असणार? ज्यांना कुलोपाधि धारण करितां येत नाहीं, त्यांनीं आपली ओळख कशी ह्मणून द्यावी? अंतःपुरीं गुपचुप पडून राहावें, हा ज्यांचा धर्म, त्यांनीं स्वतःची ओळख कशी बरें द्यावी? ज्या दिवशीं विधात्यानें पतिनाम मुखाबाहेर पाडण्याची बंदी केली, त्याच दिवशीं आपली स्वतःची ओळख देण्याचा मार्ग स्त्रियांना खुंटला आहे.'

या बोलण्यावर तो तरुण कांहींच बोलला नाहीं. त्याचें लक्ष त्या धाकट्या स्त्रीकडे एकसारखें लागलें होतें. ती तरुणी मुखावरील वस्त्र अंमळ बाजूला सारून आपल्या सखीच्या आडून त्या तरुणाकडे टक लावून पहात होती. बोलतां बोलतां तरुणाची दृष्टि तिकडे गेली, ती मागें

फिरलीच नाहीं. त्याला वाटलें कीं, असें अलौकिक रूप आपल्या पाहण्यांत आलें नाहीं; व पुढेंही कधीं येणार नाहीं. उभयतांची दृष्टिभेट झाली. युवती तत्क्षणीं निम्नमुखी झाली. तिची सखी प्रत्युत्तर येत नाहीं असें पाहून ती त्या मुशाफराकडे पाहूं लागली, तों त्याची कोणीकडे नजर आहे, हें तिला दिसून आलें; त्याचप्रमाणें जवळ उभी असलेली तरुणीही त्या तरुणाकडे अगदीं निरखून पहात आहे, असें पाहून सखी तिच्या कानांत ह्मणाली, 'अग! मांडिलें आहेस तरी काय तूं हें? शिवसन्मुख स्वयंवर कां करीत आहेस?'

ती तरुणी आपल्या सखीची अंगुली दाबून हळूच ह्मणाली, 'असें ग काय भलतें बोलतेस?' तिची सखी चतुरच होती, ती हें पाहून मनांतल्या मनांत विचार करूं लागली कीं, जें मी हें लक्षण पहात आहें, त्यावरून कदाचित् या अपरिचित तरुण पुरुषाचें तेज व तशीच त्याची कांति पाहून माझ्या हातीं सोंपलेली ही कन्या मन्मथशरानें विद्ध होईल; पण असें झाल्यानें दुसरें कांहीं होवो, वा न होवो, हिच्या मनाची शांति मात्र सर्वदा नाश पावणार; इतक्याकरितां तो मार्ग आतांच बंद करावा हे बरें. पण हा मतलब कसा बरें आपण साधावा? जर-करितां या तरुणाला कांहीं इशारतीनें अथवा कांहीं बाहाणा करून येथून कोठें पाठविला तर तें साधेल खरें. असा विचार करून नारीस्वभावसिद्ध चतुरतेनें ती ह्मणाली, 'महाराज! बायकांची अब्रु इतकी नाजूक आहे कीं, तिला दुसऱ्याचे अंगावरून आलेल्या हवेचा स्पर्शदेखील सहन

होत नाहीं. आज या भयंकर तुफानांत रक्षण होणें फार मुशाकिलीचें झालें होतें, आतां तुफान शांत झालें आहे, ह्मणून पाहूं ह्मणत्यें आपल्या घरीं चालून जाववतें कीं नाहीं तें ?'

तो तरुण पुरुष ह्मणाला, 'जरकरितां अशा या अंधा-रांतून घरीं गेलेंच पाहिजे असें ह्मणतां, तर मीही आपणांस आपल्या मंदिरीं पोहोंचवून जाईन ह्मणतों. आतां आकाश निवळलें आहे, मी मघांच आपल्या मार्गानें जाणार होतों, पण तुमच्या या रूपवती सखीला रक्षणाविना सोडून मला जाववेना आणि ह्मणूनच मी हा थांबलों आहें.' स्त्रीनें उत्तर केलें, 'आपली ही आमचेविषयीं कळकळ पाहून आपले उतराई आह्मीं कसें व्हावें हें आह्मांस कांहीं समजत नाहीं, आणि यापेक्षां जास्ती बोलून दाखववतही नाहीं. महा-राज ! आतां आमच्या खडतर अदृष्टाची काहाणी आपणापुढें काय सांगावी ? आह्मी स्त्रिया साहजिकच अविश्वासी आहोंत. आपण आह्मांस पोहोंचविण्यास आल्यास आह्मांस मोठें भूषणच आहे; पण जेव्हां माझा धनी, या मुलीचा बाप, हिला विचारील कीं, तूं एवढ्या रात्रीं कोणाबरोबर आलीस ? तेव्हां तिनें काय बरें उत्तर द्यावें ?

तरुणानें थोडा वेळ विचार केलासें करून उत्तर दिलें, 'सांगावें कीं महाराज मानसिंहाचा पुत्र जो जगत्सिंह त्याच्याबरोबर आल्यें ह्मणून.'

जर तेथें वज्रपात झाला असता तरी त्या स्त्रिया तितक्या चकित होत्या ना, इतकें त्याचें नांव ऐकून त्या चकित झाल्या; त्या चटकन उठून उभ्या राहिल्या; धाकटी स्त्री शिवलिंगा-

त्या आड झाली व तिची चतुर दासी हात जोडून ह्मणाली, ' युवराज ! मी न जाणतां आपले अगणित अपराध केले आहेत, क्षमा करण्यासही समर्थ आपणच अहां. '

तो राजपुत्र हंसून ह्मणाला, ' असल्या महदपराधाला क्षमा नाहीं; तरी आपली ओळख दिल्यास मी तुह्मांस क्षमा करीन; नच दिल्यास योग्य तो दंड करीन. '

नम्र वाक्यानें रसिकांना सर्व प्रसंगीं हिम्मत येत असते. ती स्त्री अंमळ थांबून ह्मणाली, ' काय दंड करणार तो सांगावा, आह्मी तो भोगण्यास सिद्ध आहोंत. '

यावर जगत्सिंह हांसून ह्मणाला, ' तुम्हांबरोबर येऊन तुम्हास तुमच्या घरीं पोहोंचवून द्यावें, हाच ! '

हें राजपुत्राचें बोलणें ऐकून आतां कसें करावें, ह्याचें तिला मोठें संकट पडलें. विशेष कारणामुळें त्या तरुणीची ओळख दिल्लीश्वराच्या सेनापतीला होऊं देण्यास ती राजी नव्हती. त्याच्या नुस्तें पोहोंचविण्यास येण्यानें नुकसान आहे, व ओळखीनें तर तें फारच आहे; अशी तिची खात्री असल्यानें ती तोंड खालीं करून मुकाट्यानें उभी राहिली.

इतक्यांत मंदिराजवळून थोड्या अंतरावर पुष्कळ घोड्यांच्या टापा ऐकूं येऊं लागल्या. तो राजपुत्र घाबरा होऊन मंदिराच्या बाहेर येऊन पाहूं लागला, तों अजमासें शंभरांहूनही कांहीं जास्त घोडेस्वारांचें लष्कर जात आहे असें त्यास दिसलें. त्यांच्या पोषाखावरून तें आपलेंच लष्कर आहे, अशी त्याची खात्री झाली. पहिल्यानें हा आमचा युवराज लढाई करण्याचे हेतूनें विष्णुपुरास जाऊन मग मोठ्या

घाईनें शंभर स्वारांची एक तुकडी घेऊन आपल्या पित्या-कडे जात होता. त्या दिवशीं दोनप्रहरीं तो लष्कर मागें टाकून एकटाच चालला होता; इतक्यांत एकाएकीं तुफान होऊन, पाऊस पडूं लागल्यामुळें तो वरीलप्रमाणें केलेल्या स्थि-तींत येऊन पडला होता. लष्करानें आपणांस पाहिलें किंवा नाहीं हें पाहण्याकरितां तो मोठ्यानें ह्मणाला, 'दिल्ली-श्वराचा जय होवो.' तें एकतांच एक घोडेस्वार त्याजपाशीं आला. युवराज त्यास पाहून ह्मणाला, 'धरमसिंह, मोठा पाऊस कोसळूं लागल्यामुळें मीं येथें थांबून राहिलों होतों.'

धरमसिंह मोठ्या नम्रभावानें प्रणाम करून ह्मणाला, 'आह्मी युवराजांचा फार शोध केला. शेवटीं घोड्याच्या पावलांचा माग काढीत येथें आलों. आपल्या घोड्याला त्या पलीकडच्या वडाच्या झाडाखालून आणिला आहे.'

जगत्सिंह ह्मणाला, 'घोडा धरून येथें उभे रहा, आणि दोघांजणांस या नजीकच्या गांवीं धाडून एक म्याना आणि भोई बोलावून आणवा, व बाकीचें लष्कर पुढें जाऊं द्या.'

धरमसिंहाला मालकाचा हा हुकूम ऐकून कांहीं आ-श्चर्य वाटलें, पण धन्याच्या आज्ञेवर प्रश्न करणें हें अनाव-श्यक जाणून 'जसा आपला हुकूम,' असें ह्मणून लष्करांत जाऊन त्यानें युवराजांचा हुकूम कळविला. लष्करांत म्यानाचा तो मजकूर ऐकून कांहीं जण हांसून आपआपसांत बोलूं लागले, 'आज कांहीं नवलच आहे;' त्यावर कोणी जबाब दिला, 'अहो, ह्यांत नवल तें कशाचें? महाराज रजपूत पतींना शंभर शंभर बायका असतात.'

इकडे युवराज तेथें नसल्यानें मिळालेल्या अवसराचा लाभ घेऊन बुरखा बाजूला करून ती तरुण स्त्री आपल्या सखीला ह्मणाली, ' विमले ह्या राजपुत्राला आपली ओळख देण्यांत तूं कां बरें कांकूं केलीस ? ' विमला ह्मणाली, ' याचा जबाब मी तुझ्या पित्यापाशीं देईन; आतां ही कसली गडबड ऐकूं येत आहे बरें ? ' तरुणी ह्मणाली, ' मला वाटतें कीं, रजपूतांचें लष्कर याच्या शोधार्थ आलें असावें. जेथें युवराज आहेत तेथें आपल्याला चिंता कर-ण्याचें काय काम ? '

ते घोडेस्वार म्याना आणि भोई यांच्या शोधार्थ निघून जाणार होते, इतक्यांत जे भोई, त्या तुफानाच्या वेळीं त्या स्त्रियांना तेथें मंदिरांत सोडून आश्रयार्थ शेजारच्या गांवीं जाऊन राहिले होते, तेच परत मंदिराकडे निघून येत होते. ते नजीक आले असें पाहून राजपुत्र मंदिरांत जाऊन त्या दासीला ह्मणाला, ' कित्येक शिपायांसह भोई म्याना घेऊन येत आहेत, तीं आपलींच माणसें आहेत कीं काय तें बा-हेर येऊन पाहून जावें. ' विमला मंदिरद्वारीं उभी राहून पाहूं लागली व स्थीर मनानें म्हणाली, ' होय तीं आमचींच माणसें आहेत. '

तेव्हां राजकुमार म्हणाला, ' असें आहे तर मग मी आतां येथें उभा रहात नाहीं; कदाचित् माझ्या समागमानें आपलें नुकसान होईल. तसें होऊं नये म्हणून मी जातों. पण अगोदर शैलेश्वरापाशीं प्रार्थना करितों कीं, त्यानें तुम्हाला निर्विघ्न घरीं पोहोंचवावें. आतां तुम्हांपाशीं माझी एवढीच विनंति आहे कीं; तुमची व माझी भेट झाली होती हा वृत्तांत

एक आठवडापर्यंत कोणाला सांगू नका. विसरूं नका, ह्या गोष्टीचें स्मरण तुह्मांला रहावें ह्मणून मी ही सामान्य वस्तू देतों, ती नेहमीं जवळ ठेवा. तुमच्या धन्याच्या कन्येची व माझी ओळख झाली नाहीं, ही गोष्टच माझ्या हृदयीं स्मरणचिन्ह ह्मणून राहील.' असें बोलून त्यानें गळ्यांतील मोत्यांचा हार काढून तो विमलेच्या हातांत दिला. विमला तो मौल्यवान् हार आपल्या हातांत धरून राजकुमाराला नम्रभावानें प्रमाण करून ह्मणाली, ' युवराज, मी ओळख होऊं दिली नाहीं, ह्मणून मला अपराधी गणूं नका, त्याला कांहीं तसेंच कारण आहे, ह्मणून ह्मणत्यें, जर आपण ती होण्याविषयीं फारच आतुर झालां असाल तर आजपासून पंधरावे दिवशीं आपण मला कोण्यास्थळीं भेटाल, हें सांगाल तर मी खचित ती करून देईन.'

जगत्सिंह विचार करून ह्मणाला, ' आजपासून पंधरावे दिवशीं रात्रीं याच मंदिरांत माझी भेट खास होईल. त्या दिवशीं माझी भेट न घडेल तर ती पुनरपि घडण्याची आशा बाळगणें नको.

' देव आपलें रक्षण करो ' असें बोलून विमलेनें त्याला पुन:पुन: प्रमाण केला. जातां जातां राजकुमारानें फिरून फारच तृष्णातुर नेत्रांनीं त्या तरुण स्त्रीकडे दृष्टि फेंकली व घोड्यावर बसून चालता झाला.

# प्रकरण ३ रें

## मोंगल व पठाण.

रात्रीं जगत्सिंह त्या शैलेश्वराच्या मंदिरांतून निघाला. त्याच्या जाण्याच्या अथवा मंदिरांत राहिलेल्या मनमोहिनीचा वृत्तांत इतक्यांत सांगून वाचकांची आतुरता आह्मांस तृप्त करतां येत नाहीं. जगत्सिंह जातीनें रजपूत होता. तो बंगाल्यांत कशासाठीं आला होता, व काय ह्मणून तो त्या मैदानांतून एकटाच चालला होता, त्याचें वर्णन करण्याचे ऐवजीं या प्रकरणांत बंगाल्याची राजकीयघटना थोडक्यांत देण्याचा विचार आहे. हें प्रकरण ऐतिहासिक आहे, ह्मणून यदाकदाचित् वाचकगण अत्यंत उतावळा झाला असेल तर त्यास हें प्रकरण खुशाल सोडतां येणार आहे. पण या कामीं आमची शिफारस अशी आहे कीं, ग्रंथवाचनाचे कामीं अशी अधीरता चांगली नाहीं.

प्रथम बंगाल्यांत बख्त्यार खिलजीनें महंमदीय जयध्वजा फडकाविली, तेव्हांपासून तें राज्य, पठाणांनीं कित्येक शतकेंपर्यंत बिनहरकत चालविलें होतें. ९३२ सालीं जगद्विख्यात सुलतान बाबर यानें रणभूमीचे ठायीं दिल्लीचा बाहशहा इब्राहीम लोदी याचा मोड करून त्याचेजागीं आपण सिंहासनारूढ झाला, पण त्या वेळीं बंगाल प्रांत तैमूरलंगाच्या वंशजांचे ताब्यांत नव्हता.

जोंपर्यंत मोंगल बादशहांचा कुलतिलक, जो अकबर त्याचा अभ्युदय झाला नव्हता, तोंपर्यंत बंगाल्यांत पठाण

राजे स्वतंत्रपणें राज्य चालवीत होते; पण कोण जाणें कोणा कुवेळीं मूर्ख दाऊदखानाला स्वस्थ निजलेल्या सिंहाच्या शेंपटीवर जाणून बुजून पाय ठेवण्याची कुबुद्धि झाली असेल ती असो; तो स्वकर्मभोगानें, अकबराचा सेनापति होतो मनाइमखान, त्याचे हातीं पराभव पावून स्वतःचें राज्य हि गमावून बसला. पुढें तो ९८२ सालीं ओरीसा प्रांतांत पळून गेला. तेव्हांपासून बंगाल्याचें राज्य मोंगल बादशहांचे ताब्यांत गेलें. पठाणांनीं ओरिसा प्रांतांत आपलें राज्य स्थापिलें होतें. तेथून त्यांस हुसकून काढण्यास मोंगलांस फार कठीण गेले. ९८१ सालांत दिल्लीहून, प्रतिनिधि खानजाहाखान पठाणांवर दुसऱ्यानें चालून आला आणि त्यानें पुनः ओरिसा प्रांत आपल्या धन्याचे ताब्यांत करून घेतला. पण यानंतर एक मोठा बंडावा माजला. अकबर बादशहानें बंगाल्यांत कर घेण्याची जी एक नवी पद्धति सुरू केली होती, ती येथील जाहागीरदारांना व जमीनदारांना मानवली नाहीं, ते आपापल्या ठिकाणीं अगदीं नाराज होऊन राहिले, आणि ज्यानें त्यानें हातीं शस्त्र उचलिलें, त्यामुळे मोठें बंड झालें. ती संधि साधून ओरिसाच्या पठाणांनीं पुनः माथें वर केलें, आणि कतलुखान नांवाच्या एका पठाणाला आपला सेनापति करून पुनः ओरिसाचें राज्य अपल्या स्वाधीन करून घेतलें. व तसाच ओरिस्याचे बाहेरील विष्णुपूर व मेदिनीपुर यांवर आपला कबजा त्यांनीं बसविला.

काम करण्यांत कुशल, असा राजप्रतिनिधि खान आजिब, व त्याचे मागून शाहाबाजखान, यांस पठाणांवर

पाठविण्यांत आलें होतें. पण त्या दोघांतून एकाध्यानें गेलेला मुलूख त्यांच्या हातून सोडवून घेववला न शेवटीं या कष्टसाध्य कामीं एका हिंदु योद्धयाची यो करण्यांत आली.

जेव्हां नवीन धर्माच्या प्रेमानें मुसलमानांच्या अस फौजा हिमालयाचे शिखरांवरून येऊन आपल्या शौ गर्वानें भरतखंडावर स्वाऱ्या करीत, तेव्हां पृथ्विराज प्रभृति रजपूत वीर आपआपल्या असाधारण शौर्यानें त्यांना हटवीत असत. पण भरतखंडाची अवनतीच व्हावी असा विधात्याचा हेतूच असला पाहिजे; कारण त्यानंतरचे रजपूत राजे परस्परांशीं प्रेमभावानें न वागतां एकमेकांशीं तंटे करूं लागले. अखेरीस मुसलमानांच्या सतत यत्नांनीं एकामागून एक हिंदु राजे हारत गेले व दिल्लीचे साम्राज्याची स्थापना झाली. मुसलमानांना साम्राज्य स्थापन करितां आलें, पण क्षत्रियकुलसंभव जे रजपूत राजे त्यांचा एकाकालीं बींमोड त्यांना करितां आला नाहीं. रजपूत राज्यांनीं मुसलमानी बादशाहीचा अंत होईपर्यंत वारंवार मुसलमानांशीं युद्धें केलीं व पुष्कळ वेळां त्यांचा पराभवही केला; पण कालगतीनें पुष्कळ रजपुत राजांना दिल्लीश्वराचे अंकित व्हावें लागलें ह्याप्रमाणें बाहुबल नष्ट झाल्यामुळें जातिकुल गौरवाचा त्याग करून दिल्लीचे पादशाही वंशांत पुष्कळ रजपुत राजांनीं आपल्या कन्या देऊन आपल्या जेत्यांचा संतोष संपादन केला; व दिल्लीचे बादशाहाही आपल्या शूर शत्रूंचे प्रेम ह्या असह्या बंधनांनीं जितकें दृढ होईल तितकें कर-

ण्या
दिहोज
बा
हो
हि
का
लढाईचे कामांत अथवा ......
लोकच सर्वांपुढें सदासर्वकाळ तयार असतात. यास्तव तो नेहमीं मोठमोठ्या महत्वाच्या राजकारणीं त्यांचीच योजना करीत असे.

ह्या आमच्या गोष्टीचे वर्णनकालीं जे रजपूत मोठमोठाल्या पदवीस चढले होते, त्या सर्वांत महाराजा मानसिंह हाच श्रेष्ठ होता. तो स्वतः अकबर पुत्र सेलिम, याचा शालक होता. आजिमखान आणि शाहबाजखान हे दोघेही ओरिसाचे कामगिरीवर नालायक जाणून अकबरानें मानसिंहाला बंगाल आणि बहार, या प्रांतांचा प्रतिनिधि करून त्यास त्या कामगिरीवर धाडिलें होतें.

बंगाली सालाचे ९९७ वे वर्षीं मानसिंह पाटणा येथें पोहोंचला. तेथें जाऊन त्यानें प्रथम बंडावा शांत केला व दुसरे वर्षी तो ओरिसा जिंकण्याचे उद्देशानें तिकडे जाण्यास निघाला. मानसिंह प्रथम पाटणा येथें पोहोंचला तेव्हां तें शहर आपणांस रहाण्यास योग्य आहे असें पाहून त्यानें तेथें रहाण्याचा निश्चय केला; व बंगालचें राज्य चालविण्याकरितां त्यानें सय्यदखानाला आपला प्रतिनिधि

प्रकरण

णाला,
लोप
त्याचें
ठत्रावें

ाला,
ामी
पाठविलें होतें

का, ... एकत्र करण्याला मला पुष्कळ वेळ लागेल, इतकेंच नाहीं तर लष्कराची तयारी करतां करतां पर्जन्य सुरू होईल. याकरितां आपण हा पावसाळा संपेपर्यंत कोठें सुस्थळीं छावणी देऊन राहावें. पावसाळा संपतांच मी लष्कर घेऊन निघतों. राजा मानसिंह हें ऐकून अगदीं खिन्न होऊन गेला आणि मुकाट्यानें त्याच्या सांगण्याप्रमाणें दारकेश्वराजवळ जहानाबाद गांवीं छावणी देऊन बसला, आणि सैय्यदखानाच्या येण्याची वाट पाहूं लागला.

तो तेथें राहिला असतां त्यास असें कळलें कीं, आपली लढाईचे कामीं दिरंगाई पाहून कतलुखानाला मोठी हिंमत येऊन तो जहानाबादेच्या आसपासचीं गांवें लुटीत आहे. तें ऐकून राजा फार चिंताक्रांत होऊन गेला. शत्रूबळ किती आहे, तो कोठें आहे, काय करीत आहे, ही सर्व माहिती कळावी म्हणून आपल्या एका धैर्यवान् सेनापतीला पाठविण्याचा त्यानें बेत केला. राजा मानसिंहाबरोबर त्याचा प्रिय पुत्र जगत्सिंह हाही लढाईस आला होता. जगत्-

---

## प्रकरण ४ थें

### नवा सेनापति.

शैलेश्वराच्या मंदिरांतून निघाल्यानंतर जगत्सिंह नीट आपल्या पित्याच्या छावणींत आला. नंतर महाराज मानसिंह यांस पुत्राच्या सांगण्यावरून असें कळून आलें कीं, सुमारें ५० हजार पठाणांचें सैन्य धरपुर गांवाजवळ छावणी देऊन राहिलें असून आसपासचीं गांवें लुटीत आहे, आणि ठिकठिकाणीं नवे नवे किल्ले बांधीत आहे, अथवा आपल्या ताब्यांत करून घेत आहे; व त्या योगानें तें एकाप्रकारें निर्भय होऊन बसलें आहे. हें वृत्त ऐकून राजा मानसिंहानें, या पठाणांच्या बंडाचा होईल तितक्या जलदीनें मोड केलाच पाहिजे, असा निश्चय केला. पण तसें करणें त्यावेळीं कठीण असल्यामुळें त्या कामीं कांहीं निर्णय करावा म्हणून आपणाबरोबर आणिलेल्या सर्व सेनापतींस एकत्र

…गार; लढाइंत एक हार त्यांनीं खाल्ली असे समजा, म्हणून त्यांचा नाश करून टाकण्यास अथवा त्यांस पार हांकून देण्यास आपणांत थोडेंच सामर्थ्य आहे! ते बिनहरकत किल्ल्यांत शिरून बसतील. आपण उभयपक्षीं विचार करून पाहूं. जर शत्रूंनीं रणांगणीं आपणांस पराजित केलें, तर आपण त्यांचे हातीं निराश्रित सांपडून आपला सर्वस्वी नाश होईल. करितां असल्या गैरवाजवी हिमतीवर भार ठेवून प्रसंगीं दिल्लीश्वरानें आपल्या हवालीं केलेल्या एवढ्या सगळ्या सेनेचा नाश होण्याचा मात्र संभव आहे. बरें इकडे ओरिस्याच्या जयाची आशा सोडावी तर तेंही मला वाजवी दिसत नाहीं; सैय्यदखानाच्या येण्याची वाट तर पाहिलीच पाहिजे; पण तोंपर्यंत शत्रूला योग्य शासन करण्यास कांहीं सुलभ उपाय काढिला पाहिजे. तेव्हां या कामीं तुम्हीं सर्वजण काय मसलत देतां?'

वृद्ध वृद्ध सेनापती एकत्र होऊन त्यांनीं आपला एक विचार करून कळविलें कीं, या प्रसंगीं आपण सैय्यदखानाच्या येण्याची वाट पहात जहानाबादेस रहावें हेंच आम्हांस बरें दिसतें. हें ऐकून राजा मानसिंह म्हणाला,

मानसिंह ह्मणाला, [illegible]
तुटून पडावें अशी माझी मुळींच इच्छा नाहीं; ह्या सैन्यानें आपली छावणी कोठें तरी गुप्त ठिकाणीं देऊन त्या गांवें लुटणाऱ्या पठाणांच्या सैन्याला थोडीशी तरी दहशत बसवावी ह्मणजे झालें.'

हें ऐकून तो मोंगल सेनापति ह्मणाला 'पण महाराज, असा कोणता सेनापति या काळाच्या दाढेंत शिरण्यास तयार आहे?'

मानसिंह तें ऐकतांच भिवया वर चढवून ह्मणाला, काय इतके रजपूत आणि मोंगल असतां त्यांत ज्याला मृत्यूचें भय नाहीं, असा एकही नाहीं काय?'

हें ऐकतांच पांचसात मोंगल व रजपूत पुढें सरसावून 'महाराज, हा दास जाण्यास तयार आहे.' असें आपआपलेपरी बोलेले. त्यांत जगत्‌सिंहही उभा राहिला होता. तो त्या सर्वांत वयानें लहान होता. तो सर्वांचे मागून ह्मणाला, 'हुकूम होईल तर हाही दास दिल्लीश्वराचें कार्य फत्ते करून येईन ह्मणतों.

... सर्वापेक्षां कमी ... काम फत्ते करून येण्यास जो तयार असेल त्याकडेच हें कार्य सोंपविण्यांत यावें.'

हें ऐकून राजा ह्मणाला, 'बरोबर आहे, तुह्मी योग्य सल्ला दिलीत.' नंतर त्यानें त्या उभे राहणारांपैकीं प्रथम उभे राहणाऱ्यास विचारलें, 'तुह्मी आपल्याबरोबर किती लष्कर नेऊं इच्छितां?' त्या सेनापतीनें उत्तर केलें, 'मला १५,००० पायदळ दिलें असतां मी हें कार्य शेवटास नेईन.'

राजा ह्मणाला, 'या छावणींतून पंधरा हजार माणसें गेल्यावर मग येथें तळावर कितीशीं शिल्लक राहणार! काय कोणी दहा हजार लष्कर घेऊन जाण्यास तयार नाहीं?'

तें ऐकून ते सर्व सेनापति चुप होऊन एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. शेवटीं राजाचे प्रीतींतील कोणी यशवंतसिंह नामें करून होता, त्यानें त्या उभे राहिलेल्या रजपूत सेनापतीस राजाज्ञा मानण्याविषयीं विनविलें. राजा हृष्टचित्तानें सर्वांकडे न्याहाळून पाहूं लागला. कुमार जगत्-सिंह तर त्याच्या तसल्या दृष्टीचा अभिलाषी होऊनच उठला

होता. त्याच्याकडे राजाची दृष्टि वळतांच तो नम्र होऊन बोलूं लागला, 'महाराज! महाराजांची कृपा होईल तर हा दास फक्त पांच हजार माणसांची मदत घेऊन कतलुखानला सुवर्णरेखा नदीपार घालवून येईल.'

राजा मानसिंह हें ऐकून आश्चर्य पावला. सर्व सेनापती परस्परांच्या कानांत कुजबुजूं लागले. नंतर कांहीं वेळानें णाला, 'पुत्रा! मी जाणतों कीं तूं रजपूत कुळाचें भूषण आहेस, पण तूं ही गैरवाजवी हिम्मत करीत आहेस.'

जगत्सिंह हात जोडून विनंतिपूर्वक म्हणाला–'जर प्रतिज्ञा पालन न करितां बादशहाचें सैन्यबळ कमी करून परत येईन तर राजदंड मी खचित भोगीन.'

हें ऐकून मानसिंह थोडा वेळ विचार करून ह्मणाला, 'मी तुझ्या रजपूत कुलधर्म प्रतिपालनाच्या कामीं कदापि हरकत करणार नाहीं, तूं या कार्यार्थ खुशाल जा.'

असें बोलतां बोलतां त्याचे नेत्र पुत्रप्रेमामुळें भरून आले. त्यानें आपल्या पुत्रास दृढालिंगन दिलें, आणि दरबार बरखास्त केल्यावर सर्व सेनापती आपआपल्या जागीं गेले.

# प्रकरण ५ वें

## गडमांदारण.

ज्या रस्त्यानें विष्णुपूर प्रदेशांतून जगत्सिंह जाहानाबादेस परत येत होता, त्या मार्गाचीं चिन्हें अद्यापिही स्पष्ट दिसण्यांत येत आहेत. त्याच्या कांहीं दक्षिणेला गडमांदारण गांव आहे. ज्या स्त्रियांची व त्याची मंदिरांत भेट झाली

होती, त्या स्त्रिया मंदिरांतून याच गांवीं निघून गेल्या होत्या.

या गडमांदारण गांवांत कित्येक जुने किल्ले होते, व ह्मणूनच त्याला गडमांदारण असें नांव प्राप्त झालें होतें. ह्या गांवांतून आमोदर नांवाची नदी वाहात होती. एका ठिकाणीं नदीचें इतकें वांकण घेतलें होतें कीं, ति... त्र-ळील त्रिकोणाकृति जमिनीच्या भागाला दोहों ... घेरा घातल्यासारखें झालें होतें. तिसऱ्या बाजूवर मानवीकृतीचा एक गड होता, या त्रिकोणाकृति भूमीच्या पुढल्या बाजूनें नदी वक्रगतीनें अजूनही वाहत आहे. ते वेळी तेथें पाण्याच्या पृष्ठभागापासून वर थेट आकाशपथानुगामी एक मोठा किल्ला विराजमान झालेला होता. किल्ल्याचे आंत मोठमोठाल्या हवेल्या खालपासून वरपर्यंत एकजात काळ्या दगडांनीं बांधून काढलेल्या होत्या. चोहोंबाजूंनीं नदीचा प्रवाह मोठ्या जोरानें वाहत होता. अद्यापि सुद्धां गडमांदारण गांवांत या मोठ्या किल्ल्याचा पाया प्रवाशी लोकांच्या पाहण्यांत येत आहे. आतां किल्ल्याचा खालचा भाग मात्र दृष्टीगोचर होतो; त्यांतील त्या पूर्वीच्या हवेल्या काळाच्या अत्युग्र स्पर्शानें धुळीस मिळून गेल्या आहेत; त्याच्यावर, चिंचा, वड वगैरे वृक्ष तशाच नाना प्रकारच्या वेली वाढून त्याचें एक दाट जंगल बनून राहिलें आहे, व त्यायोगें तें स्थान मोठाले भुजंग, अस्वलें वगैरे हिंसक जनावरांचें आश्रयस्थान झालें आहे. नदीच्या पलीकडील बाजूस दुसरे कित्येक किल्ले होते, व त्यांतही दुसरे मोठे सरदार रहात असत; पण त्याचा आपल्या ह्या गोष्टींशीं कांहीं संबंध नाहीं. असो.

ज्या वेळीं दिल्लीचा बादशाहा बालीन हा आपलें सर्व सैन्य घेऊन बंगाल प्रांत जिंकावयास आला होता, त्यावेळीं त्याचेबरोबर जयधरसिंह नामें एक रजपूत सरदार आला होता; ह्याच सरदाराच्या शौर्यानें बादशाहास जयप्राप्ति झाल्यामुळें त्यानें हा गडमांदारण गांव त्यास जहागीर दिला होता. पुढें ह्या पुरुषाचे वंशज दिवसानुदिवस बलिष्ठ होत गेले, व त्यांनीं वर निर्दिष्ट केलेला किल्ला बांधून नवीन प्रांत कमावून ते दिल्लीश्वरालाही मानीतनासे झाले होते. आपले कथानकाचे समयीं ह्मणजे बंगाली शक ९९८ त, ह्या किल्ल्यांत वीरेंद्रसिंह नांवाचा जयधरसिंहाचा एक वंशज राहत होता.

भर तरुण्यांत असतां वीरेंद्रसिंहाचें व त्याच्या बापाचें पटत नसे. वीरेंद्रसिंह हा स्वभावानें दांभिक आणि उतावळा होता; तो बापाचें कधींच ऐकत नसे, त्यामुळें बापलेकांत नेहमीं भांडन होत असे. मुलाच्या लग्नासाठीं त्या वृद्ध जमीनदारानें आपल्या जातीच्या दुसऱ्या एका जमीनदाराची कन्या नेमस्त केली होती. कन्येचा बाप निपुत्रिक होता, व म्हणून या लग्नसंबंधामुळें वीरेंद्राच्या संपत्तींत जास्त भर पडण्याचा विशेष संभव होता, आणि कन्याही चांगली सुस्वरूप होती, त्यामुळें तो संबंध त्या वृद्धाला फार आवडला होता. तो लग्नसामुग्रीच्या तयारीसही लागला, पण वीरेंद्र त्या गोष्टीस कबूल नसून त्यानें त्याच गांवच्या एका पतिपुत्रविरहित स्त्रियेच्या कन्येशीं गुप्त रीतीनें आपला विवाह अगोदर उरकून घेतला होता. वृद्धाला ती गोष्ट कळतांच अत्यंत क्रोधायमान होऊन त्यानें आपल्या मुलाला घरांतून

काढून दिलें. तो तरुण घरांतून बाहेर पडल्यावर, साधल्यास कोठें लष्करांत नोकरी करावी, असा संकल्प करून दिल्लीस निघून गेला. त्यासमयीं त्याची स्त्री गर्भवती होती; म्हणून त्यानें तिला आपल्याबरोबर घेतलें नाहीं. ती आपल्या आईच्या झोंपडींतच राहत असे.

अशा प्रकारें पुत्र निघून गेल्यावर, कांहीं कालानें त्या वृद्ध जमीनदाराचें अंतःकरण पुत्रविरहामुळें व्याकूळ होऊं लागलें. झाल्या गोष्टीचा त्याला विसर पडून तो आपल्या पुत्राचा शोध करूं लागला, पण त्यांत त्यास यश आलें नाहीं. पुत्राचा कांहींच समाचार कळेना, तेव्हां विचार करून पुत्राच्या जागींच त्याची धर्मपत्नी आहे असें मानून त्यानें तिला तिच्या गरीब आईच्या घरांतून सुमुहूर्तीं आपले घरीं सन्मानपूर्वक आणून ठेविलें. यथाकालीं तिनें एका कन्यारत्नाला जन्म दिला. त्यानंतर कांहीं दिवसांनीं तिनें तेथेंच असतांना परलोकची वाट धरिली.

वीरेंद्र हा दिल्लींत पोंचल्यावर त्यानें मोंगल बादशहाचे ताब्यांतील एका रजपूत सैन्यांत शिपायाची नोकरी पत्करली. थोड्याच काळांत त्याच्या अंगच्या गुणांनीं तो मोठ्या हुद्यास चढला. कित्येक वर्षांनीं वीरेंद्रानें चांगलें यश संपादून, असंख्य द्रव्याचा संचय केला; इतक्यांत त्याला पित्याच्या मृत्यूची वार्ता कळली. तेव्हां परदेशांत मुशाफरी करींत परवशता कबूल करून काल क्रमीत राहणें, निरर्थक जाणून तो स्वदेशीं परतला. त्यासमयीं याजबरोबर दिल्लीहून अनेक आश्रित माणसें आलीं होतीं. त्यांत एक दासी आणि एक परमहंस होता. या आद्या-

यिकेंत या दोघांचा संबंध वारंवार येणार असल्यामुळें, त्यांचा येथें आमच्या वाचकांस थोडाबहुत परिचय अवश्य करून दिला पाहिजे. त्या दासीचें नांव विमला असें असून, त्या परमहंसाचें नांव अभिरामस्वामी असें होतें.

ह्यापूर्वींच विमलेचें आह्मी दासी ह्मणून वर्णन केलेंच आहे, व तें आतांही आमचें कायमच आहे; तिला कांहीं पगारही मिळत असे, असे लोक ह्मणत असत. असो.

विमला घरांतील कामकाज व त्यांतही विशेषेंकरून वीरेंद्राच्या कन्येचें लालनपालन करण्यांत गुंतलेली असे. याशिवाय तिचें ह्या आमच्या किल्ल्यांत राहण्याचें दुसरें कांहीं कारण दिसण्यांत येत नसे, व ह्मणूनच तिला आह्मांला दासी ह्मणावें लागत आहे. पण तिच्यांत दासीचें कांहींही लक्षण दिसत नसे. ती घरांत एखाद्या यजमाननीप्रमाणें वापरत असे व त्याप्रमाणें तिचा मानपानही राहत असे. घरचीं सर्व माणसें तिचा शब्द कधींही खाली पडूं देत नसत. तिचें मुख पाहतांच वाटे कीं, विमला ही भर तारुण्यांत असतां फारच सुंदर असली पाहिजे. इतकें वयही झालें असतां तिचें रूप प्रभातसमयीं अस्तास चाललेल्या चंद्रबिंबाप्रमाणें दिसत असे. गजपतिविद्यादिग्गज नांवाचा अभिरामस्वामीचा एक शिष्य होता, तो अलंकारशास्त्रांत कुशल होता कां नव्हता कोण जाणे, पण त्याला आपली रसिकता प्रगट करण्याची तृष्णा अति प्रबळ असे. तो विमलेला पाहून ह्मणे:—‘हिची पात्रांत घातलेल्या घृताप्रमाणें स्थिति आहे. मदनरूपीं आग जसजसी थंड पडत जाते, तसतसें हिचें शरीर अधिक मजबूत होत आहे.’ येथें इतकें सांगून ठेविलें पाहिजे कीं, ज्या

दिवशीं गजपतिविद्यादिग्गजानें अशा प्रकारें आपली रसिकता प्रगट केली होती, त्या दिवशीं विमलेनें त्याचें नांव ' रसिकदासस्वामी ' असें ठेविलें होतें.

हावभाव शिवाय करून विमलेची चाल चलणूक, तशीच बोलण्याचा थाट इतका सभ्य असे कीं, ते गुण एखाद्या दासींत सांपडणें अगदींच असंभवनीय होत. पुष्कळांचें मत असें होतें कीं, विमला ही बहुत वर्षें मोंगल बादशहाचे घरांत नांदत होती. तें त्याचें मत खरें कीं खोटें, तें एक विमलेचें विमलेसच ठाऊक. ती कधीं त्याविषयीं मुखावाटें एक चकार शब्दही काढीत नसे.

विमला विधवा आहे कीं सधवा आहे, हेंही मोठें गूढ होतें. ती अंगावर दागदागिने घालीत असे, पण एकादशी कांहीं करीत नसे. एकंदर एखाद्या सौभाग्यवतीप्रमाणेंच तिचें आचरण असे.

दुर्गेशनंदिनी, तिलोत्तमेवर विमलेचा फारच जीव असे. ह्या गोष्टीचा परिचय आह्मी देवमंदिरांत आमचे वाचकांस करून दिला आहेच. तिलोत्तमेचीही विमलेवर तशीच प्रीति होती. वीरेंद्रसिंहाचा दुसरा सोबती अभिरामस्वामी; तो नेहमीं किल्ल्यांतच राहत असे असें नाहीं. मधूनमधून तो प्रवासास जात असे. महिना दोन महिने किल्ल्यांत, तर एक दोन महिने प्रवासांत. अशा रीतीनें तो काळ घालवी. घरच्या तसेंच बाहेरच्या माणसांचा असा समज होऊन गेला होता कीं, हा स्वामी वीरेंद्राचा दीक्षा गुरु असावा, वीरेंद्रही त्याचा मानमरातब तसाच राखीत असे, व त्यावरून त्यांचा असा समज होणें अगदीं साहजिक होतें. इतकेंच नव्हे

तर वीरेंद्र कांहीं करणें झाल्यास त्याची मसलत घेतल्या-
विना कधींही करीत नसे; आणि गुरुजींनीं दिलेली मसलत
ही बहुधा सफल होत असे. अभिरामस्वामी हे अतिशय
दूरदर्शी व तीक्ष्णबुद्धीचे होते. त्यानें स्वतःव्रतधर्मी रत राहून
संसारिक बहुतेक विषयांत रिपुसंयम करण्याचा अभ्यास
केला होता, व त्यामुळें प्रसंगीं रागक्षोभादिकांचें दमन
करून स्थिरचित्तानें त्याला विषयालोचना चांगली करितां
येत असे. यास्तव, अशा प्रसंगीं अधीर, दांभिक वीरेंद्र-
सिंहाच्या मसलतीपेक्षां त्याची मसलत फलप्रद होई, यांत
नवल तें काय ?

विमला आणि अभिरामस्वामी यांच्याशिवाय अस्मानी
नांवाची एक दासी वीरेंद्रासमवेत आली होती.

# प्रकरण ६ वें

## अभिरामस्वामींचा सल्ला.

तिलोत्तमा आणि विमला शैलेश्वराच्या मंदिरांतून
निघाल्या, त्या निर्विघ्न किल्ल्यांत येऊन पोहोंचल्या. त्यांना
येऊन तीन चार दिवस झाल्यावर एकेदिवशीं वीरेंद्रसिंह
आपल्या दिवाणखान्यांत गादीवर बसला आहे, इतक्यांत
अभिरामस्वामी तेथें येऊन प्रविष्ट झाले. वीरेंद्रसिंहानें
त्यांस उत्थापन देऊन प्रणिपात केला. अभिरामस्वामी वी-
रेंद्रसिंहानें पुढें केलेल्या दर्भासनावर बसले. स्वामींनीं
वीरेंद्रसिंहास बसावयास सांगितल्यावर तोही आपल्या स्थानीं

बसला. नंतर अभिरामस्वामी ह्मणाले ‘ वीरेंद्रा ! तुला आज कांहीं विशेष सांगावयाचें आहे.’

वीरेंद्र ह्मणाला, ‘ सांगावें.’

अभिरामस्वामी ह्मणाले, ‘ आजकाल मोंगल व पठाणांची मोठी लढाई जुंपून राहिली आहे.’

वीरेंद्र ह्मणाला, ‘ होय; पण काय कांहीं विशेष प्रकार घडून येण्याचा संभव आहे ह्मणतां ?’

स्वामींनीं विचारिलें, ‘संभव असल्यास तुझा काय निश्चय झाला आहे ? ’

वीरेंद्रानें अभिमानपूर्वक उत्तर केलें, ‘ जरकरितां शत्रु येथें चालून आला, तर त्यास मी आपल्या बाहुबळाचें काय सामर्थ्य आहे तें दाखवीन. ’

परमहंस त्याहीपेक्षां जरा जास्त मृदु स्वरानें ह्मणाले, ‘ तुझ्यासारख्या वीराला उचित, तेंच तूं बोललास. परंतु सांगण्याचें ह्मणून इतकेंच कीं, केवळ अंगीं वीरत्व असलें ह्मणजे जय येतोच असें नसून तो येणें न येणें हें आपल्या यथानीति संधिविग्रह करण्यावर अवलंबून असतें. तूं स्वतः वीरपणाच्या मदांत गढून गेला आहेस, परंतु नीट विचार करून पहा. तुझी सेना फार फार तर एक हजार असेल आणि एवढ्या बळावर तूं काय करशील ! कोणीही मोठा लढवय्या झाला ह्मणून फक्त हजार लष्करानिशीं आपल्यापेक्षां संख्येनें शंभरपटीनें जास्त असलेल्या शत्रूंवर जाऊन काय करील ? मोंगल आणि पठाण यांचें सैन्यबळ प्रत्येकीं तुजपेक्षां शंभरपटीनें अधिक असून बलवान्ही तसेंच आहे. याकरितां या दोहोंपैकीं एका बाजूची तरी तुला

मदत असल्याशिवाय तुझा बचाव होणें अगदीं अशक्य आहे. मीं असें म्हणतों ह्मणून तूं नाराज होऊं नकोस. चित्त स्थिर करून नीट विचार करून पहा. आणि दुसरें तुला हेंही पण सांगतों कीं, दोन्ही पक्षांबरोबर वैर करण्याची तुला काय जरूर आहे ? शत्रु म्हटला कीं, कोणीही असला तरी तो दुष्टच असला पाहिजे. तेव्हां तूंच सांग बरें, कीं दोन शत्रु चांगले कीं एक चांगला ? आणि एवढ्याच करितां तूं माझ्या सांगण्याचा नीट दूरवर विचार कर.'

वीरेंद्र यावर बराचवेळ सचिंत होऊन बसला, आणि नंतर म्हणाला, 'तर मग आपण कोणता पक्ष स्वीकारण्याविषयीं सांगतां बरें ?'

अभिरामस्वामींनीं उत्तर दिलें, 'यतो धर्मस्ततो जयः' जो पक्ष स्वीकारिला असतां अधर्मी गेलों असें होणार नाहीं, तो पक्ष स्वीकार. पहा राजविद्रोहिता हें एक महत्पाप आहे, करितां तूं राजपक्ष अवलंबन कर.'

कांहीं थोडा वेळ विचार करून वीरेंद्र म्हणाला, 'राजा कोण ? कारण मोंगल काय आणि पठाण काय, दोघेही राजत्व मिळविण्यासाठींच लढत आहेत.'

अभिरामस्वामी म्हणाले, 'जो करभार घेतो तो राजा.'

वीरेंद्रानें पुसलें, 'कोण अकबरशहा ?'

स्वामींनीं उत्तर केलें, 'होय, तोच.'

हें ऐकतांच वीरेंद्रानें अगदीं अप्रसन्न वदन केलें; हळू हळू त्याचे नेत्र आरक्त दिसूं लागले; तें पाहून अभिरामस्वामी म्हणाले, 'वीरेंद्रा, असा क्रोधास चढूं नकोस. अरा

शांत हो. मी तुला दिल्लीपतीला अनुगत होण्याविषयीं सांगितलें, मानसिंहाला नाहीं !'

वीरेंद्रानें आपला उजवा हात लांब करून परमहंसाला दाखविला; आणि डाव्या हाताचीं बोटें उजव्या हातावर मारून म्हणाला, 'आपल्या पादपद्मांच्या आशीर्वादानें हा हात मानसिंहाच्या रक्तांत भिजवीन.'

हें ऐकून अभिरामस्वामी म्हणाले, 'धीर धर, असा क्रोधांध होऊन आपलें कार्य बिघडवूं नकोस. मानसिंहानें पूर्वी केलेल्या अपराधांबद्दल तूं त्याचा सूड घे. पण, त्याबद्दल अकबरशहाशीं लढण्याचें तुला काय काम ?'

त्यावर वीरेंद्र मोठ्या रागानें म्हणाला, 'अकबर-शहाचा पक्ष स्वीकारिला असतां मग कोणत्या सेनापतीच्या हाताखालीं वागलें पाहिजे बरें ? कोणत्या योद्ध्याला मदत केली पाहिजे ? मानसिंहालाच कीं नाहीं ? गुरुदेव, माफ करा, हा देह आहे तोंपर्यंत तरी हें काम वीरेंद्रसिंहाकडून कदापि होणें नाहीं !'

अभिरामस्वामी अगदीं दिलगीर होऊन स्तब्ध बसले. थोड्या वेळानें ते म्हणाले, 'पठाणाला मदत करावी हें तुला चांगलें वाटतें कां ?'

वीरेंद्रानें उत्तर दिलें, 'पक्षापक्षांत प्रभेद करावा हें तरी चांगलें कां ?'

स्वामी बोलले, 'होय, पक्षापक्षांत प्रभेद करणें बरें, असें निदान मला तरी वाटतें.'

वीरेंद्र म्हणाला, 'तर मग पठाणालाच मदत करावी हेंच मला बरें दिसलें.'

अभिरामस्वामी दीर्घ श्वास सोडून स्तब्ध बसले. त्यांचे नेत्र अश्रूंनीं अगदीं भरून आले. तें पाहून वीरेंद्र फार आश्चर्य पावून म्हणाला, 'गुरो! माफ करा, मीं अजाणतां कांहीं अपराध केला असल्यास तो या दासास निवेदन करा.'

तदनंतर अभिरामस्वामी आपल्या उत्तरीय वस्त्रानें डोळे पुशीत पुशीत म्हणाले, 'ऐक तर मग. मी आज कित्येक दिवस ज्यौतिषगणित करीत आहें. तुझ्यापेक्षां तुझी ही कन्या माझ्या स्नेहाला जास्त पात्र आहे, हें तुला पूर्णपणें माहीत आहे. सहजगत्या तिच्यासंबंधानें मी अनेक प्रकारचें गणित करून ठेविलें आहे.' हें ऐकतांच वीरेंद्राचा चेहरा अगदीं फिक्का पडून गेला. तो फारच आतुर होऊन परमहंसाला विचारूं लागला, 'गणितांत आपल्याला काय काय आढळून आलें बरें?' परमहंसांनीं सांगितलें. 'असें कीं, मोंगलांच्या सेनापतीपासून तिलोत्तमेचें फार वाईट होणार आहे!' हें ऐकतांच वीरेंद्रसिंहाचें मुख अगदीं पांढरें फटफटीत पडून गेलें. अभिरामस्वामी म्हणाले, 'तूं या मोंगलांच्या विरुद्ध पक्षाला मिळण्यानेंच तिलोत्तमेचें अमंगल होण्याचा संभव आहे. तिच्या पक्षास मिळालें असतां तसा योग नाहीं, आणि याकरितां मी तुला मोंगलांचा पक्ष स्वीकारण्यास एवढावेळ सांगत आहे. ही गोष्ट सांगून तुला न दुखवावें असा मी विचार केला होता, पण मनुष्याचा यत्न फुकट आहे. नशीबाचा लेख कधींही चुकणें नाहीं. नाहींतर काय म्हणून तूं इतका हट्ट धरून बसला असतास?'

वीरेंद्रसिंह गप्प राहिला. अभिरामस्वामी म्हणाले, 'वीरेंद्रा, बाहेर दरवाज्यावर कतलुखानाचा दूत येऊन उभा आहे. मी त्याला पाहिल्याबरोबर तुजकडे निघून आलों आहे. आणि माझ्या सांगण्यावरूनच तो आल्याचा निरोप चोपदारानें तुला इतका वेळ कळविला नाहीं. आतां मला जें कांहीं सांगावयाचें होतें तें मी तुला सांगितलें आहे. त्या दूताला बोलावून योग्य तो जबाब दे.' वीरेंद्रसिंह कपाळावर हात मारून वर पाहूं लागला. तो म्हणाला, 'गुरुदेव! मी जोंपर्यंत तिलोत्तमेला दृष्टीनें पाहिलें नव्हतें तोंपर्यंत ती माझी कन्या आहे म्हणून तिचें मला स्मरणही होत नव्हतें. आतां तिलोत्तमेशिवाय या दुनियेंत मला कोणी नाहीं, मला आपली आज्ञा शिरसावंद्य आहे. आजपासून मागलें सारें विसरून जाऊन मानसिंहाचा अनुयायी होईन.' 'चोपदारा! त्या दूताला मजकडे घेऊन ये.'

हुकमाप्रमाणें चोपदार त्या दूताला त्याजकडे घेऊन आला. दूतानें कतलुखानचें पत्र त्याला दिलें. पत्रांतील सारांश इतकाच होता कीं, 'एक हजार घोडेस्वार आणि पांच हजार मोहरा माझ्या छावणींत पाठवून दे, नाहींतर मी वीस हजार लष्कर घेऊन गडमांदारणावर चालून येईन.'

वीरेंद्रसिंह पत्र वाचून म्हणाला, 'दूता! तूं आपल्या धन्याला सांग, कीं लष्कर लवकर पाठवून द्यावें.' दूत मुजरा करून निघून गेला.

विमला वरील सर्व हकीगत आडून ऐकत होती.

## प्रकरण ७ वें

### असावधानता.

आमोदर नदी किल्ल्याच्या ज्या भागाच्या भिंतीवर आद-ळून खळखळ आवाज करीत वहात होती, त्या बाजूच्या एका खिडकींत बसून तिलोत्तमा नदीच्या प्रवाहाकडे पहात बसली होती. संध्याकाळ होत चालली होती; पश्चिमेकडील आकाशांत दिनमणि अस्ताचलासमीप गेल्यामुळें त्याच्या त्यावेळच्या किरणांनीं मेघांनीं कांचनमय कांति धारण केली होती. हे सोनेरी ढग व पूर्ण निळ्या रंगाचें आकाश, ह्यांचे प्रतिबिंब नदीच्या वाहत्या पाण्यांत पडून एक अपूर्व शोभा दिसत होती. नदीपलीकडील मोठमोठ्या इमारती व उंच-उंच वृक्ष एखाद्या चित्राप्रमाणें त्या स्वच्छ आकाशपटावर दिसत होतीं. किल्ल्यांत मोर सारसादि पक्षी मोठ्या आनं-दानें टाहो फोडून राहिले होते. आकाशांत कांहीं पक्षी रात्र होत आल्यामुळें आपआपलीं घरटीं शोधण्याच्या नादांत शब्द न करितां तसेच उडत होते. संध्याकाळचा वारा पूर्ण मोहरानें भरलेल्या आंबराईवरून येऊन व नदीच्या स्पर्शानें शीतल होऊन आमच्या खिडकींत बसलेल्या तिलो-त्तमेच्या कुरळ्या केसांना व मधून मधून तिच्या सुंदर वस्त्रांना मोठ्या आदबीनें स्पर्श करीत होता. असो.

तिलोत्तमा सुंदर होती. आमच्या वाचकांस त्या सुंदरीचा रूपानुभव करून द्यावा अशी आमची इच्छा आहे खरी, पण कोणत्या रीतीनें त्या रूपराशीचा अनुभव करून द्यावा बरें ? वाचकहो ! तुम्ही कधीं आपल्या भर तारुण्यामध्यें

एखाद्या स्थिर, धीर, कोमलप्रकृति मुग्धेचें नवसंचरित सौंदर्य प्रेमदृष्टीनें पाहिलें आहे काय? फक्त एकवारच पाहून ज्या सौंदर्याचें माधुर्य मानव आजन्म विसरत नाहीं, मुग्धावस्थेंत, तारुण्यांत, प्रगल्भवयांत, कामकाज करीत असतां विश्रांति घेत असतां, जागृत असतां, निद्रिस्थ असतां, ज्या मनमोहिनीची मूर्ति स्मरणपथावरून एकसारखी जा ये करित्ये, व इतकेंही करून जिचेसंबंधानें चित्ताला मालिन्य आणणारी एकही लालसा उत्पन्न होत नाहीं, अशी एखादी तरी तरुणी तुह्मीं पाहिली आहे काय? जर पाहिली असेल, तरच मात्र तिलोत्तमेच्या सौंदर्याची कल्पना तुह्मांला करितां येईल. जी मूर्ति सौंदर्याच्या प्रभेच्या प्राचूर्यानें मन प्रदीप्त करते, जी मूर्ति लीलालावण्य इत्यादिकांच्या सुव्यवस्थेनें हृदयांत विषधराच्या दांताच्या रोंविण्याप्रमाणें भावना उत्पन्न करित्ये, ती ही मूर्ति नव्हे, तर जी मूर्ति कोमलता, मधुरतादि गुणानीं चित्त संतुष्ट करत्ये, ती ही मूर्ति आहे. जी मूर्ति संध्याकाळच्या वाऱ्यानें हालणाऱ्या वसंत ऋतूंतील एखाद्या लतेप्रमाणें स्मृतिमध्यें सारखी डुलत राहते, ती ही मूर्ति आहे.

तिलोत्तमेचें वय सोळा वर्षांचें होतें, त्यामुळें तिच्या शरीरावयवांना प्रगल्भ दशेंतील स्त्रीयेच्या अवयवांचें पूर्णत्व अद्याप आलें नव्हतें. तिचे शरीरावर व तोंडावर अजून किंचित् बालिकाभाव दिसत होता. तिचें तें गोंडस, सुगोल कपाल, फार मोठेंही नव्हतें व फार लहानही नव्हतें. रात्रीं एखाद्या नदीच्या पाण्यावर चांदणें पडून जशी त्या ओघाची शांतता आपल्या मनावर एक प्रकारचा ठसा उमटवित्ये, त्याप्रमाणें हा अनतिविस्तृत कपा-

ळाकडे पाहिलें म्हणजे ही मोठी शांत स्वभावाची आहे, असें स्पष्ट दिसून येत असे. ह्या कपाळाच्या मागें काळेभोर व कुरळे असे तिचे केंस तिच्या मस्तकावरून मानेवर व मानेवरून पाठीवर पायापर्यंत लोळत होते. हा केशजाल तोंडावर येऊं नये म्हणून ही अलकराशी मस्तकाचे मागले बाजूस एका मोत्याच्या माळेनें बांधून ठेविली होती. तिच्या भिंवया, उत्तम बांकदार, काळ्याभोर व एखाद्या चितार्‍यानें काढिल्याप्रमाणें होत्या; परंतु त्या थोड्या अधिक बारीक होत्या; त्या एक सूतभर जर अधिक जाड्या असत्या तर पूर्ण निर्दोष झाल्या असत्या. वाचकहो ! तुम्हांला डोळे चंचल आवडतात काय ? तर मग तिलोत्तमा तुमच्या मनाला रंजविणारी होणार नाहीं. तिलोत्तमेचे डोळे अति शांत होते. त्यांमधून 'विद्युद्दामस्फुरणचकित' असे कटाक्ष कधींही निघत नसत. दोन्ही डोळे अति प्रशस्त, अति सुंदर व अति शांतज्योती होते. तिच्या डोळ्यांचा रंग उषःकालीं सूर्योदयाच्या किंचित् पूर्वी व चंद्रअस्ताचे वेळीं आकाशाचा जो कोमल नीलवर्ण असतो, त्याप्रमाणें होता. जेव्हां जेव्हां तिलोत्तमा असल्या प्रशस्त व सुंदर डोळ्यांनीं पाही, तेव्हां तेव्हां त्या पाहण्यांत कुटिलतेचा यत्किंचितही भाग नसे. तिला अपांग व अर्धदृष्टि हीं काय असतात हें मुळींच माहीत नव्हतें. तिच्या दृष्टींत स्पष्टता व सरळता ह्याशिवाय दुसरा कोणताही भाव दिसून येत नसे. तिच्या दृष्टींत जशी सरळता असे, तशी तिच्या मनांतही असे. तिच्या त्या सुंदर डोळ्यांकडे पाहण्याचें जर कोणी मनांत आणिलें, तर ती एकदम आपली दृष्टि धरातलाकडे लावी; दुसरीकडे पहा-

तच नसे. तिलोत्तमेच्या चांपेकळीसारख्या नाकाला नथ घालण्याचे श्रम मुळींच माहीत नव्हते. तिचे दोन्ही ओंठ गुलाबी रंगाचे व रसानें तुडुंब भरलेले असे होते, व त्यांची ठेवण नेहमीं स्मितहास्याची होती. हें स्मितहास्य एकदां जरी पाहण्यांत आलें, तरी तो पाहणारा योगी असो, मुनि असो, तरुण असो वा वृद्ध असो, तो तें कधींही विसरत नसे. असें असूनही तिच्या त्या हंसण्यांत सरळता व बालिकाभाव ह्याशिवाय तिसरें कांहींही नसे.

तिलोत्तमेचा बांधा फारच चांगला होता, पण अजून तिचे शरीराची वाढ पुरी झाली नव्हती. वयानें ती लहान होती म्हणून म्हणा, किंवा तिच्या शरीराच्या स्वाभाविक बांध्यामुळें म्हणा त्या तिच्या बांध्यांत क्षीणतेचा किंवा स्थूलतेचा लवलेशही नव्हता; तथापि ह्या तन्वीच्या शरीराचा प्रत्येक भाग गोंडस व सुंदर होता. तिच्या गोंडस हातांत रत्नजडित कांकणें होतीं; तिच्या गोंडस बाहूंवर हिऱ्याचे बाजूबंद होते; तिच्या गोंडस बोटांत मुद्रिका होती; तिच्या गोंडस नितंबावर सुवर्णमेखला चमकून राहिली होती; तिच्या गोंडस खांद्यांवरून मोठा थोरला एक चंद्रहार लोंबत होता; व तिच्या त्या सुंदर गळ्यांत रत्नजडित कंठा होता; एकंदर तिच्या ह्या असल्या गोंडस बांध्यामुळें शरीरांतील प्रत्येक अवयव व त्या अवयवावरील भूषण हीं एकमेकांस फारच शोभा आणीत असत.

तिलोत्तमा खिडकींत एकटी बसून काय बरें करीत होती ? ती संध्याकाळच्या आकाशाची कां शोभा पहात होती ? बरें तसें जर म्हणावें तर तिची दृष्टि भूतलाकडे

कां बरें होती ? ती नदीतीरावरील फुलांच्या वासानें मनोहर अशी हवा कां खात होती? तर मग तिच्या कपाळावर घामाचे बिंदू कां बरें दिसत होते ? तोंडाच्या एका बाजूलाच फक्त वारा लागत होता ? ती गाईंना चारतांना कां पहात होती ? तर तसेंही नव्हतें; सर्व गायी हळूहळू घरीं केव्हांच आल्या होत्या. ती कोकिलेचा मधुर आवाज कां ऐकत होती ? तर मग तिचें तोंड एवढें कां बरें उतरलेलें दिसत होतें ? तिलोत्तमा कांहीं पहातही नव्हती व ऐकतही नव्हती; ती गाढ विचारांत गुंतली होती !

इतक्या कोणत्या बरें खोल विचारांत ती असावी? एवढ्या त्या तिच्या लहान वयांत ती कशाबद्दल बरें विचार करीत असावी? तिलोत्तमेच्या मनांत प्रथमच प्रेमसंस्काराचा प्रवेश तर झाला नाहीं ना? कदाचित् झालाही असावा.

दासीनें दिवा लावून आणिला. तिलोत्तमा विचार करण्याचें सोडून एक पुस्तक हातांत घेऊन दिव्याजवळ जाऊन बसली. तिलोत्तमेला वाचावयास येत होतें; अभिरामस्वामींजवळ ती संस्कृत वाचावयास शिकली होती. ती कोणतें बरें पुस्तक वाचीत होती? तें बाणभट्टाची 'कादंबरी' होतें. थोडावेळ वाचल्यावर कंटाळल्यासारखें करून तिनें 'कादंबरी' हातांतून टाकिली. दुसरें एक पुस्तक घेऊन आली; तें सुबंधुकृत 'वासवदत्ता' होतें; ती तें थोडावेळ वाची, थोडावेळ विचार करी, पुनः वाचावयास सुरुवात करी, व पुनः कांहीं तरी दुसऱ्याच विचारांत गर्क होई; 'वासवादत्ता' वाचल्यानेंही तिला करमणूक होईना. तेव्हां तिनें 'वासवदत्ता' हातची टाकून 'गीतगोविंद' वाचण्यास

सुरवात केली; कांहीं वेळपर्यंत तिला 'गीतगोविंद' वाचण्यानें करमणूक झाली; 'मुखर मधीरं त्यज मंजीरं रिपुमित्र केलिषु लोलम्' हा चरण वाचल्याबरोबर सलज्ज होऊन थोडेसें हंसून हातांतील पुस्तक तिनें टाकून दिलें. आतां कांहीं करावयाचें नाहीं, ह्मणून ती पलंगावरील आपले बिछान्यावर जाऊन बसली. जवळच दऊत व लेखणी पडली होती; मी काय करितें आहे हें तिला भान न राहून त्या लेखणीनें ती पलंगाचे एका बाजूवर कोठें तरी 'क,' 'स,' 'म,' 'घर,' 'द्वार,' 'झाड,' 'मनुष्य' इत्यादि शब्द लिहूं लागली. हळू हळू पलंगाची एक बाजू तर लिहून लिहून भरून गेली; जेव्हां आतां लिहावयास जागा नाहीं असें तिनें पाहिलें, तेव्हां ती शुद्धीवर आली. तिनें जें लिहिलें होतें तें वाचून तिला थोडेसें हांसें आलें; आपण काय काय लिहिलें आहे तें ती हंसत हंसतच वाचूं लागली. तिनें काय बरें लिहिलें होतें? 'वासवदत्ता,' 'महाश्वेता,' 'क,' 'इ,' 'ए,' 'प,' 'एक झाड,' 'शेजुतीचा महादेव,' 'गीतगोविंद,' 'विमला,' 'लता,' 'पानें,' 'एक,' 'दोन,' 'गड,' 'सर्वनाश;' शेवटीं तिनें काय बरें लिहिलें होतें? **'कुमारजगत्सिंह'**

'कुमारजगत्सिंह' हे शब्द तिनें एकदां, दोनदां, तीनदां, तीनदांच काय, पुष्कळ वेळां वाचिले. दाराकडे पाही व ते शब्द वाची; पुनः पाही व पुनः वाची; जणूं काय ती चोरीच करित आहे कीं काय, अशी तिची स्थिति झाली.

हीं अक्षरें पुष्कळ वेळ वाचण्याचें तिला धैर्य होईना; जर कोणी आलें तर तीं अक्षरें वाचील अशी तिला धास्ती

होती. तिनें घाईघाईनें पाणी आणून लिहिलेलें सर्व धुऊन टाकिलें, धुतलें तरी तिच्या मनाची खात्री होईना; ह्मणून तिनें आपल्या पदरानें तें सर्व पुसून टाकिलें. पुनः अक्षरें दिसताहेत कीं नाहीं, ह्मणून तिनें पाहिलें. आतां मात्र शाई-देखील दिसत नव्हती; तरी तिला वाटलें कीं, अजूनहीं हीं अक्षरें कोणाला वाचितां येतील, ह्मणून तिनें पुनः पाणी आणिलें, पुनः धुतलें, व पुनः आपल्या वस्त्रानें पुशिलें तथापि तिला वाटे कीं, **'कुमारजगत्सिंह.'**

हीं अक्षरें अजून कायमच आहेत.

---

## प्रकरण ८ वें

### विमलेची मसलत.

विमला अभिरामस्वामींच्या मठांत येऊन उभी होती, स्वामी भूमीवर योगासन पसरून त्यावर बसले होते, जग-त्सिंहाची, तिलोत्तमेची व आपली त्या दिवशीं कशी गांठ पडली तो सर्व प्रकार इत्थंभूत विमला त्यांस सांगत होती. हकीकत पुरी करून ती ह्मणाली, 'आज चौदा दिवस झाले आणि उद्यांचा पंधरावा.' अभिरामस्वामींनीं विचा-रिलें, 'मग तुझा काय निश्चय झाला आहे ?'

विमलेनें उत्तर केलें, 'योग्य सल्ला घेण्याकरितांच मी आपल्याकडे आल्यें आहें.'

स्वामी ह्मणाले, 'उत्तम; पण माझी सल्ला अशी आहे कीं, तुझी या कामीं आतां अगदीं मन घालूं नये.'

हें ऐकून विमला फार दिलगीर होऊन मुकाट्यानें उभी राहिली. तें पाहून अभिरामस्वामींनीं तिला विचारिलें, ' कां, अशी दिलगीर कशाकरितां झालीस ? '

विमला ह्मणाली, ' तिलोत्तमेला काय उपाय काढावा ? '

अभिरामस्वामी आश्चर्यानें ह्मणाले, ' तूं काय ह्मणत्येस ? काय, तिलोत्तमेच्या मनांत प्रीतीचा संचार झाला आहे ?'

विमला थोडा वेळ स्तब्ध राहून मग ह्मणाली, ' आपणांस किती सांगूं ! मी आज चवदा दिवस अहोरात्र बघत्यें आहें, पण तिलोत्तमेचें लक्षण कांहीं बरें दिसत नाहीं. माझ्या मनाला वाटतें कीं, तिलोत्तमेच्या मनांत अति प्रगाढ प्रेमाचा संचार होऊन चुकला आहे. '

परमहंस थोडेंसें हंसून ह्मणाले, ' तुह्मी पडलां स्त्रिया; मनांत प्रेमाचीं नुस्तीं लक्षणें पाहतांच तुह्माला वाटतें कीं, तें गाढ प्रेम असावें. विमले, तूं तिलोत्तमेच्या मनाच्या सुखाविषयीं अशी चिंता करूं नकोस. तिचा अद्याप बालिकास्वभाव आहे, आणि ह्मणूनच प्रथम दर्शनींच तिचें मन चंचल झालें आहे. यासंबंधीं कांहीं बोललेंच नाहीं, ह्मणजे हां हां ह्मणतां जगत्सिंहाचा तिला अगदीं विसर पडेल. '

त्यावर विमला ह्मणाली, 'नाहीं नाहीं, प्रभो, तसें लक्षण मला दिसत नाहीं. एका पंधरवड्यांत तिच्या वृत्तींत केवढा फरक पडला आहे ह्मणून सांगूं ! आतांशा पहात्यें तों तिलोत्तमा माझ्याबरोबर, तसेंच आपल्या सख्यांबरोबर केव्हांही हंसत नाहीं, बोलत नाहीं, कांहीं नाहीं; बहुधा आतांशा तिनें बोलणें अगदींच सोडिलें आहे. तिच्या ती

पुस्तकें आज किंत्येक दिवस पलंगाखालीं धूळ खात पडलीं आहेत; तिच्या आवडीचीं झाडें आज बरेच दिवस तिच्या हातून पाणी न मिळाल्यामुळें अगदीं सुकून गेलीं आहेत; ती आतांशा आपल्या लाडक्या पक्ष्यांची विचारपूस देखील करीत नाहीं; ती स्वतः कांहीं खात नाहीं; रात्रीं निजत नाहीं; फार काय सांगू ती वेणी फणी देखील करीत नाहीं! ती कधीं विचारहि करीत नाहीं. आतांशा ती अगदीं वेड्या-सारखी झाली आहे; तिचें मुख अगदीं कोमेजून गेलें आहे. अभिरामस्वामी हें ऐकून स्तब्ध बसले; नंतर थोड्या वेळानें म्हणाले, ' मझा समज असा होता कीं, केवळ एक वेळ दर्शनानेंच गाढ प्रेम म्हणून ज्याला म्हणतात, तें उत्पन्न होत नसावें. पण हें स्त्री चरित्र आहे, आणि त्यांतही हें बालिका चरित्र आहे, तेव्हां तें ईश्वरच जाणू शके. पण आतां या गोष्टीला काय करावें ? वीरेंद्राची याकामीं संमति पडणार नाहीं.'

हें ऐकून विमला म्हणाली, ' मलाही हीच शंका आली, आणि म्हणूनच मी त्याचे पाशीं यासंबंधीं आजपर्यंत एक चकारशब्द सुद्धां काढला नाहीं, व जगत्सिंगाला आपली ओळख दिली नाहीं. पण आतां जर वीरेंद्रसिंह,' हें बोलत असतां विमलेच्या मुखचर्येत किंचित् फेर पडला. आतां जर वीरेंद्रसिंहानें मानसिंहाशीं सख्य केलें आहे, तेव्हां म्हणत्यें, जगत्सिंहाला आपला जामात करण्यांत वीरेंद्राचें काय नुक-सान होणार आहे ?'

अभिरामस्वामी म्हणाले, ' आधीं मानसिंहाची याकामीं कबूली पडेल तेव्हां कीं नाहीं ?'

विमला म्हणाली, ' न पडेल तर राजपुत्र तरी स्वतंत्रच आहेना ?'

अभिरामस्वामी म्हणाले, ' पण जगत्सिह तरी काय म्हणून वीरेंद्रसिंहाच्या कन्येशीं लग्न करून घेण्यास कबूल होईल ?'

विमला म्हणाली, ' जातिकुलदोषासंबंधीं पाहिलें तर तो कोणत्याच पक्षाला नाहीं; जयधरसिंहाचे तरी पूर्वज यदुवंशीयच आहेत.'

अभिरामस्वामी म्हणाले, ' यदुवंशीय कन्येनें मुसलमानाच्या शालकाची स्नुशा व्हावें कां ?'

विमला स्वामींकडे स्थीर दृष्टीनें पाहून म्हणाली, ' कां न व्हावें ? यदुवंशांतील कोणतें कुल धिःकारार्ह आहे ?'

हे तिचे शब्द ऐकतांच परमहंसाचे डोळे रागानें अगदीं लालभडक झाले. ते तिच्यावर खसकन् ओरडून म्हणाले, ' अग पापिणी, काय बोलतेस हें ! तूं आपलें स्वतांचें हतभाग्य विसरलीस वाटतें ? चल नीघ येथून !'

## प्रकरण ९ वें

### कुलतिलक.

आपल्या पित्याचे चरणीं नमन करून, जगत्सिंह सैन्यासहवर्तमान निघून गेल्यानंतर त्यानें शौर्याचीं जीं जीं कृत्यें केलीं, त्यामुळें पठाणांच्या सैन्याला त्याचा मोठा दरारा बसला. त्यानें प्रतिज्ञा केली होती कीं, फक्त पांच हजार लष्कराच्या मदतीनें कतलुखानाच्या १०००० माणसांस सुवर्णरेखा नदीपार हुसकून देईन;

एवढ्या थोड्या काळांत त्याची प्रतिज्ञा खरी होण्याचा संभव जरी दिसून आला नव्हता, तरी जहानाबादेहून निघाल्यानंतर फक्त एकाच पंधरवड्यांत आपल्या बहादुरीची त्यानें पाहिजे तितकी खात्री करून दिली होती. हें वृत्त ऐकतांच मानसिंह ह्मणाला, 'मला वाटतें, या माझ्या कुमाराच्या हातानें रजपुत नामगौरव पुनरपी खचित उज्वालित होणार.'

जगत्सिंह पूर्णपणें जाणून होता कीं, केवळ पांच हजार लष्कर घेऊन, पन्नास हजार फौजेला तोंड देऊन, समरभूमीपासून विन्मुख करणें हें कोणत्याही प्रकारें संभाव्य नाहीं. इतकेंच नाहीं तर तसें करण्यांत उलट आपला पराभव किंवा मृत्यु हा अगदीं निश्चित आहे; आणि एवढ्याकरितांच त्यानें तसें करण्याच्या भानगडींत न पडतां जेणेंकरून आपणांस शत्रूंशीं सामना करण्याचा प्रसंग न येई अशीच युक्ति योजिली. त्यानें आपलें थोडें लष्कर गुप्त रीतीनें ठेविलें होतें. घोर अरण्यांत अथवा समुद्राच्या काटांप्रमाणें उंच सखल प्रदेशांत त्यानें अशा स्थळीं छावणी देऊन ठेविली होती कीं, जवळ आलेल्या टेंकड्या आड असल्यामुळें अगदीं जवळून सुद्धां ती कोणाच्या नजरेस न पडावी. अशा गुप्त रीतीनें राहून जेव्हां पठाणांच्या एखाद्या लहानशा टोळीचा त्यास सुगावा लागे, तेव्हां तो वावटळीसारखी झपाट्यानें आपल्या लोकांनिशीं तीवर झडप घालून एका झपाट्यासरसा तिचा समूळ नाश करून टाकी. त्याचे पुष्कळ हेर असत. ते कोणी फळें मुळें, मासे, इत्यादि विकण्याच्या मिषानें, अथवा कोणी भिक्षुक

उदासीन, ब्राह्मण, वैद्य, इत्यादिकांच्या वेषानें निरानिराळ्या स्थळीं फिरून पठाणांच्या लष्कराच्या हालचालीची वार्ता वेळोवेळीं आपल्या पुढाऱ्याला आणून पोहोंचवित असत. जगत्सिंहाला ती मिळतांच तो मोठ्या सावधगिरीनें पण मोठ्या जलदीनें अशा स्थळीं आपलें लष्कर नेऊन ठेवित असे कीं, असावधपणें असणाऱ्या पठाणांवर त्यांच्या बळाचा अजमास करून मोठ्या शिताफीनें अगदीं एकाएकीं सहज तुटून पडतां यावें. पठाणांचें सैन्य आपल्या आंवाक्याबाहेर दिसल्यास जगत्सिंह त्यांजवर छापा घालण्याच्या पंचायतींत पडत नसे. कारण तो पक्कें जाणून होता कीं, आपल्या हल्लींच्या स्थितींत जर आपण हार खाल्ली तर आपला सर्वस्वी नाश होईल, व म्हणून तो अशा प्रसंगीं शत्रूस तसेंच पुढें जाऊं देऊन, त्यांच्या मागून मोठ्या सावधगिरीनें जाऊन त्यांची अन्नसामुग्री, घोडे, वगैरे जें साधेल तें हिरावून नेत असे. तेंच शत्रुसैन्य थोडें असलें तर तें आपण रोंखून ठेवलेल्या जागीं येइपर्यंत तो गुप्त स्थळीं दबा धरून राहत असे; आणि योग्य समयीं त्यांजवर एखाद्या भुकेल्या वाघाप्रमाणें मोठी गर्जना करीत मोठ्या वेगानें धांवत येऊन तुटून पडे व त्यांची धूळधाणी उडवीत असे. अशावेळीं शत्रु आपल्या इतका नजीक असेल हें पठाणांच्या ध्यानीं मनींही नसल्यामुळें आणि ते लढाईच्या तयारीनें नसल्यामुळें त्यांस शत्रूंच्या हातांत अचानक सांपडावें लागून बहुधा लढण्यास तयार होण्यापूर्वींच प्राणास मुकावें लागे.

अशा रीतीनें पठाणांचे पुष्कळ सैन्य मारिलें गेलें, त्यामुळें ते फार घाबरून गेले. जगत्सिहाला हुसकून काढून समरांगणीं त्याचा चांगला समाचार घ्यावा, असा विचार करून ते मोठ्या जारीनें प्रयत्न करूं लागले. पण त्याचें लष्कर असतें कोठें याचाच प्रथम पत्ता त्यांस लागेना. तो केवळ त्यांच्या मृत्युकाळीं यमदूताप्रमाणें तेवढ्या वेळेपुरता दृष्टीस पडून आपलें कार्य साधून केव्हाच अंतर्धान पावत असे. जगत्सिह मोठा धूर्त होता. त्यानें आपले पांच हजार लोक एकाच ठिकाणीं कधींही ठेविले नव्हते. कोठें हजार तर कोठें पांचशें. कोठें दोनशें तर कोठें दोन हजार. अशा प्रकारें निरनिराळ्या ठिकाणीं त्यानें आपलें लष्कर वांटून ठेविलें होतें. शत्रूचा माग लागला, कीं त्यांच्या मानानें त्यांवर आपले लोक धाडून काम झाल्यावर त्यांस तो जेथल्या तेथें पाठवीत असे. रजपूत कोठें आहेत, व कोठें नाहींत, याचा पठाणांना कधींही ठाव लागत नसे. कतलुखानाला, आज आपल्या अमुक सेनेचा अमुक ठिकाणीं नाश झाला, अशा बातम्या हरघडी येऊं लागल्या. सकाळीं, दुपारी, संध्याकाळीं, रात्रंदिवस पठाणांच्या सैन्यांत ह्या अमंगळ वार्ता सारख्या येऊन धडकूं लागल्या. थोड्याशा लोकांस किल्ल्याबाहेर पाठविणें मोठ्या धोक्याचें झालें. त्यामुळें पूर्वीप्रमाणें त्या प्रांतीं लुटालूट होण्याचें अगदीं बंद पडलें. पठाणांचें सर्व लष्कर किल्ल्याचा आश्रय धरधरून राहिलें. अन्नसामुग्री बाहेरून आणण्याची मोठी पंचाईत पडूं लागली. शत्रुपीडित प्रदेश

अशाप्रकारें आपल्या कबज्यांत आणिल्याचें ऐकून मानसिंहानें आपल्या पुत्रास पुढील पत्र लिहिलें:—

'कुलतिलक पुत्रा, तूं पठाणांना लवकरच राजपदावरून काढून टाकशील, अशी आमची आतां खात्री झाली आहे. व म्हणूनच तुझ्या मदतीकरितां आज दहा हजार सैन्य इकडून रवाना केलें आहे.'

युवराजानें प्रत्युत्तर लिहिलें, 'महाराजांची जशी आज्ञा. वडिलांकडून लष्कर आलें तें चांगलेंच झालें; नाहीं तरी हा दास श्रीचरणाशीर्वादें करून पांच हजार लोकांनिशीं क्षत्रिय कुलाला उचित जें प्रतिज्ञापालन तें शेवटास नेल्याविना कदापि राहणार नाहीं.'

कुमार वीर मदोन्मत्त होऊन रणांगणीं जयावर जय मिळवूं लागला आहे. शैलेश्वरा! तुझ्या मंदिरांत ज्या सुंदरीच्या सरल दृष्टीपुढें जो योद्धा पराजित झाला, त्याला लढाईच्या धामधुमींत गर्क असतां त्या सुंदरीची एकदां तरी आठवण झाली असेल कां? होत नसेल तर जगत्सिंह तुजप्रमाणेंच केवळ पाषाण असावा. दुसरें काय!

---

## प्रकरण १० वें

### मसलती नंतर उद्योग.

ज्या दिवशीं अभिरामस्वामींनीं रागवून विमलेला आपल्या मठांतून बाहेर घालवून दिलें होतें, त्याचे दुसरे दिवशीं संध्याकाळीं ती आपल्या खोलींत बसून वेणीफणी करीत बसली होती. पसतीस वर्षांच्या बाईला वेणीफणी? कां

बरें तिनें करूं नये ! थोडें वय झालें ह्मणजे यौवन का जातें ? यौनाचा नाश एक स्वरूपानें किंवा मनानें होतो. जिला स्वरूप नाहीं ती विसावे वर्षी देखील वृद्धा, पण जिला स्वरूप आहे ती सदासर्वकाळीं युवतीच होय. जिच्या मनाला प्रथमरसाचा संस्कार देखील नाहीं; ती युवती असूनही वृद्धाच, पण जिच्या मनावर त्या रसाचा संस्कार झाला आहे ती नेहमीं नवीनाच होय. विमलेच्या ह्या वयांतही तिचें स्वरूप काडीभरही कमती झालें नव्हतें, व तिच्या मनावरील प्रथमरसाचा संस्कार जसाचा तसाच होता. जों जों वय जास्ती होतें, तों तों ह्या रसाचा परिपाक जास्ती होतो. आमच्या वाचकांतील जर कोणाचें वय थोडेंसें अधिक असेल तर ते हें ह्मणणें खरें आहे, अशाबद्दल साक्ष देतील.

विमलेला, तिचा तो विडा खाऊन लाल झालेला अधरोष्ठ पाहून ही युवती नव्हे असें कोण बरें ह्मणेल? तिच्या प्रशस्त व काजळानें अधिक काळे झालेल्या डोळ्यांचे चकित करणारे कटाक्ष पाहून ही पंचविशीच्या आंत नाहीं, असें कोण बरें ह्मणेल ? अहाहा ! तिचे ते डोळे किती मोठाले, किती उज्ज्वल, किती चंचल व किती आवेशमय होते बरें ! कित्येक प्रगल्भयौवन स्त्रियांचे डोळे पाहिल्याबरोबर आपणांस असें वाटतें कीं, त्या मोठ्या मानी असाव्यात; त्याच स्त्रिया प्रथमरसांत पूर्ण मग्न झालेल्या असतात. विमलेचे डोळे त्याच वर्गांतील होते. आह्मी आमच्या वाचकांस खात्रीपूर्वक सांगतों कीं, विमला ही युवती होती, तिला स्थिर यौवना ह्मटलें असतें तरी चालतें. सोळा वर्षांची बाला हिच्यापेक्षां अधिक कोमल आहे, असें तिच्या चांप्यासारख्या

( ३ ) द्रु. नं. ८६०-२६-५-१०००

पिवळ्या रंगाच्या अंगाची कोमलता पाहून कोणी ह्मणेल काय? एक केसांची बट सहजगत्या तिच्या कानावरून गालावर पडली होती, ती पाहून ही युवतीची बट युवतीच्याच गालावर पडली नाहीं असें कोण बरें ह्मणेल? वाचकहो! विचार करा, मनश्चक्षू उघडून पहा; ज्या ठिकाणीं आरशासमोर बसून विमला केस विंचरीत आहे, तें ठिकाण लक्षांत आणा; विपुल असे केस डावे हातांत धरून ते आपल्या तोंडासमोर आणून ती पहा बरें त्यांतून कशी फणी फिरवीत आहे ती! आपलें तारुण्य पाहून पहा बरें ती कशी खुदूं खुदूं हसत आहे ती! बीनालाही मागें सारणारें असें ती जे मधूनमधून गात आहे तें ऐका! तुमचें लक्ष जाऊं नये पण गेलेंच तर तिच्या त्या अनावृत वक्षःस्थलानें कालाच्या स्पर्शाला मुळींच दाद दिली नव्हती, असें तुमच्या लक्षांत येईल. ह्या आमच्या वर्णनावरून, वाचकहो! तुम्हाला विमलेपेक्षां एखादी नवीन जास्त मनमोहिनी झाली असती काय?

विमलेनें केस विंचरून वेणीचा बुचडा घातला नाहीं; तिनें वेणी तशीच पाठीवर मोकळी सोडिली होती. उत्तम सुवासिक रुमालानें तिनें आपलें तोंड पुशिलें; गुलाबी सुपारी व कापूर वगैरे घातलेल्या विड्यानें तिनें आपले ओठ पुनः लाल केले; मोत्यांचें काम केलेली चोळी तिनें अंगात घातली. सर्वांगावर सोन्याचे व हिऱ्यांचे डागिने घातले; कोण जाणे पुनः तिला काय वाटलें तें; तिनें त्यांतील कांहीं डागिने अंगावरून काढून टाकिले; फारच चमत्कारिक असें जरीचें काम केलेलें ती लुगडें नेसली;

पोंवळी लावलेले जोडे तिनें पायांत घातले; आणि अखे-रीस त्या सुंदर पाठीवर सोडलेल्या वेणींत राजपुत्रानें दिलेला तो बहुमोल मोत्यांचा हार तिनें घातला.

विमला अशा प्रकारें पोषाख करून तिलोत्तमेच्या महालांत गेली. तिला अशी सजलेली पाहून तिलोत्तमा आश्चर्यचकित होऊन म्हणाली, 'अं! हें काय! विमले, आज असा हा थाटमाट'?

विमला म्हणाली, 'तुला काय करावयाचें त्याच्याशीं?'

तिलोत्तमेनें विचारिलें, 'खरेंच गडे सांग, तूं कोठें जात आहेस?'

विमलेनें उत्तर केलें, 'मी वाटेल तेथें जातें. तुला कोणी सांगितलें मी जातें आहे म्हणून'? हें ऐकून तिलोत्तमेचा चेहरा खिन्न झाला. तिची ती लज्जा पाहून ममतेनें थोडें हंसून विमला म्हणाली, 'मला फार लांब जावयाचें आहे.'

तिलोत्तमेचें मुख प्रफुल्ल कमलाप्रमाणें हर्षविकासित झालें; तिनें मृदु स्वरानें विचारिलें, 'कोठें ग जातेस?'

विमला तिचा असा चेहरा झालेला पाहून हंसत म्हणाली, 'तुला कोठें जाते म्हणून वाटतें?'

हें ऐकून तिलोत्तमा तिच्या तोंडाकडे पाहूं लागली.

त्या वेळीं विमला तिचा हात आपले हातीं घेऊन 'ऐक तर मग' असें म्हणून तिला खिडकीजवळ घेऊन गेली, आणि तिच्या कानांत सांगूं लागली, 'मी शैलेश्वराचे मंदिरांत जात आहें. तेथें एका राजपुत्राची व माझी गांठ पडणार आहे.'

हें ऐकून तिलोत्तमेचें शरीर रोमांचित होऊन गेलें, तिच्यानें कांहींसुद्धां बोलवेना.

विमला सांगूं लागली, 'अभिरामस्वामींपाशीं माझें बोलणें झालें होतें. स्वामींच्या मतें जगत्सिंहाबरोबर तुझा विवाह होणें शक्य नाहीं. कांहीं केलें तरी तुझा बाप त्या कामीं कबूल होणार नाहीं व त्याच्यापाशीं ही गोष्ट काढल्यास चांगलेंसें बक्षीस नाहीं मिळालें तर मोठें भाग्यच समजावयाचें !'

तिलोत्तमा खालीं मान घालून अतिशय हळू स्वरानें जमिनीकडे पहात—'मग कसें'—हे दोनच शब्द बोलली.

विमला म्हणाली, 'मग कसें म्हणजे? मी राजपुत्रास येण्याविषयीं वचन दिलें आहे; आज रात्रीं त्याची भेट घेऊन त्यास मी आपली ओळख देईन. पण नुसत्या ओळखीनें काय होणार आहे? असो. सध्यां ओळख तर द्यावी. मग त्याला वाटेल तें तो करील. पण गडे जर राजपुत्राचें तुझ्यावर प्रेम असेल तर—'

तिलोत्तमा तिनें पुढें न बोलावें म्हणून तिच्या तोंडाला आपला पदर लावून म्हणाली, 'तुझें हें बोलणें ऐकून मला बाई लाज वाटते. तुला वाटेल तेथें तूं जा; माझी गोष्ट कोणाला सांगूं नको, किंवा कोणाची माझ्याजवळ सांगूं नको.'

विमला पुनः हंसून म्हणाली, 'तर मग इतक्या लहान वयांत या प्रेमसमुद्रांत तूं उडी कशाकरितां बरें घातलीस?'

तिलोत्तमा म्हणाली, 'मीं सांगितलेंना, कीं तूं आपली जा म्हणून! मी आतां तुझें कांहीं ऐकणार नाहीं.'

विमला म्हणाली, 'असें असेल तर मग मी आता शैलेश्वराचे मंदिरांत जातच नाहीं मुळीं.'

तिलोत्तमा म्हणाली, 'मी कांहीं तुला 'नको जाऊं' म्हणून नाहीं म्हटलें. मी म्हटलें, तुला वाटेल तिथें तूं जा.'

विमला हंसली, आणि म्हणाली, 'असें काय! मग तर मी आतां अगदींच जाणार नाहीं.'

तिलोत्तमा पुनः मान खालीं घालून म्हणाली, 'जा तूं' हें ऐकून विमला तर अधिकच हंसूं लागली. कांहीं वेळानें ती म्हणाली, 'मी जातें तर मग; पण मीं येईपर्यंत तूं निजूं नको बरं कां.'

तिलोत्तमा थोडी हंसली. 'झोंप कशी येईल?' हा तिच्या हंसण्याचा भाव होता. विमलाही तो समजली. जातेसमयीं विमलेनें आपला एक हात तिलोत्तमेच्या खांद्यावर ठेवून दुसऱ्या हातानें तिची हनवटी हातांत धरिली; ह्याप्रमाणें कित्येक क्षण तिच्या त्या सरलप्रेमपवित्र मुखाकडे पाहून तिनें मोठ्या प्रेमानें तिचें चुंबन घेतलें.

विमला गेली, तेव्हां तिलोत्तमेनें पाहिलें तों तिच्या नेत्रांतून एकसारख्या अश्रुधारा चालल्या होत्या.

विमला तिलोत्तमेच्या महालाबाहेर येते आहे तों अस्मानी येऊन तिला म्हणाली, 'धनीसाहेब तुम्हांला बोलावित आहेत.'

तिलोत्तमेनें तें ऐकून विमलेजवळ येऊन कानांत सांगितलें 'तूं पोषाख बदलून जा.'

विमला म्हणाली, 'तसें कांहीं कारण नाहीं.'

असें म्हणून विमला तेथून निघाली, ती वीरेंद्रसिंहाच्या निद्रामंदिरांत गेली. तेथें वीरेंद्रसिंह निजला होता, एक दासी त्याचे पाय चेपीत होती, व दुसरी पंख्यानें वारा घालीत होती. इतक्यांत विमला त्याच्या पलंगाजवळ जाऊन म्हणाली, 'काय आज्ञा आहे?' वीरेंद्रानें मस्तक वर करून पाहिलें आणि तो आश्चर्यभरित होऊन म्हणाला, 'विमले, आज कोठें कांहीं कामगिरीवर जात आहेस कीं काय?'

विमला म्हणाली, 'होय महाराज, पण मला काय सांगावयाचें आहे?'

वीरेंद्रानें विचारिलें, 'तिलोत्तमा आतां कशी आहे? तिच्या जिवास बरें नव्हतें, आतां तिची प्रकृति झाली आहे का काहीं ठीक?'

विमला म्हणाली, 'होय आतां ठीक आहे.'

वीरेंद्र म्हणाला, 'तूं मला जरा वारा घाल. अस्मानि, तूं तिलोत्तमेला मजकडे घेऊन ये.'

हें ऐकून वारा घालणारी दासी पंखा खालीं ठेवून निघून गेली.

विमलेनें तिला बाहेर उभें राहण्याविषयीं खुणेनें सांगितलें वीरेंद्र दुसऱ्या दासीस म्हणाला, 'लक्ष्मी, तूं मला विडा करून घेऊन ये पाहूं!' हें ऐकून पाय चेपणारी दासी निघून गेली.

नंतर वीरेंद्रसिंह विमलेला विचारूं लागला, 'विमले, अगोदर मला सांग कीं, तूं आज हा थाटमाट काय म्हणून केला आहेस?'

विमलेनें उत्तर दिलें, ' आज मला कांहीं काम आहे. '

वीरेंद्रानें विचारिलें, ' पण काय काम आहे, तें तर मला सांगशील?'

विमला म्हणाली, ' ऐका तर मग.' असें बोलतां बोलतां विमला मन्मथशररूपी उभय नेत्रांनीं वीरेंद्रावर दृष्टिपात करूं लागली, ' ऐका तर मग मी आहें दुराचारिणी आणि आतां जातें आहे अभिसारार्थ.'

इतकें बोलून ती वाऱ्यासारखी तेथून निसटली.

## प्रकरण ११ वें.

### अस्मानीचें दौत्य.

तिकडे विमलेच्या इशारतीप्रमाणें अस्मानी महालाचे बाहेर तिची वाट पहात उभी राहिली होती, इतक्यांत ती तेथें येऊन तिला ह्मणाली, ' अस्मानी, तुला कांहीं गुप्त गोष्ट सांगावयाची आहे.'

अस्मानी ह्मणाली, ' तुमचा हा आजचा थाट पाहून मला वाटलेंच होतें कीं, आज आपल्यालाही कांहीं विशेष कामगिरी करावयाची असेल म्हणून.'

विमला ह्मणाली, 'मला आज कांहीं कामाकरितां येथून बरेंच लांब जावयाचें आहे. पण रात्रीच्या प्रहरीं मला एकटें जाववणार नाहीं; व तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणावर विश्वास ठेवून नेतांही येत नाहीं; म्हणून तुलाच मजबरोबर आज यावें लागेल.'

अस्मानीनें विचारिलें, 'कोठें जावयाचें आहे ?'

विमलेनें तिला उत्तर केलें, 'अस्मानि, तुला कांहीं करण्यास सांगितलें असतां, पूर्वी कधीं असें तूं मला विचारीत होतीस कायग ?'

हें ऐकून अस्मानी थोडी लाजून ह्मणाली, 'असें असेल तर मग जरा थांबा, मला कांहीं थोडें काम आहे तें पुरें करून येतें.'

विमला ह्मणाली, 'आणखी तुला कांहीं पुसावयाचें आहे; समज जर तुझी आज त्या वेळच्या एखाद्या मनुष्याची भेट झाली तर तो तुला ओळखील काय ?'

अस्मानी आश्चर्य पावून ह्मणाली, 'एखादा तो कोण ?'

विमला ह्मणाली, 'समज कीं, जर कुमार जगत्सिंहाची आणि तुझी भेट झाली तर तो तुला ओळखील काय ?'

अस्मानी बराच वेळ मुकाट्यानें उभी राहिली, तिचा गळा भरून आला व ती म्हणाली, 'असा दिवस कशाचा येतो ?'

विमला ह्मणाली, 'कधीं आलाच तर मग ?'

अस्मानी म्हणाली, 'कुमार ओळखिल्याशिवाय खचित राहणार नाहीं.'

विमला म्हणाली, 'असें असेल तर तुला मजबरोबर नेतां यत नाहीं, दुसऱ्या कोणाला घेऊन जाईन, एकटी तर मला येत नाहीं.'

अस्मानी म्हणाली, 'कुमाराला पाहाण्याची माझे मनाला फार उत्कंठा लागली आहे.'

विमला ह्मणाली, 'मनांतली इच्छा मनांतच दाबून ठेव. पण आतां मी काय करूं?'

असें बोलून विमला विचार करूं लागली. इतक्यांत अस्मानी तोंडावर पदर घेऊन हंसूं लागली. तेव्हां विमला म्हणाली, 'जळलें मेलें! आपल्याआपल्याशींच ग काय हंसते आहेस?'

अस्मानी म्हणाली, 'मी मनच्यामनांत विचार करत्यें आहे कीं, माझ्या सोनकुल्या दिग्गजाला तुम्हांबरोबर पाठविलें तर कसें होईल?'

विमला हंसून उल्हासानें म्हणाली, 'हां, हेंच ठीक पडेल; रसिकदासालाच बरोबर घेऊन जाईन.'

हें ऐकून अस्मानी आश्चर्य पावून म्हणाली, 'हें काय? मी तर तसें थट्टेनें बोललें.'

विमला म्हणाली, 'थट्टा नाहीं, त्या वेड्या ब्राह्मणावर माझा अविश्वास नाहीं. आंधळ्याला रात्र काय, आणि दिवस काय, दोन्हीं सारखींच! तसाच तो; त्याला कळतें आहे काय? आणि म्हणूनच त्याच्यावर माझा सुतराम अविश्वास नाहीं. पण तो ब्राह्मण मजबरोबर येणार नाहीं.'

अस्मानी हंसून म्हणाली, 'तें काम माझें; मी त्याला इकडे घेऊन येत्यें. तुम्ही दरवाजाजवळ अंमळ वाट पहात उभ्या रहा.'

असें बोलून अस्मानी हंसत हंसत किल्ल्यांतील एका लहान झोंपडीकडे जावयास निघाली.

अभिरामस्वामींचा शिष्य गजपतिविद्यादिग्गज याची आम्ही मागें एकवार वाचकांस ओळख करून दिलीच

आहे. ज्या कारणास्तव विमलेनें त्याला 'रसिकदासस्वामी' हें नांव दिलें होतें, तें सुद्धां वाचकांच्या ध्यानीं असेलच. तोच महापुरुष या झोंपडीचा मालक आहे. दिग्गजाची उंची थोडीथोडकी तरी जवळजवळ साडेपांच हात होती; त्याचें प्रस्थ इतकें जाडें होतें कीं, तें आजमासें अर्ध हात आणि तीन अंगळें भरावें. पाय कमरेपासून जमीनीपर्यंत मोजल्यास चार हात आणि चौदा अंगळें असावे; त्याची अंगलट सरळ बारीकशा काठीप्रमाणें होती. त्याचा वर्ण दौतींतील शाईप्रमाणें होता; आम्हांला असें वाटतें कीं, लांकडाच्या भ्रमानें अग्नि त्याचे पाय खाण्यास बसला असावा, पण त्यांत त्यास रस अगदींच न मिळाल्यामुळें त्यानें ते अर्धवट जाळून त्यांस कोळशासारखे करून तसाच टाकून गेला असावा. दिग्गज फार उंच असल्यामुळें त्याच्या पाठीस जरा कुबडही आलें होतें. अवयवांत सर्वांत नाक फार मोठें होतें. शरीरांतील मांसाची न्यूनता येथें मात्र पूर्णपणें भरून निघाली होती. डोक्याला टक्कल पडलें असून, आसपासचे केस खुंटासारखे लहान लहान असल्यामुळें, त्यांजवर हात फिरविला असतां जणूं सुया टोंचल्याचा भास होई. त्याची शेंडी त्यासच शोभे अशी होती.

विद्यादिग्गज ही उपाधि गजपतीला सहज प्राप्त झाली होती. त्याची बुद्धीच तशी तीक्ष्ण होती. लहानपणींच पाठशाळेंत असतां त्यानें व्याकरण पढण्यास आरंभ केला. साडेसात महिन्यांत 'सहर्णेर्धः' ह्या सूत्राची लक्षणासह व्याख्या त्यानें तोंडपाठ केली; भट्टाचार्यांचे कृपेनें व दुसऱ्या दहांपांच जण शिष्यांचे गडबडींत, पंधरा वर्षांत त्यानें शब्दकांड

एकादांचें पुरें केलें. नंतर दुसऱ्या कांडास आरंभ करण्यापूर्वी गुरुजींनीं मुलगा कसा काय शिकला आहे तें पहावें म्हणून त्याला विचारिलें, 'सांग पाहूं बेटा,' राम ' शब्दाला 'अस्' लावलें असतां काय रूप होतें तें ?' शिष्यानें पुष्कळ विचार करून उत्तर दिलें, ' रामंम ' तेव्हां गुरुजी ह्मणाले, ' बाबा! तुझी विद्या आतां पूर्ण झाली आहे; म्हणून आतांच्या आतां घरीं जा. आतां तुझें आमच्यायेथील अध्ययन पुरें झालें. तुला शिकविण्यास मजजवळ आतां कांहीं उरलें नाहीं. '

त्यावेळीं गजपति मोठ्या डौलानें ह्मणाला, ' गुरुजी, माझी एक विनंति आहे. मला आपण कोणती उपाधि देतां ? '

गुरु म्हणाले, 'बाबा. तूं जी विद्या उपार्जन केली आहेस तिचेसाठीं मला कांहीं तरी नवीन उपाधि दिलीच पाहिजे; म्हणून आजपासून तूं ' विद्यादिग्गज ' ही उपाधि ग्रहण कर.'

दिग्गज आनंदित होऊन गुरुचरणीं नमन करून घरीं निघून आला.

घरीं आल्यावर दिग्गज पंडित आपल्या मनाशीं विचार करूं लागले कीं, ' व्याकरणादि विषयांत तर मी पारंगत झालों आहें. आतां थोडेंबहुत स्मृतीचेंही अध्ययन केलें पाहिजे. म्हणतात कीं, अभिरामस्वामी म्हणून कोणीएक मोठे पंडित आहेत, आणि त्यांच्याशिवाय तर या विषयांत मला शिक्षण देईल असा दुसरा कोणी पुरुषच नाहीं. यास्तव त्यांजपाशींच जाऊन स्मृतीचें कांहीं शिक्षण मिळ-

वावें.' असा निश्चय करून ते या किल्ल्यांत राहण्यास आले होते. अभिराम स्वामी अनेक विद्यार्थ्यांना विद्यादान करीत असत. कोणाचा कंटाळा करीत नसत. दिग्गज कांहीं शिको वा न शिको पण अभिराम स्वामी त्याला पाठ देत असत.

गजपति केवळ वैय्याकरण आणि स्मार्तच होता असें नाहीं, तर त्यानें अलंकार व रसशास्त्रही पाहिलें होतें. पण त्याचा रसांशीं परिचय ह्मटला ह्मणजे तुपाच्या भांड्याशींच विशेष होता. त्याच्या रसिकतेचें भांडार अस्मानीशीं मात्र मोकळें होत असे, आणि त्यांत त्याचा कांहीं तरी गुप्त हेतुही असावा. गजपति समजत असें कीं माझा जन्म या भरतखंडावर केवळ लीला करण्याकरितांच झाला आहे, हा किल्ला हें माझें श्री वृंदावनच आहे, अस्मानी ही माझी राधिका आहे; अस्मानीही मोठी गमतीच असे; हा मदनमोहन मिळाल्यामुळें तिनें गमतीसाठीं माकडें बाळगण्याचें सोडून दिलें होतें. विमलाही कधीं कधीं ह्या आमच्या माकडाचा तमाशा करण्यास जात असे. पण दिग्गज मनांत ह्मणत असे कीं, 'ही मला चंद्रावळ मिळाली आहे.' ती कां नाहीं मिळणार! तुपाचें भांडें इतकें चाटून पुसून साफ करणारा आहे कोठें ब्राह्मण! पण हें सुदैवानें विमलेला ठाऊक नाहीं, असेंही माझ्या ऐकण्यांत आहेच.

आज आमच्या ह्या माधवाला मोठा आनंद होणार आहे; वृषभानु-सुता त्याच्या कुंजकुटिरांत येत आहे.

# प्रकरण १२ वें.

## अस्मानीचा अभिसार.

*विद्यादिग्गज गजपतीच्या मनोहारिणी अस्मानीचें स्वरूप कसें होतें हें जाणण्याची आमच्या वाचकांना फार उत्कंठा लागली असेल यांत कांहीं शंका नाहीं; आणि म्हणूनच आह्मी आतां त्यांची इच्छा पूर्ण करितों. पण स्त्रियांच्या रूपवर्णनाविषयींची ग्रंथकार मंडळीनें जी पद्धत घालून दिली आहे तिचें उल्लंघन करणें हें आमच्यासारख्या अज्ञ ग्रंथकाराला अगदींच शोभावयाचें नाहीं आणि म्हणूनच रूपवर्णनारंभीं प्रथम सरस्वतीचें मंगलाचरण केलें पाहिजे.

* हा व पुढील प्यारे वाचून आमच्या प्रिय मराठी वाचकांस अत्यंत आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं, पण पुढें दिलेले दोन शब्द वाचून त्यांना ह्या गोष्टीचा उमज पडेल अशी आशा आहे. बंकिमचंद्र बाबूंनीं ज्यावेळेस ह्मणजे सन १८६४ सालीं हें पुस्तक लिहिलें, त्यावेळीं बंगाली भाषा ही आपलें जुनें स्वरूप टाकून नुक्तीच हल्लींच्या रूपास येण्यास लागली होती. त्यावेळेस कै. ईश्वरचंद्र विद्यासागर व कै. बाबू प्यारीचांद मित्र ' टेकचंद ठाकूर ' हे ग्रंथकार चांगले प्रसिद्धीस आले होते. विद्यासागर बाबू ह्यांनीं सन १८६२ सालीं ' सीतारवनवास ' व मित्र बाबू ह्यांनीं ह्याचेही अगोदर ' अलारेर घरेरदुलाल' हीं पुस्तकें लिहून आपलीं नांवें सर्व बंगाल्याभर प्रसिद्धीस आणिलीं होतीं. विद्यासागराची भाषा संस्कृतशब्दपूर्ण आहे व ती भाषा पूर्वीं व अजूनही पंडितवर्ग वापारीत आहे; व मित्रांची भाषा केवळ वंगशब्दपूर्ण आहे, व ती सर्वसाधारण जनसमाजांत चालू आहे. ह्या दोन्ही तऱ्हेच्या भाषा एकमे-

हे वाग्देवि ! हे कमलासने ! शरदिन्दुनिभानने ! अमलकमलदलनिंदितचरणभक्तजनवत्सले ! मला त्याच चरणकमलांच्या छायेत घे; मी अस्मानीचें रूप वर्णन करितों. हे अरविंदाननसुंदरीकुलगर्वखर्वकारिणि ! हे विशालरसालदीर्घसमाससंकुलसृष्टिकारिणि ! एकदां तरी मला तुझ्या पायांच्या नखांच्या कोपऱ्यांत जागा दे, मी रूपवर्णना करितों. हे पंडितकुलेप्सितपयःप्रस्रविणी ! हे मूर्खजनप्रतिकाचित् कृपाकारिणि ! हे अधमतारिणि ! हे अंगुलिकंडूयनविषमविकारसमुत्पादिनि ! हे * बटतलाविद्याप्रदीपतैलप्रदायिनी ! माझ्या बुद्धीचा प्रदीप एक वेळ तरी उज्वल केला जावो ! माते ! तुझें दोन प्रकारचें रूप आहे. ज्या रूपानें तूं कालिदासाला वरप्रदा झाली आहेस, ज्या प्रकृतीच्या प्रभावानें रघुवंश, कुमारसंभव, मेघदूत, शकुंतला इत्यादिकांच,

कांपासून अत्यंत भिन्न आहेत. पूर्वीच्या ह्मणजे पंडिती भाषेला अलारेर घरेरदुलाल' ह्या गोष्टीनें फार मोठा धक्का बसला व एकदर जनसमाजाची दृष्टि ह्या भाषाप्रश्नाकडे वळली. ह्या दोन्ही भाषांच्या मधली भाषा आपण लिहावी ह्मणजे सर्वसाधारण जनसमाज व पंडित वर्गालाही ती कळेल ह्या हेतूनें बंकिमचंद्रानीं ही गोष्ट ह्या नवीन प्रकारच्या भाषेंत लिहून प्रसिद्ध केली; हे प्यारे पंडिती भाषेचा, शैलीचा व ठरीव अलंकारांचा केवळ उपहासच करावा म्हणूनच लिहिले आहेत, ह्या गोष्टीकडे लक्ष देऊन हे वाचकांनी वाचावे अशी आमची त्यांस प्रार्थना आहे. भा. क.

* बटतला हा एक कलकत्ता शहराचा भाग आहे; येथें बहुतकरून ज्ञानशून्य असून ज्ञानाचा डौल घालणारे लेखकांचा फार मोठा भरणा रहातो. हा आमचा बटतला म्हणजे लंडनांतील ग्रबस्ट्रीट तींत रहाणारे लेखकांचे भाऊबंद होत.

जन्म झाला आहे, ज्या प्रकृतीचें ध्यान करून वाल्मीकीनें रामायणाची, भवभूतीनें मालतीमाधवाची, भारवीनें किरातार्जुनियाची रचना केली, त्या रूपानें माझ्या खांद्यावर चढून बसून मला पीडा उत्पन्न करूं नको. ज्या मूर्तीचें ध्यान करून श्रीहर्षानें नैषध लिहिलें आहे, ज्या प्रकृतीच्या प्रसादानें *भारतचंद्रानें विद्येचें अपूर्व रूप वर्णन करून सर्व बंगाल देशाला मोहून सोडिलें आहे, ज्या मूर्तीच्या प्रसादानें दाशरथिरामाचा जन्म झाला आहे, व ज्या मूर्तीच्या प्रसादप्रदीपाच्या तेजानें बटतला चमकून राहिला आहे, ती मूर्ति एकवेळां तरी माझे खांद्यांवर अविर्भूत होवो, मी अस्मानीचें रूप वर्णन करितों.

अस्मानीच्या वेणीची शोभा फणीप्रमाणें होती, आणि ह्मणूनच या वेणीपुढें आपल्याला हार खावी लागली या दुःखानें तो झुरूं लागला आणि आतां आपलें हें फजीति पावलेलें शरीर लोकांना काय दाखवावें असें त्याला वाटून आपण आतां बिळांत जाऊन रहावें असा निश्चय करून साप बिळांत जाऊन राहिला. हें जेव्हां ब्रह्मदेवानें पाहिलें तेव्हां त्याला हा मोठा प्रमाद घडला आहे असें वाटलें; कारण साप जर बिळांत जाऊन राहिला तर मनुष्याला कोण

* भारतचंद्र हा प्रसिद्ध वंगाली कवि १८ वें शतकांत होऊन गेला. हा कृष्णगर येथील प्रसिद्ध राजा कृष्णचंद्र मुजुमदार ह्याचे पदरीं होता ह्याचे ' अन्नदामंगल,' 'मानसिंह' व 'विद्यासुंदर' हे तीन ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. ह्याच्या कवितेंतील अश्लील शब्द व वर्णनें आमचे ग्रंथकारास न आवडल्यामुळें त्यानें ह्यास ह्या दुसऱ्या मालिकेंत घातलें आहे. ' विद्या ' ही ' विद्यासुंदरां 'तील नायिका आहे.

डसणार ? हें मनांत आणून त्यानें सापाचें शेंपूट धरून त्याला बाहेर ओढून काढिलें. साप जेव्हां बाहेर आला, तेव्हां आपल्याला लोकांना पुनः तोंड दाखवावें लागणारच ह्याचा त्याला अत्यंत राग येऊन त्यानें आपलें डोकें जमिनीवर आपटण्याची सुरवात केली. डोकें आपटतां आपटतां चपटें होऊन गेलें, सापाला फणा प्राप्त झाली ही तेव्हांपासू-नच. अस्मानीचा चेहरा चंद्रापेक्षांही सुरेख होता ह्मणून चंद्राला उदयपर्वतावर येणें कठीण वाटून, त्यानें ब्रह्मदेवाजवळ जाऊन गाऱ्हाणें सांगितलें; तेव्हां ब्रह्मदेव ह्मणाला, ' भिऊं नको जा आणि उदय पाव, आजपासून बायकांचीं तोंडें झांकलीं जातील' तेव्हांपासूनच बुरख्यांचा प्रघात जगांत पडला. तिचे दोन्ही डोळे केवळ खंजन पक्षीच होत असे होते; हे पक्षी पाहून पाखरांनां वाईट वाटेल व ते पंख पसरून पळून जातील ह्मणून फांद्यांच्या पिंजऱ्यांत त्यांनां अडकावून ठेवि-लें आहे; आणि तेव्हांपासूनच पांखरें यथेष्ट आकाशांत विहार न करितां झाडाच्या फांद्यावर बसून काळ काढूं लागलीं आहेत. असें होण्यास दुसरेंही एक कारण झालें. आमच्या अस्मानीचें नाक गरूडाच्या नाकापेक्षांही खूप मोठें होतें; आणि ह्मणूनच गरूड भूमि सोडून झाडावर जाऊन बसला; तो पडला पक्षांचा राजा, त्यांच्या बरोबर पक्षीही झाडावर बसले. अशाच एका कारणामुळें*डाळिंब जें बंगा-ल्यांतून निघालें तें थेट पाटणा शहराजवळ जाऊन राहिलें; हत्तीनें कुंभ घेतला व बंगाला सोडून तो ब्रह्मदेशांत जाऊन

* डाळिंब, कुंभ व धवलगिरी ह्या तिहींच्या उपमा कवी स्त्रि-यांचे स्तनांस देतात हे आमचे वाचकांस सुचविणें नकोच.

राहिला; बाकी राहिला धवलागीरी, त्यानें पाहिलें कीं आपलें शिखर तें कितीसें उंच, अडीच कोसांवर तर नाहींना? फारफार झालें तर असेल तीन कोस; असा विचार करितां करितां धवलागीरीचें माथें गरम होऊन गेलें. तें थंड व्हावें ह्मणून तो त्यावर बर्फ ठेवूं लागला, आणि तेव्हांपासून तो माथ्यावर सारखें बर्फ ठेवून बसला आहे. इ. इत्यादि

सटीच्या लेखदोषानें अस्मानी विधवा झाली. अस्मानीनें डिग्गजाच्या झोंपडीशीं येऊन पाहिलें तो दरवाजा बंद आहे. आंत दिवा तेवत होता. तिनें मोठ्यानें, 'अहो महाराज!' ह्मणून हाक मारिली, पण त्यावर कोणीही जबाब दिला नाहीं.

'अरे ए गोसावड्या, बोल किरे!' असें ती दुसऱ्यानें मोठ्यानें ह्मणाली, पण यावरही तिला उत्तर आलें नाहीं.

'हा मेला करतो आहे तरी काय! अहो रसिकदास प्रभु!' असें ती तिसऱ्यानें मोठ्यानें हाक मारून ह्मणाली, पण त्यावरही तिला कांहीं उत्तर येईना.

शेवटीं अस्मानी दाराच्या फटींतून पाहूं लागली, तों तिला दिसलें कीं, ब्राह्मण जेवावयास बसला आहे, आणि ह्मणूनच तो बोलत नाहीं. बोललें असतां ब्राह्मणास जेवतां येणार नाहीं. अस्मानीनें विचार केला कीं, याचा मोठा नेम आहे,पाहावें तर खरें बोलून पुन्हां खातो कीं नाहीं तें.' नंतर ती ह्मणाली, 'हे रसिकदास!' पण त्यावर कांहीं जबाब येईना. पुन्हां पुन्हां 'रसिकराज! अहो रसिकराज!' असें ती ओरडूं लागली. तेव्हां आंतून, 'ऊं—हूम्' असें उत्तर आलें.

'हा जबाब ब्राह्मणानें भाताचा घांस तोंडांत धरून दिला आहे; ह्याला कांहीं जबाब ह्मणतां येणार नाहीं.' असा विचार करून अस्मानी ह्मणाली 'हे रसपाणिक!'

त्याचेंही 'ऊं--हूम्' असेंच उत्तर आलें.

अस्मानी म्हणाली, 'अरे, अगोदर बोल आणि मग खा.'

उत्तर--'हू-उ-उम्!'

अस्मानी ह्मणाली, 'अरे मेल्या! ब्राम्हण होऊन असें काम करितोस कां, उपाध्येबावाना जाऊन सांगत्यें बघ. घरांत रे कोण आहे?'

ब्राम्हण साशंकचित्तानें आपल्या शून्य घरांत चोहोंकोंपऱ्यांत पाहूं लागला, आणि कोणी नाहीं असें पाहून पुन्हां खाऊं लागला.

अस्मानी पुन्हां म्हणाली, 'पहा, आतां पुन्हां खात आहेस. बोलल्यावर सुद्धां खातोसबा रे!'

दिग्गज म्हणाला, 'मी कधीं ग बोललों?'

हें ऐकतांच अस्मानीला खदखद हंसूं कोसळलें. ती म्हणाली 'हें तर बोललास ना?'

दिग्गज ह्मणाला, 'खरें खरें, खरे म्हणूनच आतां खाणें होणार नाहीं.'

अस्मानी म्हणाली, 'असें आहे तर मग उठून एकदांचें दार तर उघड.'

अस्मानीनें फटींतून पाहिलें कीं ब्राम्हण खरोखर भात टाकून उठत आहे. त्यावर ती म्हणाली, 'हां! नको नको. बाकीचा भात खाऊन मग ऊठ.'

दिग्गज म्हाणाला. 'छे! आतां खायचें नाहीं. मी बोललों आहे.'

अस्मानी म्हणाली, 'असें रे काय करतोस! न खाशील तर तुला माझीच शपथ आहे.'

दिग्गज ह्मणाला, 'राधे माधव! एकदां बोलून गेल्यावर मग काय म्हणत्येस खाल्लें पाहिजे!'

अस्मानी म्हणाली, 'तें कांहींही असो, पण मी आतां जात्यें. तुजबरोबर मला पुष्कळ बोलायाचें होतें, पण आतां मी कांहीं सांगणार नाहीं. मी आतां जात्यें.'

दिग्गज म्हणाला, 'नको नको, अस्मानि, तूं मजवर रागावूं नको. हा मी खातों.'

ब्राह्मण पुनः खाऊं लागला; दोन तीन घास घेतो तोंच अस्मानी म्हणूं लागली, 'उठा पुरें झालें खाणें, दरवाजा तर उघडा.'

दिग्गज म्हणाला, 'बाकी राहिलेला भात खाऊन उठतों.'

अस्मानी ह्मणाली, 'काय तुझें अजून पोट भरलें नाहीं? ऊठ, नाहीं तर बोलल्यावर खातो म्हणून सांगून देईन सगळ्यांना.'

दिग्गज म्हणाला, 'नको, असें सांगूं नको. हा बघ मी उठलों.' असें बोलून ब्राह्मणानें मोठ्या खेदानें अन्न टाकून दार उघडिलें.'

# प्रकरण १३ वें.

## अस्मानीचें प्रेम.

दार उघडल्यावर अस्मानी आंत आली. तिला पाहून दिग्गजाला वाटलें कीं, आज ही प्रणयिनी आली आहे तर हिची सरस अभ्यर्थना केली पाहिजे. आणि म्हणून तो हात हालवून म्हणाला, 'ॐ आयाहि वरदे देवि' हें ऐकून अस्मानी म्हणाली, 'ही तर मोठी सरस कविता आहे! ही कशातरे आहे?'

दिग्गज ह्मणाला—'आज ही मुद्दाम तुजकरितां करून ठेविली होती.'

अस्मानी ह्मणाला—'असें काय, म्हणूनच तुला मी रसिकराज म्हणत्यें.'

दिग्गज—'रसिकःकौपिकोवासःसुंदरि! आधीं तूं खालीं तर बस; मी हात धुवून येतों.' अस्मानी आपल्याशींच म्हणते,'काय, तूं हात धुतो म्हणतोस; आणि मी तर तुजकडून हा उष्टा भात खावविणार!' ती मोठ्यानें म्हणाली 'हें काय तुम्ही करितां? हात कां धुतां? भात नाहीं कां खावयाचा?'

गजपति—'हें काय! मी तर जेवून उठलों देखील आणि पुन्हां कसा भात खाऊं?'

अस्मानी—'तुमचा हा भात खावयाचा राहिला आहे, तो खावयाचा सोडून रिकामा उपहास काय ह्मणून करितां?'

दिग्गज—(थोडासा खजील होऊन ह्मणाला) 'काय करूं, आपण घाईच फार केलीत' असें म्हणत सतृष्ण नेत्रांनीं तो अन्नाकडे पाहूं लागला.

अस्मानी–‘ तर आतां पुन्हां खा. ’

दिग्गज–‘ राधे माधव ! मी अंचवलों, उठून उभा देखील राहिलों, आणि आतां काय पुन्हां खाऊं ? ’

अस्मानी–‘होय, खाल्लेंच पाहिजे. माझें उष्टें देखील खाल्लें पाहिजे. ’ असें बोलून अस्मानीनें भोजनपात्रांतील एक घास घेऊन आपण स्वतः खाल्ला !

ब्राह्मणाला फार आश्चर्य वाटलें.

अस्मानी आपलें उष्टें अन्न भोजनपात्रांत ठेऊन म्हणाली, ‘खा आतां हा. ’

ब्राह्मणाचे तोंडांतून एक चकारशब्द सुद्धां निघेना. तेव्हां अस्मानी म्हणाली, ‘खा, खा, माझें ऐका. तुम्ही माझें उष्टें खाल्लें असें मी कोणास देखील सांगणार नाहीं. कोणाला समजलेंच नाहीं तर मग त्यांत दोष तो कशाचा ? ’

दिग्गज म्हणाला, ‘ नाहीं कळलें म्हणून काय झालें ? असें कोठें कधीं झालें आहे ! ’

पण त्याच्या पोटांत आग पेटली होती. तो मनांतल्या मनांत विचार करूं लागला कीं, ‘ ही म्हणत्येच आहे तर आपण गुप्त रीतीनें हिचें उष्टें खाऊन जठराग्नि तर गार करून घ्यावा. ’

अस्मानी त्याचे ते हावभाव पाहून म्हणाली, ‘ खा, अथवा न खा. पण एकवार पाटावर तर बसाल. ’

दिग्गज म्हणाला, ‘ कां ? त्यांत काय आहे ? ’

अस्मानी म्हणाली, ‘ माझी तशी इच्छा आहे. काय, तुम्ही माझी एकसुद्धां इच्छा नाहीं कां तृप्त करीत ? ’

दिग्गज म्हणाला, 'नुस्तें ताटाजवळ बसण्यानें काय होणार आहे? त्यांत कांहीं दोष नाहीं. तुमच्या म्हणण्याप्रमाणें कां होईना.' असें बोलून दिग्गज पंडित अस्मानीच्या सांगण्यावरून ताटाजवळ पाटावर जाऊन बसते झाले. पोटांत भूक होती, जवळ अन्न होतें, इतकें असून त्याला तें खातां येत नव्हतें—त्याचे डोळे पाण्यानें भरून आले.

अस्मानी म्हणाली, 'शूद्राच्या उष्ट्याला ब्राह्मण शिवला तर काय करावें लागतें?'

पंडित म्हणाले, 'अंघोळ केली पाहिजे.'

अस्मानी म्हणाली, 'मी तुम्हाला किती आवडत्यें तें आज मला कळून आलें. आतां मी जात्यें. तुम्हीं मी सांगितलें तर आज रात्रीं आंघोळ कराल?'

दिग्गज आपला धाकटा डोळा रसभावानें अर्धाच मिटून आपलें मोठें नाक वांकडें करून हंसत हंसत म्हणाला, 'त्यांत अधिक तें काय? आतां म्हणशील तर अंघोळ करितों.'

अस्मानी म्हणाली, 'मला आज अशी इच्छा झाली आहे कीं, आपल्या ताटांतून थोडा प्रसाद ग्रहण करावा! तुम्हीच आपल्या हातानें थोडासा भात कालवून मला द्याल काय?'

दिग्गज म्हणाला, 'त्यांत काय कठीण आहे? स्नान केलें कीं झालें शुद्ध.' असें बोलून सगळें उष्टें अन्न एकत्र करून तो कालवूं लागला.

अस्मानी म्हणाली, मी तुम्हांला एक गोष्ट सांगत्यें ती ऐका. जोंपर्यंत माझी गोष्ट चालली आहे तोंपर्यंत तुम्ही भात कालवित राहिलें पाहिजे, नाहीं तर मी खाणार नाहीं.'

दिग्गज ह्मणाला, 'ठीक आहे.'

अस्मानीनें एक राजा व त्याच्या आवडत्या व नावडत्या राण्यांची गोष्ट सांगण्यास आरंभ केला, आणि दिग्गज तिजकडे पहात पहात भात कालवूं लागला.

ऐकतां ऐकतां दिग्गजाचें मन अस्मानीच्या गोष्टींत गढून गेलें, आणि तिच्या त्या हसण्यानें, रेखून पाहण्यानें, त्याचें तें मन अगदीं दंग झालें. इकडे भात कालविण्याचें बंद पडलें. ताटाला नुस्ता हात मात्र लागून राहिला. पोटांत तर भूक होतीच आणि जेव्हां कां एकदां अस्मानीची गोष्ट अगदीं भररंगांत आली, आणि दिग्गजाचें मन त्यांत अगदीं गुंग होऊन गेलें, तेव्हां इकडे त्याच्या हातानें त्याचा विश्वासघात केला. त्यानें ( हातानें ) जवळच असलेल्या कालविलेल्या भातापैकीं न कळत एक घास उचलून हळूच तो दिग्गजाचे तोंडांत नेऊन सोडिला. तोंडानें तो आपला मुकाट्यानें घेतला. दांत विशेषशा खटपटींत न पडत गुपचूप चावूं लागले. जिभेनें तो अलग घशाखालीं लोटला. तरी हें सर्व कृत्य त्या निरीह दिग्गजाचे ध्यानीं मनींही आलें नाहीं. तें पाहून अस्मानी मोठ्यानें हंसली आणि म्हणाली, 'अरे ब्राह्मणा, माझें उष्टेंनारे तें, आणि तें खाल्लेंस !'

तेव्हां कोठें दिग्गज शुद्धीवर आला. घाईघाईनें दुसरा एक घास तोंडांत कोंबून गिळतां गिळतां तसाच तो अस्मानी-

च्या पायां पडला आणि चावतां चावतां रडून म्हणूं लागला, ' मला संभाळ आतां अस्मानी, तूं कोणास हें सांगूं मात्र नको. '

## प्रकरण १४ वें.

### दिग्गज हरण.

इतक्यांत विमला येऊन तिनें बाहेरून दरवाजा खडखडाविला. विमला दाराजवळून लपून सर्व पाहूं लागली. दरवाजाचा शब्द ऐकून दिग्गजाचा चेहरा अगदीं फिक्का पडून गेला. अस्मानी म्हणाली, 'काय झालें हें! विमला आली आहे लपून बसा लपून बसा.'

दिग्गज रडत रडत म्हणाला, 'कोठें लपूं?'

अस्मानी म्हणाली, ' पलीकडच्या त्या अंधेऱ्या कोंपऱ्यांत एकादें काळें मडकें डोकीवर घेऊन बसा. अंधेरांत कोणाला दिसणार आहे?' दिग्गज तसें करावयास गेला, व अस्मानीच्या बुद्धीची तीव्रता पाहून त्यास आश्चर्य वाटलें. दुर्भाग्यानें त्या घाईंत ब्राह्मणानें एक वरण शिजवावयाचें मडकें डोक्यावर पालथें केलें; तें वरणानें अर्धें भरलेलें होतें. दिग्गजानें मडकें घेऊन डोक्यावर पालथें करतांच डोक्यावर वरणाच्या शेंकडों धारा सुरू झाल्या; मूळ प्रारंभ शेंडींतून झाला. नंतर तेथून खांद्यावरून, छातीवरून, पाठीवरून आणि बांहूंवरून एकसारखी धार सुरू झाली. पहाडावरून खालीं येतांना नदीला जसे पाण्याचे लोंढे येतात,

त्याप्रमाणें वरणाचे पुरावरपूर लोटूं लागले. त्याचें उंच नाकाड वरणाच्या झऱ्यांनीं युक्त अशा गिरिशृंगाप्रमाणें शोभूं लागलें. इतक्यांत विमला घरांत घुसली आणि दिग्गजाची ती मौज पाहूं लागली. दिग्गज विमलेला पाहून रडूं लागला. तें पाहून विमलेला त्याची दया आली. तेव्हां ती म्हणाली, 'रडूं नको. तूं हा उरलेला भात जर खाशील तर मी कोणालाही ही गोष्ट सांगणार नाहीं.'

तेव्हां ब्राह्मणाला बरें वाटलें. त्याचें मुख प्रफुल्लित होऊन तो पुन्हां भात खावयास बसला. त्याच्या मनांत फार होतें कीं, आंगावर सांडलेलें वरण पण धुऊन खाऊन जावें. पण तसें त्याला करितां येईना, किंवा तसें करण्यास त्याला हिंमतही पण येईना. अस्मानीकरितां जो भात त्यानें कालविला होता तो देखील त्यानें खाल्ला. तुरीचें वरण तेवढें फुकट गेल्याबद्दल त्याच्या मनाला चुटपुट लागून राहिली. खाणें पुरें झाल्यावर अस्मानीनें त्याला स्नान घातलें, नंतर ब्राम्हणाचें चित्त थोडेंसें स्थिर झालें; तेव्हां विमला त्याला ह्मणाली, 'रसिका ! आज तुला एक मोठी गोष्ट सांगावयाची आहे.'

रसिक—'ती कोणती ?'

विमला—'तुला मी आवडत्यें कां नाहीं ?'

दिग्गज—'आवडत्ये म्हणजे ?'

विमला पुन्हां म्हणाली, 'काय आम्हीं दोघीही तुला आवडतों ?'

दिग्गज—'होय दोघेही.'

विमला—'आम्हीं तुला सांगूं तें तूं करशील ?'

दिग्गज—'नाहीं कां करणार ?'

विमला—'आतां करशील?'

दिग्गज—'होय आतां करीन.'

विमला—'काय, या क्षणीं?'

दिग्गज—'होय, या क्षणीं?'

विमला—'आम्हीं दोघी कां येथें आलों आहोंत, हें तुला माहित आहे काय?'

दिग्गज—'नाहीं.'

अस्मानी—'आम्हांला तुझ्याबरोबर पळून जावयाचें आहे.' हें ऐकून ब्राह्मण वेड्यासारखा होऊन पाहूं लागला. विमला मोठ्या मुष्किलीनें हंसणें दाबून म्हणाली, 'कां बोलत कां नाहींस?'

दिग्गज म्हणाला 'हा, हा, ता, ता, ता, ता,' ह्यांशिवाय त्याच्यानें कांहीं बोलवेना.

नंतर अस्मानी म्हणाली, 'तुझ्यानें हें होणार नाहीं कां?'

दिग्गज—' हा, हा, हा, ता, ता—' उपाध्येबोवांना सांगून येतों.''

विमला—'उपाध्येबोवांना तें काय सांगावयाचें आहे? आज कां तुझ्या आईचें श्राद्ध आहे म्हणून तूं त्यांना व्यवस्था करण्यास सांगणार आहेस?'

दिग्गज—'नाहीं, नाहीं, तर मग नाहीं जात; पण मग आपल्याला केव्हां जावयाचें?'

विमला—'केव्हां म्हणजे आतांच चल, पहात नाहींस कां, कीं मी दागदागिने घेऊन बाहेर पडल्यें आहे ती?'

दिग्गज—'काय, आतांच?'

विमला—' आतां नाहींतर केव्हां ? जर तुला आम्हांबरोबर यायचें नसेल, तर तसें सांग, म्हणजे आम्ही दुसऱ्या कोणाला घेऊन जाऊं ?'

गजपतीच्यानें आतां राहवेना. तो म्हणाला, ' चला मी येतों.'

विमला—' आपलें धोतरबितर तर कांहीं घे.'

दिग्गजानें आपलें अंगवस्त्र घेतलें. विमला पुढें चालूं लागली आणि तिच्या मागून दिग्गज जाऊं लागला. तो म्हणाला, ' सुंदरी!'

विमला—' काय म्हणतोस ?'

दिग्गज—' आपण येथें परत केव्हां येऊं ?'

विमला—' आतां येणें कशाचें ? एकदां निघाल्यावर.' हंसतां हंसतां दिग्गजाचें तोंड हर्षभरित दिसूं लागलें. तो म्हणाला, ' पण ते सोन्यारुप्यांचे, व हिऱ्यामाणकांचे दागिने कोठें आहेत ?'

विमला—' त्यांची तुला काय काळजी ? आपण रस्त्यांत खरेदी करूं.' हें ऐकून ब्राह्मण जरा दिलगीर झाला. काय करील! आपण त्यांजवर प्रीति करीत नाहीं, असें ह्या स्त्रिया समजतील म्हणून आपलें लक्ष तिकडे मुळींच नाहीं हें दाखविण्यासाठीं तो म्हणाला, ' माझ्या पोथ्यांचे काय करावयाचें ?'

विमला—' जलदीनें घेऊन ये जा त्या.'

विद्यादिग्गजाच्या फक्त दोनच पोथ्या होत्या. एक व्याकरणाची आणि दुसरी स्मृतीची. तो व्याकरणाची पोथी हातीं घेऊन म्हणाला, ' हिचें मला काय काम आहे ? ही तर मला मुखोद्गत आहे.' असें म्हणून फक्त स्मृतीची

पोथी त्यानें घेतली, आणि मुखानें दुर्गा, श्रीहरि यांचें स्मरण करीत विमला आणि अस्मानी यांजबरोबर तो चालूं लागला.

अस्मानी–' तूं पुढें हो, मी मागाहून येतें.'

असें म्हणून अस्मानी घरीं गेली. विमला आणि गजपति मिळून चाललीं. अंधारांतून दोघेंही लपत लपत किल्ल्याच्या बाहेर पडलीं. कांहीं दूर गेल्यावर दिग्गजानें विचारिलें, ' अजून अस्मानी कां बरें येत नाहीं ही?'

विमला–' कदाचित् तिला येतां आलें नसेल. तूं चलसना. तुला तिच्याशीं काय करावयाचें आहे?'

हें ऐकून रसिकराज स्वस्थ राहिले. कांहीं वेळानें त्यांनीं दीर्घश्वास टाकून 'आतां कशाचे ते सोन्यारुप्यांचे दागिने!' इतके मात्र शब्द तोंडाबाहेर काढिले.

---

# प्रकरण १५ वें.

## दिग्गजाचें साहस.

विमलेनें हां हां म्हणतां मांदारण गांव मागें टाकिलें. ती रात्र फार अंधारी होती, म्हणून केवळ ताऱ्यांच्या प्रकाशांत फार सावधगिरीनें ती चालली होती. जातां जातां जेव्हां अरण्याचा रस्ता लागला तेव्हां विमलेला किंचित् भय वाटूं लागलें. तिचा सोबती मुकाट्यानें तिच्यामागून येत होता. इतक्या वेळांत त्यानें तोंडांतून एक शब्द देखील काढिला नव्हता. इतक्यांत आमचे दिग्गज कांहीं थोडेसें पुटपुटले; त्याचें पुटपुटणें ऐकून तिला थोडी हिम्मत आली,

आणि तो काय पुटपुतो आहे हें समजण्याची तिला इच्छाही झाली. म्हणून तिनें गजपतीला विचारिलें, 'कां रसिक रतन ! काय विचार चालला आहे ?'

रसिक रतन म्हणाले, 'ते सोन्यारुप्यांचे दागिने कोठें आहेत ?' ह्या प्रश्नाचा विमला कांहींच जबाब न देतां तोंडावर पदर धरून आंतल्या आंत हंसूं मात्र लागली.

थोड्या वेळानें विमला पुनः म्हणाली, 'कायरे दिग्गज ! तूं भूताबितांना भितोस खरा कां ?'

'राम ! राम ! राम ! रामनाम घे,' असें बोलून तो भराभर पावलें टाकून विमलेच्या पाठीशीं अगदीं दोन हातांच्या अंतरानें चालूं लागला.

प्रत्येक पाऊल दिग्गज मागेंपुढें पाहिल्याशिवाय टाकीत नाहीं असें पाहून विमला म्हणाली, 'हा रस्ता केवळ भूतांचें आगर आहे म्हणतात बाई !'

हे ऐकतांच दिग्गजानें विमलेचा पदर धरिला. विमला तशीच पुढें बोलूं लागली, 'मी त्या दिवशीं शैलेश्वराच्या पूजेस गेलें होत्यें कीं नाहीं, त्या दिवशीं परत येतांनाच या रस्त्यांत पुढें वडाखालीं एक फार विक्राळ मूर्ति माझ्या दृष्टीस पडली.'

आपल्या लुगड्याचा पदर थरथर कांपतो आहे असें पाहून विमला मनांत समजून चुकली कीं, हा ब्राह्मण अगदीं भेदरून गेला आहे. आतां जर आपण ह्याला जास्त भय घातलें तर हा अगदीं निश्चेष्ट होऊन पडेल, म्हणून ती मोठ्या शांत आवाजानें उघड म्हणाली, 'रसिकराज ! तुम्हांला गातां येतें कां ?'

रसिक पुरुष म्हणजे त्याला गातां आलेंच पाहिजे आणि म्हणूनच दिग्गज म्हणाला, ' हो, हो, येतें आहे म्हणजे ! '

विमला म्हणाली, ' तर मग एखादें गाणें गा पाहूं ? '

दिग्गजानें गाण्यास सुरुवात केली, ' ए, हूम–ऊ, हूम कळंबाचे झाडावरि । देखिलाग हरि. '

आमच्या विद्यादिग्गजांचा आवाज इतका गोड होता कीं, तेथें रस्त्यांतच एक गाय रंवथ करीत बसली होती ती मात्र तें गाणें ऐकून जीव घेऊन पळाली.

दिग्गजाचें पुढें गाणें बंदच पडलें; एकदम त्याचें श्रवणेंद्रिय मुग्ध होऊन गेलें; अमृतमय, मनाला वेडें करणारा, अप्सरेच्या हातांतील विण्याच्या शब्दाप्रमाणें मधुर, असा संगीताचा ध्वनि त्याच्या कानांत एकदम घुमूं लागला. दिग्गज पहातो तों विमलेनें स्वतः अगदीं मोकळ्या आवाजानें गाण्यास सुरुवात केली आहे.

त्या शांत अरण्यांत, रात्रीं, आकाश व्यापून, तिचे ते सप्तस्वर पूर्णपणानें बाहेर उमटूं लागले, व वसंतऋतूंतील थंड वाऱ्याबरोबर तिचा तो आवाज दूरवर पसरूं लागला. दिग्गज कांहीं हालचाल न करितां तल्लीन होऊन ऐकत होता; जेव्हां विमलेनें गाणें पुरें केलें तेव्हां गजपति म्हणाला, ' आणखी. '

विमलेनें विचारिलें, ' आणखी काय ? '

दिग्गज म्हणाला, ' आणखी एक गाणें गा. '

विमलेनें विचारिलें, ' काय गाऊं ? '

दिग्गज म्हणाला, ' एक बंगाली गाणें गा. '

'बरें गातें' असें म्हणून तिनें आणखी एक गाणें गाण्यास सुरुवात केली.

गातां गातां तिनें पाहिलें तों आपल्या लुगड्याला मागून सपाटून ओढ लागली आहे. मागें वळून पहातें तों दिग्गजानें धरिलेला पदर न सोडितां एकदम तिच्या मांडीवर डोकें टेकिलें. तेव्हां विमला आश्चर्यानें म्हणाली, 'काय, झालें तरी काय? आणखी भूतबित आलें आहे कीं काय?'

ब्राह्मणाच्या तोंडावाटें एक शब्दही उमटेना. तो कांपत कांपत बोटानें दाखवून म्हणाला, 'तें, तें पहा पलीकडे.'

विमला मुकाट्यानें त्यानें दाखविलेल्या जागेकडे पाहूं लागली, तों कोणी मोठ्यानें धांपा टाकीत आहे असें तिला ऐकूं येऊं लागलें, आणि त्याच दिशेला एक पदार्थ रस्त्याजवळच पडलेला आहे असें तिला दिसलें.

विमला हिम्मत धरून तें काय दिसत आहे हें जवळ जाऊन पाहूं लागली, तों एक स्वाराचा सजविलेला घोडा मरत पडला असून तो मोठ्यानें धांपा टाकीत आहे असें तिच्या दृष्टीस पडलें बराच वेळपर्यंत तिच्यानें अगदीं कांहीं सुद्धां बोलवेना, तरी ती तशीच चालूं लागली. अशी सुमारें अर्धा कोस चालून जाते आहे, तों पुनः गजपतीनें तिचा पदर धरून ओढिला.

विमला म्हणाली, 'आतां कां?'

गजपतीनें पायापाशीं पडलेली एक वस्तु उचलून ती तिला दाखविली. ती पाहून विमला म्हणाली, 'हें तर कोणा शिपायाचें पागोटें आहे!' विमला पुनः विचारांत चूर होऊन गेली व आपल्या मनांत म्हणूं लागली, 'की

ज्याचा तो घोडा त्याचेंच हें पागोटें असावें; छे ! असे नाहीं, हें पागोटें कोणा पायदळ शिपायाचें असलें पाहिजे.'

थोड्याच अवकाशानें चंद्रोदय झाला. विमला तर जास्त जास्तच विचार करूं लागली. थोड्या वेळानें गजपतीनें हिम्मत धरून विचारिलें, 'सुंदरी, आतां अगदीं बोलत नाहींस हें काय?'

विमलेनें विचारिलें, 'तुला या रस्त्यांत कांहीं उमटलेलीं चिन्हें दिसतात कां?'

गजपति विशेष ध्यान देऊन रस्त्याकडे पाहून म्हणाला, 'हो दिसताहेत; येथें पुष्कळ घोड्यांच्या टांपा उमटलेल्या आहेत.'

विमलेनें विचारिलें, 'अहो पंडितराज! यावर तुमची कांहीं कल्पना बसते आहे काय?'

दिग्गज म्हणाला, 'छे बुवा, कांहीं नाहीं.'

विमला म्हणाली, 'तो तेथें मरत पडलेला घोडा, तें शिपायाचें पागोटें, आणि येथें उमटलेल्या ह्या घोडयांच्या टांपा, हीं पाहून तुला कांहींच अनुमान करतां येत नाहीं! कांहीं सांगतोस कां मी सांगूं?'

दिग्गजानें विचारिलें, 'तुला काय वाटतें?'

विमला म्हणाली, 'आतांच या रस्त्यानें मोठें लष्कर गेलें असावें म्हणून.'

गजपति भयभीत होऊन म्हणाला, 'असें असेल तर मग आपण हळू हळू जाऊं चला. त्यांना खूप बरेंच पुढें जाऊं द्या.

हें ऐकून विमला हंसून म्हणाली, 'हा मूर्खा! त्यांनारे

कसें पुढें जाऊं द्यायचें? घोड्यांच्या या टांपावरून नाहीं कां तुला कळत, कीं हें लष्कर बहुधा गडमांदारणावर गेलें असावें म्हणून?' असें बोलून ती स्तब्ध राहिली.

थोड्या वेळानें समोर शैलेश्वराचे मंदिराचें शुभ्र शिखर दिसूं लागलें. विमलेनें विचार केला कीं, रजपूताबरोबर या ब्राह्मणाची भेट होऊं देण्याचें कांहीं कारण नाहीं. झाल्यास उलटें नुकसान मात्र होण्याचा विशेष संभव आहे, याकरितां हा येथून जाईल असें कसें बरें करावें? ह्या विचारांत ती होती, तों गजपतीनें आपणच तें तिला सुचवून दिलें.

ब्राह्मण पुनः तिच्या पाठीवरचा पदर ओढून धरूं लागला. तें पाहून विमलेनें त्यास विचारिलें, 'आतां काय आहे आणखी?'

ब्राह्मण हळू हळू सांगूं लागला, 'तें किती दूर आहे!'

विमलेनें विचारिलें, 'काय किती दूर आहे?'

त्यानें उत्तर केलें, 'तें वडाचें झाड?'

विमलेनें विचारिलें, 'कोणतें वडाचें झाड?'

दिग्गजानें उत्तर केलें, 'ज्या खालीं तुम्ही त्या दिवशीं तें पाहिलें होतें तें!'

विमलेनें विचारिलें, 'काय पाहिलें होतें?'

दिग्गज म्हणाला, 'रात्रीं त्याचें नांव घेऊं नये तें?'

विमला मनांत समजली. तिला तर तेंच पाहिजे होतें. तेव्हां ती गंभीर आवाजानें म्हणाली, 'तो पहा.'

ब्राह्मण ज्यास्तच भयाभीत होऊन विचार करूं लागला, 'तो कोण?'

विमला हळूच शैलेश्वराजवळच्या वडाकडे बोट दाखवून म्हणाली, ‘ तो पहा वड दिसत आहे. ’

दिग्गज तेथून हालेना. तो चलनशक्तिरहित होऊन तेथल्या तेथें पिंपळाच्या पानांप्रमाणें कांपूं लागला.

विमला म्हणाली, ‘ येतोसना ? ’

ब्राह्मण थर थर कांपत म्हणाला, ‘ माझ्यानें नाहीं आतां येववत. ’

विमला म्हणाली, ‘ मलाही पण बाई फार भय वाटतें. ’

हें ऐकतांच ब्राह्मण मागें फिरून पळून जाण्याच्या तयारींतच होता.

विमला झाडाकडे पाहूं लागली, तों कांहीं पांढरा पदार्थ झाडाखालीं पडलेला तिला दिसला. विमलेला पक्कें ठाऊक होतें कीं, झाडाच्या खालीं शैलेश्वराचा सांड निजला असावा, पण ती गजपतीला म्हणाली, ‘गजपति ! इष्टदेवतेचें स्मरण कर. त्या झाडाखालीं तुला कांहीं दिसतें आहे ? ’

‘ अरे, बापरे ! ’—असें मोठ्यानें ओरडून दिग्गजानें एक धूम मारिली, व लांब लांब पावलें टाकीत बोलतां बोलतां तो अर्धा कोस निघून गेला.

विमला त्याचा स्वभाव जाणून होती, म्हणून तिला वाटलें कीं, आतां तो एकदम किल्ल्याचा दरवाजा गांठील; त्यामुळें ती निश्चित होऊन मंदिराकडे जाऊं लागली.

येतेवेळीं एका बाबतीशिवाय करून विमला सर्वप्रकारें विचार करूनच निघून आली होती. ‘ राजपुत्र मंदिरांत आला असेल कीं नाहीं ? ’

विमलेच्या मनांत ही शंका जेव्हां उत्पन्न झाली तेव्हां;

मात्र तिला फार वाईट वाटूं लागलें; पण जेव्हां ती ह्या गोष्टीविषयीं विचार करूं लागली तेव्हां तिला असें वाटलें कीं, राजपुत्र आपणांस खोटें वचन कधींही देणार नाहीं. जरी तो फक्त इतकेंच ह्मणाला होता कीं, ' येथें माझी भेट होईल, नच झाली तर मात्र मग कधींही होणार नाहीं. तरी तो इतकें खोटें बोलेल असें मला वाटत नाहीं.

जर कां तो न येईल तर मग आपले हे एवढे क्लेश निरर्थक होत. विमला दिलगीर होऊन आपल्या मनाशींच बोलूं लागली, 'यासंबंधीं मी प्रथमच कां बरें नाहीं विचार केला ? ब्राह्मणाला कां बरें व्यर्थ पळवून लाविलें ? आतां एकटी अशा रात्रीं कशी बरें माघारी जाऊं ? शैलेश्वरा ! तुझी जशी इच्छा असेल तसें कर.'

वडाच्या झाडाखालूनच शैलेश्वराच्या मंदिरांत जावें लागत असे. विमला झाडाखालून जातांना पाहूं लागली तों तेथें कोठें सांड नाहीं. झाडाखालीं तिला जो शुभ्र पदार्थ एवढा वेळ दिसत होता, तो आतां तेथें नव्हता.

विमलेला थोडेंसें आश्चर्य वाटलें. कारण तो सांड कोठें-हीं गेला असतां तरी रस्त्यांत तिच्या दृष्टीस पडता.

विमला झाडाखालीं जाऊन नीट न्याहाळून पाहूं लाग-ली, तों त्या झाडाच्या पलीकडच्या अंगास कोणा माण-साच्या सफेद पोषाखाचा कांहीं भाग तिच्या दृष्टीस पडला. तें पाहून ती फारच भयाभीत झाली आणि अति त्वरेनें मंदिराकडे जावयास निघाली. पायऱ्यांजवळ आली व तिनें त्या एका उडीसरशा वलांडिल्या, आणि मोठ्या जोरानें दारावर तिनें धक्का मारिला.

दार बंद होतें.

आंतून गंभीर आवाजानें 'कोण आहे ?' म्हणून कोणी विचारिलें.

शून्य मंदिरांतून त्या गंभीर आवाजाचा प्रतिध्वनि 'कोण आहे ?' म्हणून उमटला.

विमलेनें अगदीं मुठींत जीव धरून मोठ्या धैर्यानें उत्तर केलें, 'मी एक थकलेली प्रवासी स्त्री आहें.'

दार तर उघडलें.

तिनें पाहिलें तों मंदिरांत दिवा जळत असून समोर हातीं ढाल तलवार घेऊन एक धिप्पाड पुरुष उभा आहे.

विमलेनें पाहिल्याबरोबर ओळखिलें, कीं हा 'कुमार जगत्सिंह'च होय.

---

## प्रकरण १६ वें.

---

### शैलेश्वराचे समोर.

विमलेनें मंदिरांत प्रवेश केल्यावर प्रथम बसून थोडीशी विश्रांति घेतली. नंतर नम्रभावानें शैलेश्वराला नमस्कार करून मग तसाच युवराजालाही तिनें प्रणाम केला. थोडा वेळ तीं दोघेंही स्तब्ध राहिलीं. आपल्या मनांतील भाव दुसऱ्याला बोलून कसा कळवावा याचें त्या दोघांस मोठें संकट पडलें. बोलावयास प्रारंभ कसा बरें करावा ?

विमला असल्या प्रसंगीं संधिविग्रह करण्यांत मोठी पटाईत होती. ती थोडें हंसून म्हणाली, 'युवराज ! आज शैले-

श्वराच्या कृपेनें आपलें दर्शन मला घडलें; अशा या रात्रीं मैदानांतून एकटें येतांना मला फार भय वाटलें, पण आतां या मंदिरांत आपलें दर्शन झाल्यानें त्या सगळयाचें सार्थक झालें.'

हें ऐकून युवराजानें विचारिलें, 'आपल्याकडील सर्व माणसें कुशल तर आहेतना?'

विमला प्रथम राजकुमाराचें तिलोत्तमेवर खरोखरच मन आहे कीं नाहीं हें पाहावें, आणि त्याचा एकदांचा निर्णय झाल्यावर मग दुसरें काय बोलणें तें बोलावें, असा विचार करून म्हणाली, 'ज्यायोगें मंगल होईल ती प्रार्थना करण्याकरितांच मी शैलेश्वराची पूजा करण्यास आल्यें आहे. आतां मला वाटतें, कीं आपल्या पूजेनेंच शैलेश्वर तृप्त झाला आहे. त्याला माझ्या पूजेची इच्छाच राहिली नाहीं, ह्मणून आपली रजा असेल तर मी परत जाईन म्हणत्यें.'

युवराज म्हणाला, 'जावें, पण तुम्हीं एकटें जावें हें मला उचित दिसत नाहीं. मीही तुम्हांस पोंहोचविण्यास येईन म्हणतों.'

हें ऐकून विमलेनें आपले मनांत ताडिलें कीं, ह्या राजपुत्रानें आपला सर्व जन्म केवळ हत्यारें चालविण्यास शिकण्यांतच घातला नसावा. नंतर तिनें राजपुत्रास उघड विचारिलें कीं, 'एकटें जाण्यास काय हरकत आहे?'

युवराजनें उत्तर दिलें, 'मार्गांत फार भीति आहे म्हणून?'

विमला म्हणाली, 'असें असेल तर मी महाराज मानसिंहाकडे जाईन.'

राजपुत्रानें विचारिलें, 'कशाकरितां?'

विमला म्हणाली, 'कशाकरितां म्हणजे? त्यांच्यापाशीं माझी एक फिर्याद आहे. हल्लीं त्यांनीं जो सेनापति नेमिला आहे, त्याच्यानें आमच्या मार्गांतील विघ्नें दूर करवत नाहींत, आणि ह्मणूनच तो शत्रूचा नाश करण्यास असमर्थ आहे ही.'

राजपुत्र हंसून म्हणाला, 'सेनापति सांगेल कीं, शत्रूला मारणें या देवालाही असाध्य आहे, तर मग तेथें मनुष्याचा तो काय पाड! ह्याचेंच उदाहरण पहा कीं, महादेवानें स्वतः तपोवनांत मन्मथरूपी शत्रूला भस्म केलें होतें, मग आजच पंधरा दिवस झाले त्याच मन्मथानें ह्याच त्याच्या मंदिरांत मोठें बंड करून सोडिलें आहे. हा तर महादेवाचा पराक्रम!'

विमला थोडें हंसून म्हणाली, 'असें बंड त्यानें कोणाशीं बरें केलें?'

युवराज म्हणाला, 'सेनापतीशीं?'

विमला म्हणाली, 'असल्या असंभाव्य गोष्टीवर महाराज विश्वास कसा बरें ठेवतील?'

युवराजानें उत्तर केलें,'त्याबद्दल मी साक्ष देईन.'

विमलेनें विचारिलें, 'महाराज! असली कसली साक्ष ही?'

युवराज म्हणाला, 'सुचरित्रांतली–'

राजपुत्राचें हें वाक्य पुरें होऊं न देतां विमला मध्येंच म्हणाली, 'ही दासी अति कुचरित्रांतली आहे. मला विमला म्हणतात.'

राजपुत्र म्हणाला, 'प्रत्यक्ष विमलाच त्याला साक्ष आहे तर; मग?'

विमला म्हणाली, 'विमला असली साक्ष देणार नाहीं.

युवराज म्हणाला, 'असें संभवतें खरें. जें मनुष्य आपण दिलेलें वचन एका पंधरा दिवसांतच विसरून जातें, तें खरी साक्ष काय देणार आहे?'

विमला म्हणाली, 'महाराज मी असें कोणतें वचन आपणांस दिलें आहे त्याची आठवण तर मला करून द्याल, म्हणत्ये?'

युवराज म्हणाला, 'आपल्या सखीची ओळख करून देण्याविषयींचें.'

विमलेनें एकदम थट्टा करण्याचें सोडिलें, आणि ती मोठ्या गंभीर मुद्रेनें म्हणाली, 'ओळख करून देण्याचें मला मोठें संकट पडलें आहे. आपणास त्यामुळें वेळेस दुःख झालें तर?'

राजपुत्रानेंही थोडा वेळ विचार केला; त्याचे तोंडावरील थट्टेचीं सर्व चिन्हें नाहींशीं झालीं; तो विचार करून म्हणाला, 'विमले! नुस्ती ओळख करून घेण्यानें खरोखरच कां मला दुःख होण्यासारखें आहे?'

विमला म्हणाली, 'होय खरोखरच आहे.'

राजपुत्र पुन्हां विचारांत निमग्न झाला; क्षणभर विचार करून तो म्हणाला, 'कांहींही असो; तूं माझी इच्छा पूर्ण करच. मी जी असह्य उत्कंठा सहन करीत आहे, त्यापेक्षां मला अधिक दुःख होईल असें मला वाटत नाहीं. तुला जी शंका येते ती जरी खरी असली, तरी तें दुःख या दुःखापेक्षां पत्करलें; माझ्या मनाला त्यापासून समाधान तर वाटेल. विमले! मी केवळ उत्कंठित होऊन चैनी-

साठींच तुला भेटण्यास आलों नाहीं. चैन करावयास मला हल्लीं वेळच नाहीं. आज पंधरा दिवस झाले, घोड्याची पाठ हेंच माझें विश्रांतिस्थान होऊन बसलें आहे. माझें मन अत्यंत व्याकूळ झाल्यामुळेंच मीं येथें आलों आहे.'

विमलेनें तर हा सर्व खटाटोप एवढें ऐकण्यासाठींच केला होता. आणखी राजपुत्र काय म्हणतो हें ऐकण्यासाठीं ती म्हणाली, 'युवराज ! आपण राजनीतींत कुशल आहांत. विचार करून पहा कीं, अशा या लढाईच्या प्रसंगीं आपल्याला दुर्लभ अशा रमणीवर मन ठेविणें उचित आहे काय ? उभायतांच्या सुखासाठीं म्हणून मी सांगत्यें, आपण माझ्या सखीला विसरून जाण्याला प्रयत्न करा, म्हणजे युद्धाचे कामीं आपणांस चांगला उत्साहही येईल, आणि आपण यशस्वी व्हाल.'

हें ऐकून युवराज हंसला; पण त्या हंसण्यावरून त्याच्या मनाला किती खेद होत होता हें फारच स्पष्ट दिसत होतें; तो म्हणाला, 'कोणाला विसरूं ? तुझ्या सखीचें रूप फक्त एक वेळ पाहूनच जें चित्र माझ्या हृदयपटावर उठलें आहे, तें चित्र हें हृदय दग्ध झाल्याशिवाय कसें नाहींसें होणार ? लोक मला पाषाणहृदयी ह्मणतात, आणि म्हणूनच पाषाणावर जी मूर्ति एकवार खोदिली जाते, ती पाषाणाचा नाश झाल्याशिवाय नाहींशीं होत नाहीं. विमले ! लढाईची गोष्ट तूं मला काय सांगत्येस ? मी तुझ्या सखीला पाहिलें तेव्हांपासून केवळ लढाईतच गुंतलों आहे. मी कोणच्याही रणभूमीवर अथवा छावणींत असलों तरी एक पळभर सुद्धां त्या मुखाचें मला विस्मरण होत नाहीं; ज्यावेळीं

हें शिर तोडण्याकरितां पठाणांनीं तरवार उगारली होती त्यावेळीं सुद्धां 'तें मुख आतां कधीं पाहण्यास मिळणार नाहीं, एकदांच सारें मिळालें,' हे विचार पहिल्यानें माझे मनांत आले! विमले, कोठें गेलें असतां तुझ्या सखीचें मला दर्शन घडेल?'

आणखी ऐकून विमलेला काय करावयाचें होतें! ती म्हणाली, 'गडमांदारणावर गेलें असतां माझ्या सखीचें तुम्हांस दर्शन होईल.' 'तिलोत्तमा वीरेंद्रसिंहाची कन्या होय.'

हें शेवटील वाक्य ऐकून आपल्याला काळसर्पानेंच दंश केला कीं काय, असें जगत्सिंहाला वाटलें. तो तरवारीवर टेंकून खालीं तोंड करून तसाच उभा राहिला, आणि बराच वेळ गेल्यावर एक मोठा उसासा टाकून म्हणाला, 'तुझें म्हणणें खरें आहे, तिलोत्तमा माझी होणार नाहीं. मीं आतां रणभूमीवर जातों, आणि सुखप्राप्तीविषयींचे माझे सर्व भावी विचार शत्रूंच्या रक्तांत बोळवून टाकितों.'

राजपुत्राला असा दिलगीर झालेला पाहून विमला म्हणाली,' युवराज! जर खऱ्या प्रेमाला बक्षीस असतें तर आपण तिलोत्तमेला मिळविण्याला योग्य आहांत. असें आपण एकदम काय म्हणून निराश होतां! आज प्रालब्ध जर शत्रु झालें असेल तर तेंच उद्यां अनकूलही होईल.'

आशा ही मोठी गोड बोलणारी आहे. किती जरी मनुष्य संकटांत असला तरी ती त्याचे कानांत येऊन हळूहळू म्हणते, 'बाबा! ढग पुष्कळ आले आहेत, पण ते कायमचे राहणारे नव्हेत; दुःखी कां होतो आहेस? मी सांगतें तें ऐक.'

विमलेच्या तोंडानें आशेनें सांगितलें, 'दुःखी कां होतो आहेस ? मीं सांगत्यें तें ऐक.'

जगत्सिंहानें आशेचे ते बोल ऐकिले. ईश्वरेच्छा कोण सांगूं शकेल ? विधिलेख कोणाला आगाऊ वाचतां येणार आहे ? या संसारांत अघटनीय असें काय आहे ? या संसारांत कांहीं अघटनीय घटना जुळून येत नाहींत काय ?

राजपुत्र आशेचें बोलणें ऐकल्यावर म्हणाला, 'कांहींही असो; पण माझें मन आज फारच अस्थिर झालें आहे. कर्तव्याकर्तव्य आज मला कांहींच कळत नाहीं, जें नशिबांत असेल तें पुढें घडून येईल. कपाळावरचें लिहिलेलें कोण पुसून टाकणार ? यत्क्षणीं माझ्या मनांत काय आहे तेवढें मात्र मला स्पष्ट सांगतां येत आहे. या शैलेश्वरासमोर मी प्रतिज्ञा करितों कीं, तिलोत्तमेशिवाय अन्य स्त्रीला मीं कधींही वरणार नाहीं. आतां तुजपाशीं माझी इतकीच विनंती आहे कीं, तूं हा सर्व मजकूर आपल्या सखीला कळीव आणि सांग कीं एकवार मात्र मी तुझ्या दर्शनाची इच्छा करीत आहें. पुन्हां ही इच्छा मी कधीं दर्शविणार नाहीं, असें वचन देतों.'

विमलेचें मुख हर्षानें प्रफुल्लित झालें. ती म्हणाली, 'माझ्या सखीचें उत्तर महाराजांस कसें मिळणार ?'

युवराज म्हणाला, 'तुम्हांला माझ्यानें वारंवार त्रास देववत नाहीं, पण जर तुम्ही या मंदिरांत मला पुन्हां येऊन भेटाल तर मजवर तुमचे फार उपकार होतील. जगत्सिंहाकडून कांहीं तरी मोबदला मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.'

विमला म्हणाली, 'युवराज! मी आपली दासी आहे पण या मार्गानें रात्रीं एकटें येण्यास अत्यंत भीति वाटते. आपल्याला दिलेलें वचन पाळावें ह्मणूनच मी आज आलें आहे, आजकाल या प्रदेशीं शत्रूंची मोठी भीति उद्भवली आहे. पुन्हां येण्यास फार भीति वाटेल म्हणून म्हणत्यें.'

राजपुत्र थोडासा विचार करून म्हणाला, 'कांहीं नुक- सान होणार नाहीं अशी जर तुम्ही खात्री देत असाल तर मी तुमच्याबरोबर गडमांदारणावर येतों. मी तेथें तुम्ही सांगाल त्या जागीं तुमची वाट पहात बसेन, आणि तुम्ही येऊन मला काय तो निरोप सांगा म्हणजे झालें.'

विमला आनंदित होऊन म्हणाली, 'तर मग चलाच!' दोघेंही मंदिरांतून बाहेर पडलीं; इतक्यांत बाहेरच्या बाजूस कोणी हलुहळू चालल्याचा पायरव त्यांचे कानीं आला. राजपुत्रानें आश्चर्यचकित होऊन विमलेस पुसलें, 'तुमच्या- बरोबर कां कोणी आलें आहे?'

विमलनें उत्तर केलें, 'नाहीं.'

'तर मग कोणाची बरें पावलें वाजलीं? मला वाटतें कीं कोणी येथें लपून बसून आपलें बोलणें ऐकिलें असावें.'

असें बोलून राजपुत्र बाहेर आला आणि मंदिराच्या चोहोंबाजूस हिंडून त्यानें पाहिलें तों तेथें कोणीही त्याला दिसलें नाहीं.

---

# प्रकरण १७ वें.

## वीरपंचमी.

दोघेंही शैलेश्वराला प्रणाम करून साशंकचित्तानें गड-मांदारणाकडे जाऊं लागलीं. थोडावेळ तीं मुकाट्यानेंच चाललीं होतीं, इतक्यांत राजकुमारानें प्रथम बोलण्यास सुरुवात केली, तो म्हणाला, 'विमले, तुला कांहीं विचारावें अशी मला फार उत्कंठा लागली आहे. पण तें ऐकून तूं मला काय म्हणशील ते सांगतां येत नाहीं.'

विमलेनें विचारिलें, 'काय ?'

जगत्सिंहानें उत्तर केलें, 'माझें मन मला निश्चयात्मक सांगतें कीं, तूं कांहीं दासी नसावीस.'

विमला थोडेंसें हंसून म्हणली, 'असा आपल्याला संदेह उत्पन्न होण्यास काय बरें कारण झालें असावें ?'

जगत्सिंह म्हणाला, 'वीरेंद्रसिंहाची कन्या अंबरपतीची सून कधींही व्हावयाची नाहीं, याला कांहीं विशेष कारण आहे. तो वृत्तांत फार गुप्त आहे. तूं दासी असतीस तर तुला तो वृत्तांत कसा कळला असता ?'

विमला दीर्घोश्वास टाकून किंचित् दुःखित स्वरानें म्हणाली, 'आपलें अनुमान खरें आहे, मी दासी नाहीं. प्रारब्धानें दासीसारखी झाल्यें आहे. बरें त्यांत नशिबाचा तरी काय अपराध ? माझें अदृष्ट कांहीं वाईट नाहीं.'

राजकुमार समजला, कीं या माझ्या विचारण्यानें विम-लेच्या मनाला दुःख झालें आहे, आणि म्हणून आपण त्या विषयीं आतां जास्त कांहींच बोलूं नये. असा विचार

करून तो स्तब्ध राहिला. पुढें विमला स्वतःच बोलूं लागली, 'युवराज! मी आपला सर्व वृत्तांत आपणांस कळवीन, मात्र अतांच नाहीं. पण हा कसला शब्द ऐकूं येतो आहे? काय! मागून कोणी येत आहे?'

आतां मात्र मागून कोणी येत असावें असा पावलांचा आवाज त्यांना स्पष्ट ऐकूं येऊं लागला, व त्यांना असेंही वाटूं लागलें कीं, कोणी दोन माणसें एकमेकांच्या कानांत कांहीं गोष्टी सांगत येत आहेत. यावेळीं तीं मंदिरापासून सुमारें अर्धकोश चालून आलीं होतीं. राजपुत्रानें विमलेला उत्तर केलें, 'मला ही तसाच भास होतो आहे. मी पाहून येतों कोण आहे तें'

असें बोलून राजपुत्र थोडासा आल्या रस्त्यानें मागें गेला व चोहोंकडे आसपास फिरून पाहूं लागला; पण त्याला कोणी आढळलें नाहीं. तेव्हां परत विमलेजवळ येऊन तो म्हणाला, 'मला असा संशय येतो कीं, आपल्या मागें कोणी लागलें आहे. याकरितां हळू बोलावें हें बरें.'

पुढें तीं हळूहळू बोलत चालूं लागलीं. थोड्याच वेळांत तीं गडमांदारण गांवांत दाखल होऊन किल्यासमोर येऊन उभीं राहिलीं; तेव्हां राजपुत्रानें विमलेला विचारिलें, 'तूं यावेळीं किल्यांत कशी जाशील? एवढ्या रात्रीं किल्याचा दरवाजा तर बंद झाला असलाच पाहिजे.'

विमला म्हणाली,' त्याची चिंता करणें नलगे. मी त्याची व्यवस्था घरांतून निघतेवेळींच करून ठेविली आहे.'

राजपुत्रानें हंसून विचारिलें,' काय! कोठें कांहीं चोरवाट आहे कीं काय?'

विमलेनें हंसून उत्तर केलें, 'जेथें चोर आहे, तेथें वाट असलीच पाहिजे.'

थोड्या वेळानें राजपुत्र पुनः म्हणाला, 'विमले, आतां पुढें मला येण्याची जरूर नाहीं. मी किल्ल्याजवळच्या या आंबराईत वाट पहात बसतों. तूं माझ्या वतीनें निष्कपटपणें आपल्या सखीला माझी विनंती कर कीं, पंधरा दिवसांनीं, महिन्यानें, एक वर्षानें कां होईना, तिला एकवेळ पाहून माझ्या नेत्रांचें सार्थक करण्यास फक्त मी इच्छितों.'

विमला म्हणाली, 'ही आंबराईदेखील कांहीं माणसां-शिवाय नाहीं. आपण माझ्याबरोबर चला.'

जगत्सिहानें विचारलें, 'कोठपर्यंत येऊं ?'

विमलेनें उत्तर केलें. 'किल्ल्यांत चला.'

राजकुमार थोडा विचार करून म्हणाला, 'असें करणें मला ठीक दिसत नाहीं. किल्ल्याच्या अधिपतीच्या परवा-नगी शिवाय मीं किल्ल्यांत येत नाहीं.'

विमलेनें विचारिलें, 'त्याला काय झालें ?'

राजकुमारानें मोठ्या गर्वानें उत्तर केलें, 'राजपुत्र हे कोठेंही जाण्यास भीत नसतात. पण तूंच विचार करून पहा कीं, अंबरपतीच्या पुत्राला किल्ल्यांतील धन्याला कळ-विल्याशिवाय चोराप्रमाणें किल्ल्यांत शिरणें हें शोभतें काय ?'

विमला:—' मी आपल्यास बोलावून नेलें, मग काय ?'

राजकुमार ह्मणाला,' मी तुला दासीप्रमाणें मानून तुझी अवज्ञा करितों, असें तूं समजूं नको किल्ल्यांत मला बोला-वून नेण्याला तुला काय अधिकार आहे, सांग पाहूं ?'

विमला जरा विचार करून बोलली, 'काय, माझा काय अधिकार आहे, तो कळल्याशिवाय तुम्हीं आंत येणारच नाहीं कां?'

राजकुमारानें उत्तर केलें, 'कदापि येणार नाहीं.' हा राजपुत्राचा जबाब ऐकून व त्याचा दृढनिश्चय पाहून विमलेनें राजपुत्राचे कानांत कांहीं सांगितलें, तेव्हां राजत्रपुत्र ह्मणाला, 'चला हा मी येतों.'

विमला ह्मणाली, 'युवराज, मी दासी आहें, मला 'चल' असें ह्मटलें पाहिजे.'

युवराज ह्मणाला, 'तसेंच कां होईना.'

ज्या मार्गानें विमला राजपुत्रास किल्ल्यांत घेऊन चालली होती, तो किल्ल्याच्या दरवाजाकडे जाण्याचा रस्ता होता. किल्ल्याजवळ आंबराई होती. किल्ल्याचे मुख्य दरवाजांतून आंबराई दिसत नसे; याच मार्गानें अमोदर नदी किल्ल्याच्या आंतून तटाला लागून वाहत होती, तिकडे जाणें झाल्यास या आंबराईतून जावें लागत असे. विमला आतां मोठा रस्ता सोडून राजपुत्रासह ह्याच आंबराईत शिरली. आंबराईत प्रवेश करितांच दोघांनीं पूर्वीप्रमाणें पुन्हां वाळलेलीं पानें पडण्याचा व मनुष्याचे चालण्यानें होत असलेला आवाज ऐकला. तेव्हां विमला ह्मणाली, 'पुन्हां हें काय?'

राजपुत्र ह्मणाला, 'तुह्मीं जरा येथें उभ्या रहा, मी पाहून येतों.'

राजपुत्र तरवार म्यानांतून काढून ज्या दिशेनें तो आवाज ऐकूं येत होता तिकडे जाऊं लागला. पण त्याला

कांहींच दिसेना. आंबराईत नानाप्रकारच्या रानटी वेली वगैरे वाढून इतकें दाट रान वाढलें होतें, आणि झाडाच्या सावलीमुळें रात्रीं त्या आंबराईत इतका दाट अंधार पडला होता कीं, राजपुत्र जेथें जाई तेथून त्यास फारसें दूरचें कांहीं दिसेना. राजपुत्राला वाटलें, रात्रीं कोणा पशूच्या चालण्यानें हीं वाळलेलीं पानें वाजलीं असतील. कांहीं असो, संशय ठेवूं नये, हेंच बरें. असें मनांत आणून राजकुमार हातांत तरवार धरून एका आंब्याच्या झाडावर चढला झाडाच्या शेंड्यावर चढून चोंहीकडे पाहूं लागला. बराच वेळ त्यानें चोंहीकडे नीट निरखून पाहिलें. तेव्हां त्याला असें दिसलें कीं, एका मोठ्या आंब्याच्या झाडाच्या अंधारांतील फांद्यांच्या बेचक्यांत कोणी दोन माणसें बसलीं आहेत; त्यांच्या फेट्यांवरच चंद्राचे किरण पडले होते व त्यामुळेंच ते फेटे मात्र दिसत होते; पण ते घालणाऱ्यांचीं शरीरें अंधारानें झांकलीं गेलीं होतीं. ते माणसांचेच फेटे आहेत यांत अगदीं शंका नाहीं, हें राजपुत्रानें नीट पाहून घेतलें; व तें झाड आपल्यास पुनः बिनचूक सांपडेल अशा रीतीनें आपल्या ध्यानांत त्यानें धरिलें; इतकें करून मग तो हळू हळू खालीं उतरला आणि पाय न वाजवितां विमले जवळ झालेला सर्व वृत्तांत सांगून म्हणाला, 'विमले, यावेळीं मला दोन भाले मिळते तर फार फार चांगलें झालें असतें.'

'आपण भाले घेऊन काय करणार?' असें विमलेनें विचारिलें.

जगत्सिंह म्हणाला, 'ते जर असते तर हे कोण आहेत हें कळलें असतें. मला हें लक्षण कांहीं बरें दिसत नाहीं.

फेंव्यावरून अनुमान होतें कीं, दुरात्म्या पठाणांनीं कांहीं दुष्ट हेतूनें आपला पाठलाग केला असावा.'

तत्काळ विमलेला त्या मरून पडलेल्या घोड्याची, पागोट्याची, आणि घोड्याच्या टापांच्या खुणांची आठवण झाली; त्यावरून ती म्हणाली, 'आपण येथें थांबा, एका क्षणार्धांत मी आंतून भाले घेऊन येत्यें.'

असें बोलून विमला धांवत धांवत किल्ल्याच्या भिंतीपाशीं गेली. ज्या महालांत बसून तिनें ते दिवशीं संध्याकाळीं पोषाख केला होता, त्याच्या खालच्या बाजूच्या खोलीची एक खिडकी आंबराईच्या अंगाला होती. विमला ह्याच खिडकीवर चढली; तिनें खिडकीच्या फळ्यांवर हात फिरविला, तेव्हां तिच्या हातास एका ठिकाणीं कांहीं वर आल्यासारखें लागलें; तत्काळ विमलेनें शेल्याच्या पदरांतून एक किल्ली काढून ती कळ फिरविली, आणि नंतर खिडकीच्या गरादांना धरून तिनें खिडकीच्या दाराला धक्का मारिला. त्याबरोबर शिल्पकौशल्याच्या योगानें खिडकीची चौकट, फळ्या, गजांसकट निसटून नाहींशीं झालीं व भिंतीला एक मोठें छिद्र पडलें, आणि त्यांतून विमलेला आंत शिरण्यास रस्ता मोकळा झाला; नंतर तिनें खोलींत जाऊन भिंतींत गेलेली चौकट धरून उचलल्याबरोबर खिडकी बाहेर निघून पुन्हां जागच्या जागीं पूर्वीप्रमाणें येऊन बसली. दाराच्या आंतून बाहेरच्या प्रमाणेंच फळ्यांना मळसूत्र होतें, त्या मळसूत्राला देखील विमलेनें शेल्याच्या पदराला असलेली किल्ली लाविली. त्याबरोबर खिडकीची

(५) दु. नं. ८६०–१४–६–१०००

दारें जेथल्या तेथें घट्ट लागलीं, आणि बाहेरून कांहीं केल्या न उघडतील इतकीं पक्कीं बसलीं.

पुढें विमला अतित्वरेनें किल्ल्याच्या हत्यारखान्यांत गेली व तेथील शिपायाला म्हणाली, ' मी तुझ्याशीं जें मागेन तें दुसऱ्या कोणाला सांगूं नको. तूं मला दोन भाले दे, ते मी तुला परत आणून देईन.'

शिपाई आश्चर्यानें म्हणाला, ' बाईसाहेब, तुह्मी भाले घेऊन काय करणार ? ' समयसूचक विमला लागलीच म्हणाली, 'आज माझें वीरपंचमीचें व्रत आहे. हें व्रत केलें म्हणजे वीरपुत्र प्राप्त होतो. म्हणून रात्रीची या हत्यारांची पूजा केली पाहिजे. मी मुलाची इच्छा करत्यें, ही गोष्ट कोणाला सांगूं नको, बरें कां ?'

तिनें त्या शिपायाची जशी समजूत घातली, तशीच त्याचीही पडली. किल्ल्यांतील सर्व माणसें विमलेचा हुकूम मानीत असत; तेव्हां दुसरें तिसरें कांहीं न बोलतां त्यानें मुकाट्यानें तिला दोन तीक्ष्ण भाले काढून दिले ते घेऊन विमला घाईघाईनें खिडकीपाशीं आली आणि पहिल्याप्रमाणें ती उघडून बाहेर जगत्सिंहाकडे यावयास निघाली.

त्या घाईंत ती विसरली असो किंवा आपण अगदीं नजीकच आहों असें तिला वाटलें असो, किंवा आपण एका क्षणार्धांत मागे परतूं अशी तिला खात्री असो, किंवा कांहीं असो, विमलेनें बाहेर जगत्सिंहाकडे जातेवेळीं पहिल्याप्रमाणें तो खिडकींतून जाण्याचा रस्ता बंद केला नव्हता, एवढें मात्र खरें. पण ह्यावेळीं तिचें हें असें करणें अत्यंत चुकीचें झालें. त्या खिडकीपाशींच एक आंब्याचें मोठें झाड होतें, त्याच्या

आड एक हत्यारबंद पुरुष उभा होता; त्यानें ही विमलेची घाईघाईनें झालेली चूक पाहिली. विमला जोंपर्यंत त्याच्या दृष्टीस पडत होती, तोंपर्यंत तो तसाच झाडाआड उभा होता. ती दृष्टीआड होतांच आवाज होण्याचे भितीनें पायांतील करकर वाजणारा जोडा झाडाखालीं काढून ठेवून तो जपून पावलें टाकीत टाकीत त्या खिडकीपाशीं आला आणि खोलींत कोणी नाहीं असें पाहून हळूच आंत शिरला व त्याच खोलीच्या दारांतून तो तसाच अंतःपुरांत पुढें गेला.

इकडे राजपुत्रानें विमलेजवळून ते भाले घेऊन तो पूर्ववत् त्याच झाडावर चढला, आणि ध्यानांत धरून ठेविलेल्या झाडाकडे पाहूं लागला तों त्यावर दोन फेटे दिसत नसून फक्त एकच दिसण्यांत येत होता; दुसरा मनुष्य तेथें नव्हता; राजपुत्रानें एक भाला डाव्या हातांत घट्ट धरून ठेवून उजव्या हातांत दुसरा भाला घेऊन तो त्या फेट्याचे रोखानें खूब जोरानें फेंकिला. तत्क्षणींच झाडाचीं पानें पहिल्यानें खडखड वाजलीं व नंतर कांहीं जड पदार्थ खालीं पडल्याचा आवाज झाला. आवाज ऐकून राजपुत्र पाहतो तों झाडावर त्यास फेटा दिसेना. तेव्हां आपला भाला व्यर्थ न जातां त्यानें आपलें काम केलें अशी त्याची पक्की खात्री झाली.

जितक्या जलदीनें त्याला झाडावरून खालीं उतरवलें तितक्या जलदीनें जगत्सिंह खालीं उतरला आणि त्या पडलेल्या माणसाजवळ जाऊन पहातो तों एक लष्करी पोषाख केलेला हत्यारबंद मुसलमान असून अगदीं मरणोन्मुख

होऊन पडला आहे, व त्याचे डोळ्यांत भाल्याचें टोंक शिरलेलें आहे.

राजपुत्रानें त्या मृतवत् देहाकडे लक्षपूर्वक पाहिलें, तों त्यांतून प्राण एकदम निघून गेला असावा असें त्यास आढळून आलें. भाला डोळ्यांतून जो शिरला होता तो थेट डोक्यांतून मस्तिष्क फोडून बाहेर पडला होता. त्या मृत मनुष्याच्या चिलखतामध्यें एक पत्र होतें तें थोडेंसें बाहेरून दिसण्यांत येत होतें. तें चांदण्यांत घेऊन जगत्सिंह वाचूं लागला, तों त्यांत पुढील मजकूर होता.

" कतलुखानाच्या सेवकांनीं हा कागद पाहतांच तो आणणाऱ्याच्या हुकमानें चालावें."

"कतलुखान."

विमलेनें फक्त तो आवाज झालेला मात्र ऐकिला होता. विशेष प्रकार काय घडून आला तो तिला अद्याप मुळींच कळला नव्हता. राजकुमारानें तिजपाशीं येऊन तिला झालेलें सर्व वृत्त कळविलें. तें ऐकून ती म्हणाली, ' युवराज! मला असें होणार हें जर कळलें असतें, तर मीं तुह्मांला भाला कधींच आणून दिला नसता. मी मोठी पापी आहे, आज मजकडून जें हें काम घडलें आहे याचें प्रायश्चित्त मला पुष्कळ दिवस भोगावें लागेल.'

युवराज म्हणाला, ' शत्रूचा वध झाला ह्याच्याबद्दल खेद करण्याचें काय कारण? शत्रूचा वध करणें हा आपला धर्मच आहे '

विमला म्हणाली, ' असा विचार करणें योद्धयांना योग्यच आहे; पण मी स्त्रीजाति आहे.'

कांहीं वेळानें विमला म्हणाली, 'राजकुमार, आतां उशीर केला तर फार नुकसान होण्याचा संभव आहे; ह्मणून किल्ल्यांत चला. मी दरवाजा उघडाच ठेवून आल्यें आहे.'

दोघेंही मोठ्या त्वरेनें किल्ल्याच्या भिंतीजवळ आलीं व पहिल्यानें विमला आणि तिच्या मागून राजपुत्र अशीं आंत शिरलीं; आंत शिरतेवेळीं राजपुत्राचें हृदय धडधडूं लागलें आणि पाय कांपूं लागले. लक्षावधि शत्रूंसमोर ज्याच्या डोक्याचा एक केस सुद्धा हलावयाचा नाहीं, त्याचें काळीज अशा ह्या सुखालयांत शिरतेवेळीं इतकें कां बरें धडधडावें ?

विमलेनें पूर्वीप्रमाणें खिडकी बंद करून घेतली आणि नंतर राजपुत्राला घेऊन ती आपल्या शय्यामंदिरांत गेली आणि म्हणाली, 'मी येत्यें तोंपर्यंत थोडा वेळ आपणास या माझ्या गरिबाच्या पलंगावर बसावें लागेल. आपल्याला जर कांहीं दुसरें विचार करण्यासारखें नसेल, आणि जर आपण विचार करून पहाल, तर आपल्या लक्षांत येईल कीं, साक्षात् भगवंताला देखील वडाच्या पानाचें आसन करावें लागलें होतें.'

विमला गेल्यावर थोड्या वेळानें त्या खोलीचें दार उघडलें आणि तेथूनच विमला राजपुत्राला म्हणाली, 'युवराज! इकडे येऊन माझी थोडी विनंति आहे तेवढी ऐका.'

हें ऐकून युवराजाचें हृदय जणूं काय तें स्पष्ट उत्तरच देतें आहे कीं काय, अशा रीतीनें पुनः धडधडां उडूं लागलें. तो पलंगावरून उठून विमला ज्या महालांत उभी होती तिकडे गेला.

तो आंत येतांच विमला तेथून विद्युल्लतेप्रमाणें चटकन् निघून गेली. युवराजानें आंत येऊन पाहिलें तों जिकडे तिकडे सुगंध सुटला आहे, चोहोंकडे चांदीचे दिवे जळत आहेत, व महालांतील एका कोपऱ्यांत एक बुरखा घेतलेली स्त्री उभी आहे—तीच आमची तिलोत्तमा !

---

# प्रकरण १८ वें.

## शेराला सव्वाशेर.

विमला तेथून निघाली ती आपल्या खोलींत येऊन पलंगावर जाऊन बसली. यावेळीं तिचें मुख हर्षानें फारच प्रफुल्लित दिसत होतें. आज तिनें आपला फार दिवसांचा मनोरथ सिद्धीस नेला होता. खोलींत दिवा जळत होता, व तिच्या पलंगासमोर एक मोठा आरसा ठेविला होता. तिनें संध्याकाळीं जो पोषाख केला होता, तोच अजून होता. विमलेनें थोडा वेळ आपलें स्वरूप आरशांत पाहिलें तों संध्याकाळीं ज्याप्रमाणें तिनें आपल्या केसांची रचना केली होती ती जशीची तशीच कायम होती. तिच्या त्या मोठाल्या डोळ्यांत काजळ जसेंचें तसेंच होतें. ओंठ विड्यानें लालचे लाल कायम होते. कानांतील लोलक तिच्या त्या गोंडस खांद्यांवर संध्याकाळच्याप्रमाणेंच लोंबत होते. विमला तक्क्याला टेंकून बसली होती तिच्या शरीराची त्यावेळची ठेवण पाहून कोण बरें अशा नवयुवतीच्या प्रेमाची इच्छा न करिता? ती आपलें लावण्य आरशांत पाहून हंसत होती. पुरुषरत्न जो जगत्सिंह त्याला स्वतः मोठ्या यत्नानें आ-

णून तिलोत्तमेचें प्रेम संपादन करावयास लाविलें, म्हणून तिला वाईट वाटून कां ती हंसत होती? नाहीं; त्याबद्दल विमलेला इतकें देखील वाईट वाटलें नाहीं; पण उलटें तिला अपरिमित सुख होत होतें. दिग्गजपंडित घर सोडून आपल्याबरोबर इतक्या रात्रीं येण्यास कबूल झाला तो केवळ निष्कारण नव्हे, हें तिच्या मनांत येऊन ती आपल्या मनाशीं हंसत होती.

जगत्सिंह पुनः परत येण्याची विमला वाट पहात होती, इतक्यांत आंबराईत कोणी एक रणशिंग फुंकल्याचा गंभीर आवाज झाला. त्यासरशीं ती दचकून उठली व भयाभीत होऊन गेली किल्ल्याच्या मोठ्या दरवाजाशिवाय आंबराईत वगैरे दुसऱ्या कोणत्याही ठिकाणीं रणशिंग कधींही वाजविण्यांत येत नसे एवढ्या रात्रीं शिंग वाजण्याचें काय बरें कारण असावें? ते वेळीं, विशेषेंकरून मंदिरांत जातेवेळीं व येतेवेळीं, तिनें जें जें पाहिलें होतें, तें तिच्या दृष्टीसमोर उभें राहिलें. त्यावरून तिच्या मनाचा पक्का धडा होऊन गेला कीं, हें रणसिंग वाजण्याचें लक्षण कांहीं बरें नाहीं; आणि म्हणूनच भयभीत अंःतकरणानें ती त्या खिडकीपाशीं जाऊन आंबराईकडे पाहूं लागली. आंबराईत तिला विशेष कांहींच दिसेना. तेव्हां घाबरून आपली खोली सोडून ती बाहेर पडली ज्या रांगेंत तिची खोली होती, तिच्यापलीकडे एक मोठा चौक होता; त्याच्या पलीकडे खोल्यांची दुसरी एक रांग होती, व त्या रांगेंत महालावर चढण्यास जिना होता. विमला खोली सोडल्यावर ह्याच जिन्यावरून गच्चीवर चढली आणि तेथून

चोहोंबाजूंस पाहूं लागली. तथापि आंबराईंत गाढ अंधःकार असल्यामुळें तेथें तिला कांहीं दिसेना. तेव्हां तर ती दुप्पट घाबरून गच्चीच्या कठड्यापाशीं गेली आणि त्यावर टेंकून खालीं ओणवून तिनें तटाच्या भिंतीच्या पायापर्यंत नजर पोंचविली, तरीही तिला कांहीं दिसेना. चोहोंकडे झाडांवर, फांद्यांवर व पानांवर स्वच्छ चांदणें पडलें होतें; मधून मधून वाऱ्याच्या झुळकेसरसा त्यांचा हलण्यानें रंग पिंगट दिसत होता. आंबराईंत अतिशय काळोख पडला होता. कोठें कोठें फांद्या व पानें यांच्या मधून मात्र चांदणें पडलें होतें. आगोदर नदीच्या शांत प्रवाहांत निळ्याभोर आकाशांतील चंद्राचें नक्षत्रांसह प्रतिबिंब पडलें होतें. तेथून दूर असलेल्या नदीच्या पलीकडच्या मोठमोठाल्या हवेल्या जणूं त्या आकाशालाच जाऊन भिडल्या आहेत कीं काय अशा दिसत होत्या, व कांहीं वाड्यांच्या बुरुंजांवरील पहारेकरी चांदण्यामुळें स्पष्ट दिसत होते. याशिवाय विमलेला दुसरें कांहीं दिसलें नाहीं; त्यामुळें खिन्न होऊन ती मागें वळणार, तोंच अकस्मात् मागून कोणाच्या बोटांचा स्पर्श झाल्याचा तिला भास झाला. तेव्हां ती चकित होऊन मागें वळून पाहूं लागली तों एक अनोळखी हत्यारबंद पुरुष उभा राहिलेला तिच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून विमला चित्रांतील पुतळीप्रमाणें स्तब्ध उभी राहिली.

तो हत्यारबंद पुरुष म्हणाला,' ओरडूं नको; ओरडलीस तर तुझें हें कोमल शरीर गच्चीखालीं फेंकून देण्यास मी संकोच करणार नाहीं.'

ज्या पुरुषानें अकस्मात् तेथें येऊन विमलेला अशा री-

तीनें घाबरून सोडिलें होतें, त्याचा पोषाक एखाद्या ल्ढवय्या-पठाणाप्रमाणें होता. त्याचा तऱ्हेवार तसाच मौल्यवान् पोषाख पाहून हा कोणी मोठा हुद्देदार असावा असें सहज मनांत येत असे. त्याचें वय तीस वर्षांहून जास्ती नव्हतें; त्याचे अंगावर तेज अतिशय होतें; त्याच्या भव्य कपाळावर जो फेटा बांधलेला होता, त्यांत एक बहुमोल हिरा चमकून राहिला होता. यावेळीं विमलेचें मन जर स्थिर असतें, तर तिलाही खचित वाटलें असतें कीं, प्रत्यक्ष जगत्सिंहाशीं जरी या पुरुषाची तुलना केली असती तरी, तो त्याच्या तोडीस उतरल्याखेरीज राहिला नसता. जगत्सिंहाप्रमाणें त्याची छाती विशाल नव्हती, पण त्याच्यावर देखील जगत्सिंहाप्रमाणें वीरपणाची कांति होती. त्याच्यापेक्षां याचें शरीर जास्त सुकुमार होतें. त्याच्या बहुमोल कमरपट्ट्यांत पोवळीं जडलेले म्यानांत डमास्कस येथें बनविलेली एक कट्यार असून हातांत नागवी तरवार होती; त्याच्यापाशीं हत्यारें काय तीं एवढींच होतीं.

तो पठाण म्हणाला, 'ओरडूं नको; ओरडल्याबरोबर खालीं ढकलून देईन.'

समयसूचक आणि बुद्धिवान् अशी ही आमची विमला हें सर्व पाहून व ऐकून घाबरली होती खरी; पण तें फार थोडा वेळ. त्या पठाणाच्या तोंडून निघालेल्या या दोन्ही वाक्यांवरून त्याचा अभिप्राय तिनें सहज ताडिला. मागें वळावें तर गच्चीच संपल्यामुळें तिला तसें करितां येईना व पुढें पहावें तों हा पठाण शिपाई, अशा स्थितींत हा आपलें म्हणणें, आपण ओरडल्यास खरें करण्यास अगदीं चुकणार

नाहीं हें तिनें, ती बुद्धिवान् असल्यामुळें सहज जाणून हळू हळू बोलण्यास तिनें सुरवात केली ती म्हणाली; 'आपण कोणी आहां?'

पठाण म्हणाला, 'माझ्या ओळखीशीं तुम्हांला काय करावयाचें आहे?'

विमला म्हणाली, 'पण तुम्हीं ह्या किल्ल्यांत कसें आलांत?'

पठाण म्हणाला, 'तुमच्याच कृपेनें. तुम्ही जेव्हां खिडकी उघडी टाकिली होती, तेव्हांच मी आंत शिरलों होतों आणि हा तुमच्या पाठोपाठच गच्चीवर आलों.'

विमला म्हणाली, 'तुम्ही ह्या किल्ल्यांत काय म्हणून आलांत? चोराला सुळावर देतात, तुम्ही नाहीं कां त्या वर्गांत येणार?' पठाण म्हणाला 'सुंदरी! मी चोर नव्हे.'

विमलेनें कपाळावर हात मारिला. आणि पुनः विचारिलें, 'तर मग आपण कोण आहां?'

पठाण म्हणाला, 'आता मी तुम्हांला माझी ओळख दिली तर माझें काय नुकसान होणार आहे? मी पठाण आहे.'

विमला म्हणाली, 'हिला ओळख कां म्हणतात? आपण जातीनें पठाण आहांत हें मला कळलें. पण आपलें नांव काय?'

पठाण म्हणाला, 'ईश्वरेच्छेनें या दीनाला उसमानखान असें म्हणतात'

विमला म्हणाली, 'उसमानखान म्हणजे कोण हें मला माहीत नाहीं.'

पठाण म्हणाला, ‘उसमानखान म्हणजे कतलूखानाचा सेनापति.’

हें ऐकतांच विमलेच्या सर्वांगाला कांप सुटला. कांहीं तरी उपायानें याच्या हातून निसटून जाऊन हें वर्तमान वीरेंद्रसिंहास कळवावें असें तिला वाटूं लागलें. पण तसें करण्यास तिला कांहींच उपाय सुचेना; कारण समोर प्रत्यक्ष शत्रूंचा सेनापति रस्ता धरून उभा होता. तेव्हां अनन्यगति होऊन तिनें विचार केला कीं, आपण याच्याशीं असेंच बोलत राहावें, म्हणजे तितका वेळ जाऊन तितक्यांत किल्ल्यांतील कोणी पहारेकरी दिसल्यास पहावें, आणि इतक्याचकरितां तिनें पुनः बोलण्यास सुरवात केली. ती म्हणाली; ‘आपण कशाकरितां एवढ्या रात्रीं या किल्ल्यांत आला आहांत?’

उसमानखानानें उत्तर केलें,‘ मी वीरेंद्राकडे नम्रतापूर्वक तह करण्याकरितां एक दूत धाडिला होता. त्याला त्यानें उत्तर दिलें कीं, तुम्हांत सामर्थ्य असेल तर तुम्ही खुशाल किल्ल्यावर लष्कर पाठवावें, म्हणून.’

विमला म्हणाली, ‘तर मग काय, दुर्गाधिपति तुम्हाबरोबर मैत्री न करितां मोंगलाच्या तर्फेचा झाला आहे, म्हणून हा किल्ला स्वाधीन करून घेण्याकरितां आपण आलांत असें म्हणतां? मग आपण एकटेच आलांत, हें कसें?’

उसमानखान म्हणाला,‘ आतां मी एकटाच आहे.’

विमला म्हणाली, ‘ तेव्हांच आपण मला भितां आणि म्हणूनच मला जाऊं देत नाहीं कीं नाहीं?’

असा भीतीचा आळ घेतला असतां सेनापति कदाचित्

रागावून आपणास सोडून देईल या आशेनेंच विमला असें त्याला म्हणाली.

हें ऐकून उसमानखान थोडेसें हंसून म्हणाला, ‘ सुंदरी ! तुम्हांसारख्यापुढें तुमच्या केवळ कटाक्षांचीच भीति धरली पाहिजे. पण मला त्यांचीही फारशी भीति वाटत नाहीं. पण तुमच्याजवळ मला एक मागणें मागावयाचें आहे. ’

विमला हें ऐकून आश्चर्यानें उसमानखानच्या तोंडाकडे पाहूं लागली. तेव्हां उसमानखान म्हणाला, ‘ तुमच्या त्या शेल्याच्या शेवटास त्या खिडकीची किल्ली आहे तेवढी देण्याची माझेवर मेहेरबानी करा, कारण तुमच्या अंगाला स्पर्श करून तुमचा अपमान करण्याचा मला फार संकोच वाटतो. ’

विमला थोडेसें हंसून म्हणाली, ‘ अंगस्पर्श तर दूर राहो, पण मला तर आतांच आपण खालीं टाकून देण्याच्या तयारींत होतां ! ’

सेनापती म्हणाला, ‘ कारण पडलें म्हणजे सगळें करावें लागतें; आणि अजूनही तसा प्रसंग आल्यास मी करण्यास मागेंपुढें पहाणार नाहीं. ’

विमलेसारख्या चतुर स्त्रीला, त्याला त्या खिडकीच्या किल्लीची आपला हेतु सिद्धीस नेण्यासाठीं किती जरूर आहे, हें कळण्यास फार वेळ लागला नाहीं; पण त्याजबरोबर हेंही तिच्या लक्षांत आलें कीं, ही न देऊन सुटका नाहीं. आपल्याजवळ तो जो ती एवढ्या विनयानें मागतो आहे हें नुस्तें सोंग आहे, कारण त्याला ती मजजवळून मी खुषीनें न दिल्यास बळजबरीनें सहज घेतां येईल. दुसरी

दुसरी जर स्त्री असती तर तिनें ती किल्ली फेकूनच दिली असती; पण आमची चतुर विमला म्हणाली, 'मीं जर खुषीनें आपणास ही किल्ली दिली नाहीं, तर ती आपण मजपासून कशी घ्याल?'

असें बोलतां बोलतां विमलेनें आपल्या अंगावरचा शेला काढून हातीं घेतला. उसमानाचा डोळा ती काय करते आहे याजवरच होता. त्यानें उत्तर दिलें, 'इच्छापूर्वक न दिल्यास मी तुमच्या शरीराचें स्पर्शसुख मिळवीन.'

'मिळवा तर मग' असें म्हणून विमलेनें हातांतील शेला खालीं आंवराईत फेकून दिला. उसमानाची दृष्टि त्याच्यावरच होती. तिनें तो फेकतांच हात लांब करून तो वरच्यावरच उसमानानें झेलून घेतला; विमलेला उसमानाचें हें चातुर्य पाहून आश्चर्य वाटलें.

शेला झेलून घेतल्यावर उसमानानें एका हातानें विमलेचा हात गच्च धरून दांतांनीं शेला तोंडांत धरला, व दुसऱ्या हातानें शेल्याची ती गांठ सोडवून त्यांतील किल्ली काढून घेतली, आणि ती कमरेला खोंचून ठेविली; पण तो पुढें जें जें कांहीं करूं लागला, त्यामुळें विमलेचें तोंड अगदीं फिकें पडून गेलें. त्या शेल्यानें त्यानें तिचे हात गच्चीच्या कठड्याला घट्ट बांधून टाकिले; तेव्हां विमला म्हणाली, 'हें काय?'

उसमानखानानें उत्तर दिलें, 'हें युद्धाचें फळ.'

विमला म्हणाली, 'या दुष्कर्माचें फळ तुम्हांस थोडक्याच दिवसांत मिळेल बरें!'

उसमान विमलेला अशा अवस्थेंत टाकून चालत झाला. कांहीं थोडासा दूर गेल्यावर तो परत आला

म्हणाला, 'बायकांच्या जिभेचा विश्वास नाहीं.' असें म्हणून त्यानें तिचें तोंडही बांधून टाकिलें.

उसमानखान पूर्वीच्याच रस्त्यानें खालीं उतरून विमलेच्या महालाच्या खालच्या खोलींत गेला. तेथें विमलेप्रमाणेंच किल्ली लावून त्यानें ती खिडकी भिंतींत ढकलिली, आणि ह्या रीतीनें रस्ता मोकळा केल्यावर तो हळू हळू शीळ घालूं लागला. ती ऐकल्याबरोबर तेथें आंबराइंतून एक जोड्याशिवाय शिपाई खिडकीजवळ आला व किल्ल्यांत शिरला; त्याच्या मागून दुसरा आंत शिरला; तिसरा आंत शिरला; असें तें पठाणांचें पुष्कळसें सैन्य कांहीं गडबड न करितां किल्ल्यांत शिरलें. शेवटीं जो शिपाई आला त्याला उसमानानें सांगितलें, 'आतां नाहीं, तुम्हीं सर्व बाहेरच रहा, आणि सूचनेची खूण होतांच बाहेरून किल्ल्याला वेढा द्या, आणि तूं ही सर्व हकीकत ताजखानाला जाऊन सांग.'

तो मनुष्य परत गेला. उसमान किल्ल्यांत आलेलें लष्कर घेऊन हळू हळू पाय न वाजवितां राजवाड्यावर चढला. ज्या गच्चीवर विमलेला बांधून ठेविलें होतें तेथून जातांना तो एका शिपायास म्हणाला, 'रहीमशेख, ही स्त्री मोठी बुद्धीवान् आहे. हिचा कांहीं विश्वास नाहीं. तूं स्वतः इजपाशीं पहारा कर. तिचें तोंड मोकळें कर, पण जर ती पळून जाऊं लागेल अथवा कोणाशीं बोलण्याचा यत्न करील किंवा मोठ्यानें बोलेल तर स्त्रीवध करण्यास मागें पुढें पाहूं नको.

'जशी आज्ञा,' असें म्हणून रहीम तेथें पहारा करूं लागला. नंतर पठाणांचें लष्कर ह्या गच्चीवरून त्या गच्चीवर याप्रमाणें त्या किल्ल्याच्या दुसऱ्या भागांत शिरलें.

---

# प्रकरण १९ वें.

## आशक माशूक.

चतुर उसमान बाजूला दूर गेला असें पाहून विमलेला थोडीशी हिंमत आली, व आतां युक्तीनें आपण सुटूं अशी तिला आशाही वाटूं लागली, आणि तें कसें करावें ह्याबद्दल ती जलदीनें कांहीं उपाय शोधूं लागली.

पहारा करणारा शिपाई येऊन थोडा वेळ उभा राहिल्यावर विमलेनें त्याच्याशीं बोलवण्याची सुरुवात केली. शिपाई असो कीं प्रत्यक्ष यमदूत असो, एखाद्या सुंदर स्त्रीशीं कोण बरें बोलण्यास इच्छिणार नाहीं? नाहीं, असें कधींच घडणार नाहीं. विमला पहिल्यानें त्याच्याशीं इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलूं लागली. नंतर तिनें हळू हळू त्या शिपायास त्याचें नांवगांव, कामकाज, घरदार इत्यादि गोष्टीं-संबंधींही माहिती विचारण्यास सुरुवात केली. पहारेकरी आपल्यासंबधीं विमला इतक्या उत्सुकतेनें विचारपूस करीत आहे असें पाहून फार खुष झाला. विमला, ही संधी बरी आहे असें पाहून, मोठ्या युक्तीनें आपलें एक एक शस्त्र हळू हळू बाहेर काढूं लागली. तिचें प्रथम रसानें पूर्ण भरलेलें, व अमृतासारखें अत्यंत मोहक, असें बोलणें एकसारखें चालूच होतें, व त्यांत मधून मधून ती आपल्या विशाल नेत्रांतून त्याच्यावर आपले कटाक्ष फेंकीतच होती. ह्या अशा दुहेरी माऱ्यापुढें आमच्या पहारेकरी बुवांची गाळण उडून गेली. विमलेनें त्याची ती त्रेधा उडलेली पाहून हा आतां आपला पुरा दास बनून राहिला आहे, असें जेव्हां पा-

हिलें, तेव्हां ती अगदीं मृदु स्वरानें त्याला म्हणाली, 'मला एवढें कशाला म्यावयास पाहिजे, शेखजी, तुह्मी माझ्या शजारीं नाहीं कां येऊन बसत?'

पहारेकरी तर वेडावलाच होता, तो हें ऐकून तिच्या जवळ येऊन बसला. थोडा वेळ बोलणें झाल्यावर विमलेनें पाहिलें कीं, आतां आपलें औषध तर लागू पडलें आहे व पहारेकरी आपल्या सांगण्याप्रमाणे जवळ बसला असून त्यानें आपल्याकडे एकसारखी टकहि लाविली आहे, तेव्हां ती म्हणाली, 'शेखजी, तुम्हांला फार घाम आला आहे, माझे एवढे हात सोडिले असतेत तर मी तुम्हांला वारा घातला असता म्हणत्यें, मग तुम्हीं हवे तर माझे हात फिरून बांधा.'

शेखजींच्या कपाळावर एकही घामाचा बिंदु नव्हता, पण तो पाहिल्याशिवाय कां ही विमला असें बोलली असेल? तशांत या असल्या गोंडस हातांचा वारा मिळणें नाशिबीं कोणाच्या आहे? असा विचार करून पहारेकऱ्यानें तत्क्षणींच तिचे हात मोकळे केले.

विमलेनें थोडा वेळ आपल्या शेल्याच्या पदरानें शेखसाहेबांना वारा घातला, व मग तो हळू हळू ती पूर्वी प्रमाणें पांघरली. तिला फिरून बांधण्याविषयीं शेखजींनीं नांवदेखील काढिलें नाहीं. पण त्याला एक विशेष कारण झालें होतें; शेल्यानें दोरीचें काम करण्याचें सोडून देऊन जेव्हां विमलेच्या अंगाचा आश्रय केला, तेव्हां तिचें लावण्य जास्तच खुलूं लागलें. हेंच लावण्य आरशांत पाहून विमला आपल्या आपल्याशींच हंसत होती, व तेंच लावण्य पाहून हा आमचा पहारेकरी मुग्ध होऊन गेला.

विमलेनें विचारिलें, ‘ शेख साहेब, तुमची स्त्री तुम्हांला आवडत नाहीं काय? ’

शेखजींनां थोडें आश्चर्य वाटून ते म्हणाले, ‘ कशावरून ?

विमला म्हणाली, ‘जर आवडत असती तर या वसंत कालांत ( त्यावेळीं ग्रीष्म संपून वर्षाकाळाला देखील आरंभ झाला होता ) आपल्यासारख्या स्वामीला सोडून तिला राहण्याचा जीव तरी कसा झाला असता? ’

हें ऐकून शेखजींनीं एक मोठा सुस्कारा सोडिला !

विमलेच्या भात्यांतून बाणावर बाण सुटूं लागले.

‘ शेखसाहेब, बोलायला बाई लाज वाटते, पण खरेंच तुम्हीं जर माझे स्वामी असतां, तर मी तुम्हांला लढाईवर कधींच जाऊं दिलें नसतें. ’ असें विमला म्हणाली.

पाहरेकऱ्यानें आणखी एक सुस्कारा सोडिला, तेव्हां विमला, म्हणाली ‘ अहाहा ! तुम्ही जर माझे स्वामी असतां तर ! ’

असें बोलून विमलेनेंही एक लहानसा सुस्कारा टाकिला आणि त्याबरोबरच आपल्या तीक्ष्ण कुटिल कटाक्षांचा वर्षाव त्याजवर केला. तेव्हां पाहरेकऱ्याचें डोकें फिरून गेलें. तो वेडा झाला व हळू हळू पुढें सरत सरत विमलेच्या अगदीं जवळू येऊन बसला; तशी विमलाही थोडीशी त्याच्याकडे सरकली.

विमलेनें आपला नाजुक हात पहारेकऱ्याचा हातावर ठेविला, त्याबरोबर तो वेडा होऊन उठून उभा राहिला.

विमला बोलूं लागली, ‘ विचारावयास मला बाई लाज

वाटते, पण तुम्हीं जेव्हां लढाईस जाल तेव्हां आपल्याला माझें स्मरण होईल काय?'

पहारेकरी म्हणाला, 'काय, तुमची आठवण रहणार नाहीं म्हणतां?'

विमला ह्मणाली, 'मला तुम्हांला माझ्या मनांतली कांहीं गोष्ट सांगावयाची आहे, पण ती सांगू कां?'

पहारेकरी म्हणाला, 'सांगा, अवश्य–सांगाच.'

विमला ह्मणाली 'नाहीं, मी नाहीं सांगत! तुम्ही काय म्हणाल?'

पहारेकरी म्हणाला, 'हे काय मनांत आणितां? सांगाच, मला तुम्ही आपला दास आहे असें समजा.'

विमला म्हणाली, 'माझ्या मनांत फार आहे कीं, या मेल्या माझ्या हल्लींच्या नवऱ्याला सोडून आपल्या बरोबर यावें.' असें बोलून तिनें पुनः आपला एक कटाक्ष त्याला मारिला, तेव्हां तर तो अनंदानें नाचूच लागला.

त्यानें विचारिलें, 'काय? तुम्ही मजबरोबर यावयाचें म्हणतां?'

दिग्गजाप्रमाणें पंडित पुष्कळ असतात!

विमला म्हणाली, 'तुम्ही घेऊन जाल तर येईन.'

पहारेकरी म्हणाला, 'काय, तुम्हाला घेऊन जाणार नाहीं! तुमचा केवळ दास होऊन राहीन!'

'ह्या आपल्या अशा प्रेमाबद्दल मी आपल्याला काय देऊं; हें देत्यें एवढें तर घ्या.' असें म्हणून विमलेनें आपल्या गळ्यांतून चंद्रहार काढून त्याच्या गळ्यांत घातला, त्याबरोबर पहारेकऱ्याला आपण स्वर्गांत आहों कीं काय, असें वाटूं

लागलें; तेव्हा विमला बोलूं लागली, 'आमच्या शास्त्रांत सांगितलें आहे कीं, एकानें आपले गळ्यांतील माळ दुसऱ्याच्या गळ्यांत घातली, म्हणजे त्या उभयतांचें लग्न झालें असें समजावें.'

हंसतां हंसतां पहारेकऱ्याचें दांताड बाहेर दिसूं लागलें. तो म्हणाला, 'असें आहे तर मग तुम्हांबरोबर आमची शादी झाली म्हणावयाची ?'

'झालीच आणखी काय ?' असें बोलून विमला कांहीं वेळ स्तब्ध विचारांत निमग्न होऊन राहिली. तें पाहून पहारेकऱ्यानें तिला विचारिलें, 'तुम्ही कसला विचार करितां ?'

विमलेनें उत्तर केलें, 'मी विचार करत्यें आहे कीं, मेलें माझ्या नशिबीं सुख म्हणून कसें तें नाहींच. तुम्हांला आज या किल्ल्यांत जय मिळेल असें मला वाटत नाहीं.'

पहारेकरी अभिमानानें बोलला, 'त्याच्याबद्दल तर संशयच नको. आतां जय मिळवूं पहा !'

विमला म्हणाली, 'नांव नका काढूं! पण एक गुपित गोष्ट आहे, ती केली तर.' पहारेकऱ्यानें विचारिलें, 'ती कोणती ?'

विमला म्हणाली, 'मी ती तुम्हांला सांगून देत्यें, म्हणजे तुम्ही अगदीं अचूक जय मिळवाल.'

पहारेकरी 'हूं' म्हणून ऐकूं लागला. पण विमला तें सांगण्यास संकोच करूं लागली, असें पाहून तो मोठ्या आतुरतेनें म्हणाला, 'सांगा सांगा, ती काय आहे ती.'

विमला म्हणाली, 'तुम्हांला ठाऊक नाहीं कां, की या किल्ल्यानजीक जगत्सिंह दहा हजार लष्कर घेऊन दबा

धरून राहिला आहे तो? तुम्ही आज गुप्त रीतीनें येथें येणार असल्याचें जाणूनच तो प्रथम येऊन बसला आहे. तो आतांच कांहीं हालचाल करणार नाहीं, पण तुम्ही हा किल्ला जिंकून जेव्हां निश्चिंत व्हाल, तेव्हांच तो बाहेरून येऊन तुम्हाला घेरा घालील.'

पहारेकरी मुकाट्यानें तसाच विचार करीत कांहीं वेळ बसला, मग म्हणाला, 'पण हें खरें कशावरून?'

विमला म्हणाली, 'ही गोष्ट किल्ल्यांतील सर्व लोकांना माहित आहे. मींही पण असेंच ऐकिलें आहे.'

पहारेकरी आनंदांत निमग्न होऊन म्हणाला, 'ओहो! माझ्या प्राणा! आज तूं मला सरदार बनविलेंस. मी आतांच्या आतां सेनापतीकडे जाऊन त्याला ही खबर देऊन येतों. असली महत्वाची खबर दिली असतां शिरपाव तर मिळणारच. तुम्ही या ठिकाणींच बसून रहा मी आतां जाऊन येतों.'

पहारेकऱ्याचे मनांत विमलेविषयीं तिळभर सुद्धां संदेह आला नाहीं. विमलेनें विचारिलें, 'तुम्हीं परत याल ना?' पहारेकरी म्हणाला, 'येईन म्हणजे? हा पहा याच पावलीं येतों.'

विमलेनें विचारिलें, 'तुम्हीं मला विसरून तर नाहींना जाणार?'

पहारेकरी म्हणाला, 'नाहीं, नाहीं. अगदीं खचीत नाहीं'

विमला म्हणाली, 'पहा बरें! माझी शपथ आहे तुम्हांला.'

'अशी काळजी कां करितां?' असें बोलून पहारेकरी झांपा टाकीतच धांवत गेला!

पहारेकरी दिसेनासा झाला असें पाहून विमलाही उठून पळून गेली. 'तुमच्यापेक्षां तुमच्या नेत्रकटाक्षांनाच भ्यालें पाहिजे.' असें जें उसमान विमलेला म्हणाला होता तें अखेरीस खरें झालें.

---

# प्रकरण २० वें

---

## खोलींतून खोलींत.

मोकळें झाल्यावर विमलेचें पहिलें काम, वीरेंद्रसिंहास ती शत्रूची बातमी देण्याचें होतें, म्हणून ती धांवत त्याच पायीं त्याच्या निजण्याचे खोलीकडे गेली.

ती अर्धाअधिक रस्ता गेली नाहीं, तोंच 'अल्ला-ल्ला-हो' असा पठाण लष्कराचा आवाज तिच्या कानीं पडला. 'काय, हा पठाणसेनेचा जयध्वनि कां!' असें बोलून विमला अत्यंत खिन्न होऊन गेली. हळू हळू फारच मोठी गडबड तिच्या कानीं येऊं लागली. तेव्हां किल्ल्यांतील माणसें जागीं झालीं असावीं असें तिनें ताडिलें.

ती अगदीं घाबरून तशीच वीरेंद्रसिंहाच्या शय्यामंदिराकडे गेली, तों तेथें एकच गर्दी उडून राहिली आहे असें तिनें पाहिलें. शत्रु त्याच्या निजण्याचे खोलीचा दरवाजा मोडून पाडून आंत घुसले होते. विमला दुरून डोकावून पाहूं लागली, तों आंत वीरेंद्राला मजबूत बांधून टाकिलें आहे, त्याच्या हातांत नागवी तरवार आहे, सर्वांगांतून रक्ताचे पाट चालले आहेत, अशा स्थितींत देखील युद्धावेशानें वेडा होऊन तो तरवार गरगर फिरवितच आहे; पण

त्याचा तो युद्धोद्योग निष्फळ झाला. कारण तेवढ्यांत एका महा बलाढ्य पठाणाच्या लांबलचक तरवारीच्या हातानें वीरेंद्राच्या हातची तरवार जी उडाली ती लांब जाऊन पडली. वीरेंद्र आतां मात्र खरा बंदिवान झाला.

तो विलक्षण प्रकार पाहून विमला अगदीं निराश झाली, आणि तशीच तेथून निसटली. तिलोत्तमेचें तरी या वेळेस रक्षण केलें पाहिजे असें म्हणून ती तिकडे धांवली. रस्त्यांत पाहते तों पुनः तिलोत्तमेच्या महालांत जाणें मोठ्या मुशकिलीचें होऊन राहिलें आहे असें तिला दिसून आलें. कारण जिकडे तिकडे पठाण सेनेनें सर्व जागा व्यापून टाकिली होती, आणि यावरूनच पठाणांनीं किल्ला हस्तगत करून घेतल्याविषयींचा तिला संशयच उरला नव्हता.

तिलोत्तमेच्या महालाकडे गेल्यें तर शत्रूंच्या हातांत पडावें लागेल हें पाहून विमला परत फिरली. ती घाबरून जाऊन तिलोत्तमेला आणि जगत्सिंहाला हें भावी अरिष्ट कसें कळवावें ह्या विचारांत पडली. विमला एका खोलींत जाऊन उभी राहूनच विचार करीत होती. इतक्यांत पठाणाचे लोक जवळची दुसरी एक खोली लुटून आपल्या खोलीकडे येत आहेत, असें पाहून अतिशय घाबरून जाऊन तेथें असलेल्या एका पेटीआड ती लपून उभी राहिली. एका क्षणार्धांत शिपाई लोक आंत शिरून तेथील सर्व चीजवस्त लुटूं लागले.

विमलेला आतां अगदीं खास दिसून आलें कीं, आतां आपली सुटका होणें कठीण. हे लुटारू आतां आपल्या पेटीशीं ती उघडण्यास आले म्हणजे आपल्याला अगदीं खाचित

पकडतील असें तिला वाटलें. तरी धैर्य धरून ती तशीच उभी राहिली, आणि तिकडे शिपाई काय करितात तें बारकाईनें पाहूं लागली. ती मोठी धैर्यवान् होती. संकटसमयीं धैर्य वाढतें यांत कांहीं संशय नाहीं. हे आपल्या चोरीच्या कामांत गर्क होऊन गेले आहेत असें तिनें पाहिलें, आणि आपण येथून आतां निसटावें, ह्मणून ती पावलें न वाजवितां हळूच त्या पेटीआडून बाहेर निघाली; ते सर्व शिपाई आपआपलेपरी लुट गोळा करण्यांत अगदीं चूर होते, त्यांचें लक्ष्य तिजकडे गेलें नाहीं. विमला खोलीबाहेर निसटली-इतक्यांत मागून कोणी शिपायानें येऊन तिचा हात धरला. विमला मागें वळून पहाते तों तो शेख रहीम! तो ह्मणाला, ‘ पळाली नाहींस ? आतां कोठें पळशील ? ’

आपण पुन्हां रहिमच्या हातीं सांपडलों आहों असें पाहून विमलेचा चेहरा खरकन उतरून गेला; पण असा चेहरा तिचा क्षणभरच होता. ती जबरदस्त बुद्धिवान् असल्यामुळें त्यावेळींसुद्धां तिनें आपलें मुख पूर्ववत् प्रफुल्लित केलें. ती मनांत ह्मणूं लागली कीं, ‘यावेळीं आपली सुटका होणें शक्य असेल तर ती याच्याच द्वारें करून घेतां येईल.’ त्याच्या त्या दरडावणीला न भीतां ती नेत्र कटाक्ष मारीत ह्मणाली—‘हळू बोला, आणि गुपचुप बाहेर चला एकदांचे.’

असें बोलून तिनें चटकन आपण होऊन त्या रहीम शेखजचा हात धरून त्याला बाहेर आणिलें तोही इच्छापूर्वक बाहेर पडला. विमला त्याला एकांतीं नेऊन ह्मणाली, ‘ तुमचें हें असलें काम ? मला सोडून आपण कोठें गेलां होतां ? मी तुह्मांला पाहिलें नाहीं, अशी एकही जागा

नाहीं.' इतक्यांत विमलेनें त्या शेखजींवर पूर्वीप्रमाणें एक कटाक्षप्रहार केला.

आतां मात्र शेखजींचा राग गेला. तो ह्मणूं लागला, 'मी सेनापतींना जगत्सिंहाची बातमी द्यावी ह्मणून त्यास शोधीत होतों, पण कोठें भेट होईना. पुढें गच्चीवर येऊन पाहतों तों तूंही तेथें नाहींस, म्हणून मग तुझ्या तपासाला लागलों, पण एवढा वेळ तूं कोठें भेटेनास.'

विमला म्हणाली, 'वाट पाहतां पाहतां तुम्ही परत येत नाहीं, असें पाहून म्हटलें, तुह्मी मला विसरलांत ! आणि म्हणून मीही तुमच्या तपासास निघाल्यें. असो; आतां वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. तुह्मीं किल्ला तर सर केलाच अहांत तेव्हां म्हणत्यें, याचवेळीं आपण येथून पळून जाण्याचा उद्योग करावा हें ठीक.'

रहिम म्हणाला, 'आज तर नाहीं, उद्यां सकाळीं. मी नाहीं म्हटलें तर तूं जाणार कशी? मी उद्यां सकाळीं सेनापती साहेबांपासून रजा घेईन, आणि मग आपण जाऊं.'

विमला म्हणाली, 'चला तर मग याच वेळीं, माझे चार दागिने आहेत ते आपल्या ताब्यांत घेऊं; नाहीं तर कोणी शिपाई येऊन ते लुटून घेऊन जाईल.'

शिपाई म्हणाला, 'चला' रहिमजीला बरोबर घेण्याचा तिचा हेतु इतकाच होता कीं, असें केल्यानें इतर शिपायांच्या हातून आपला निभाव लागेल. हें जें तिनें शहाणपणाचें कृत्य केलें त्याचा तिला लागलाच अनुभव आला. तीं दोघें कांहीं पावलें गेलीं नाहींत तोंच तिकडून कांहीं

शिपायांची झुंड समोर आली; विमलेला पाहतांच 'अरे, शिकार रे शिकार!' असें ते मोठ्यानें ओरडून ह्मणाले.

रहीम ह्मणाला, 'भाई! तुमचें तुह्मी काम करा, इकडे नका पाहूं.'

त्याच्या बोलण्याचा अर्थ समजून सर्व शिपाई शांत झाले. त्यांतील एकजण ह्मणाला, 'कां रहीम! आज लाट आहेना? नशिबवान तर खरा तूं. पण आतां नबाबसाहेब तुझा तोंडचा घांस काढून न घेवोत ह्मणजे मिळविली.'

रहीम आणि विमला निघून गेलीं. विमला रहिमास आपल्या निजण्याच्या खालच्या खोलींत नेऊन ह्मणाली, 'ही माझी स्वतःची खोली आहे. येथून जें कांहीं घ्यावेसें वाटेल तें एकत्र करून घ्या. येथेंच वरच्या माडीवर माझी निजण्याची खोली आहे, तिथें जाऊन मी जलदीनें आपले दागिने वगैरे घेऊन येत्यें' असें ह्मणून तिनें एक किल्ल्यांचा झुबका त्याच्यापुढें टाकिला.

रहीम तेथें नानाप्रकारच्या अनेक मौल्यवान वस्तु पाहून खुष होऊन गेला, व खोलींतील एकामागूनएक पेट्या उघडून पाहण्यास त्यानें आरंभ केला. आतां मात्र विमलेवर त्याचा विश्वास पूर्ण बसला. इकडे विमलेनें त्या खोलीचें दार लावून घेऊन त्याची कडी लावली व कुलूपही घातलें. तरी शेख रहीम होते आपल्याच नादांत! आपण बंदिवान झालों, ह्याची त्यांना शुद्धीही नव्हती! नंतर विमला पळतच वरच्या खोलींत गेली. विमला आणि तिलोत्तमा ह्यांच्या खोल्या किल्ल्याच्या एकाच भागांत होत्या, व तेथपर्यंत अद्याप तें पेंढार आलें नव्हतें.

तिलोत्तमा व जगत्सिह ह्यांना, हा खालीं चाललेला गोंधळ ऐकूं आला होता कां नव्हता ह्याची शंकाच होती. विमला एकदम तिलोत्तमेच्या खोलींत न शिरतां मोठ्या हौसेनें दाराच्या फटीवाटे हळूच तिलोत्तमा आणि राजकुमार या उभयतांचें काय चाललें आहे हें पाहूं लागली. ज्याचा त्याचा स्वभाव आहे बोवा! या वेळींसुद्धां आमच्या विमलेला हौस सुचली, पण तिनें जें कांहीं पाहिलें त्यामुळें तिला आश्चर्य वाटलें.

ती पहाते तों तिलोत्तमा मंचकावर बसली असून जवळ जगत्सिंह उभा राहून मुकाट्यानें तिचे चेहऱ्याकडे पहात आहे. तिलोत्तमा रडत आहे; आणि जगत्सिंह तिचे डोळे पुशीत आहे.

हें सर्व पाहून 'हें निरोप घेतेवेळचें रडणें आहे' असें विमलेला वाटलें व ती दार उघडून खोलींत शिरली.

---

## प्रकरण २१ वें.

### तरवारीशीं तरवार.

विमलेला पाहून जगत्सिंहानें विचारिलें, 'हा कसला गलबला ऐकूं येतो आहे बरें?'

विमला ह्मणाली, 'हा पठाणांचा जयध्वनि आहे. जलदीनें कांहीं उपाय काढा; ते आतां या खोलींत येऊन एकदम उभे राहतील.'

जगत्सिंह क्षणभर विचार करून ह्मणाला, 'वीरेंद्र-सिंह काय करीत आहे?'

विमलेनें उत्तर दिलें, 'ते शत्रूंच्या हातांत बंदीवान होऊन पडले आहेत.'

हें ऐकतांच तिलोत्तमेच्या कंठांतून कोणाला ऐकूं येतो आहे किंवा नाहीं, इतका हळू दुःखध्वनि निघाला, आणि त्यासरशीं ती पलंगावर मूर्च्छित होऊन पडली.

हें पाहतांच जगत्सिंहाचा चेहरा एकदम उतरला. तो ह्मणाला, 'पहा पहा, तिलोत्तमेकडे पहा!'

विमलेनें लागलेंच गुलाबपाणी आणून तें तिलोत्तमेच्या तोंडावर, मानेवर व कपाळावर शिंपडिलें, आणि घाबरून जाऊन ती तिला वारा घालूं लागली.

हें चाललें आहे, तों शत्रूंकडील गडबड जवळ जवळ ऐकूं यऊ लागली. तेव्हां विमला रडत रडत ह्मणाली, 'त पहा मेले आलेच!-राजपुत्रा, आतां कसें होईल!'

रागानें जगत्सिंहाच्या डोळ्यांतून विस्तवाच्या ठिणग्या निघताहेत कीं काय असें वाटूं लागलें. तो ह्मणाला, 'ही वेळ जनानखान्यांत बायकोचा पदर कां धरून बसावयाची आहे?'

हें ऐकून त्या मानी विमलेच्या मानाग्नीचाही भडका झाला; ती राजपुत्राला ह्मणाली, 'असें करण्याचें काय कारण आहे युवराज! माझ्यानें जरी कांहीं झालें नाहीं, तरी मी विमलेच्या जवळ तरी उभी राहून मरेन!, हें बोलतां बोलतां विमलेचे डोळे पाण्यानें भरून आले.

हें ऐकून व पाहून राजपुत्राच्या अंतःकरणाला फार खेद वाटला व तो ह्मणाला, 'मीं तरी तिलोत्तमेला अशा स्थितींत

टाकून कसा जाऊं? तुझ्या सखीच्या रक्षणार्थ मीही प्राणत्याग करीन.'

शत्रूंचा भयंकर गलबला आतां अगदींच जवळ ऐकूं येऊं लागला. त्यांचीं हत्यारें खणखण वाजत, तेंही ऐकूं येऊं लागलें; तेव्हां विमला मोठमोठ्यानें ओरडून तिलोत्तमेला सावध करूं लागली. 'तिलोत्तमे! अग तिलोत्तमे! अशा वेळीं तूं कशीग बेशुद्ध पडलीस! अग, सावध हो, सावध हो, आह्मी तुझें रक्षण तरी कसें करावेंग?

तिलोत्तमेनें डोळे उघडिले. विमला ह्मणाली, 'तिलोत्तमा शुद्धीवर आली आहे. राजकुमारा! राजकुमारा! आतां माझ्या तिलोत्तमेचा बचाव करा हो!'

राजकुमार ह्मणाला, 'अशा या खोलींत राहून कोणाच्यानें बरें हें रक्षणाचें काम करवेल? आतां आपल्याला खोली बाहेर पडतां येतें, तर मी तुह्मांस किल्ल्याबाहेर हां हां ह्मणतां नेलें असतें. पण तिलोत्तमेच्यानें तर चालवत नाहीं. विमले! ते पठाण पहा जिना चढूं लागले. मी जाऊन पहिल्यानें प्राण देतों पण त्याचा तरी काय उपयोग? माझा मीं प्राण देऊन देखील तुह्मांला मी कोठें वांचविणार आहे!'

एका निमिषांत तिलोत्तमेला कडेवर उचलून घेऊन विमला म्हणाली, 'चला, मी तिलोत्तमेला घेऊन येत्यें तुमच्या बरोबर.'

विमला आणि जगत्सिंह खोलीच्या दारापाशीं येतात न येतात तोंच, मोठ्या वेगानें धांवून, चार पठाण त्या दारच्या तोंडाशीं येऊन धडकले. जगत्सिंह ह्मणाला, 'विमले, आतां पुढें जाण्यांत अर्थ नाहीं. माझ्या मागें उभी रहा.'

ते पठाण ती समोर येणारी शिकार पाहून 'अल्ला-ल्ला

हो' असें मोठ्यानें ओरडून पिशाच्चाप्रमाणें धावूं लागले. त्यांच्या कमरेच्या हत्यारांचा झणझणाट होऊं लागला, व त्यांचें ओरडणें संपतें न संपतें आहे तोंच, जगत्सिहाची तरवार एका पठाणाच्या छातींत मुठीपर्यंत जाऊन घुसली. तेव्हां त्यानें भयंकर किंकाळी मारीत मारीतच प्राण सोडिला. त्याच्या छातींतून जगत्सिह आपली तरवार बाहेर काढून घेतो आहे तोंच, दुसऱ्या एका पठाणाचा भाला त्याच्या गळ्याला येऊन लागला. भाला येऊन लागतो न लागतो तोंच, विद्युल्लतेप्रमाणें हातचलाखीनें, त्यानें तो डावे हातांत झेलिला, आणि तत्क्षणींच भाल्याच्या प्रतिघातानें त्या भाला मारणाऱ्याला त्यानें जमिनीवर निजविलें.

बाकी राहिलेल्या दोघा पठाणांनीं एकाच वेळीं आपापल्या तरवारी जगत्सिहाच्या डोक्याचा नेम धरून मारिल्या. तोंच जगत्सिहानें पळभरही न थांबतां, आपल्या उजव्या हातांतील तरवारीच्या एका वारासरसा, त्यांतील एका पठाणाचा हात तरवारीसह तोडून जमिनीवर पाडिला. परंतु त्या वेळीं त्याला दुसऱ्या पठाणाचा वार चुकवितां न आल्यामुळें, जरी तो त्याचे डोक्यावर बसला नाहीं, तरी त्याच्या खांद्याला फार मोठी जखम लागली. वाघाला पारध्यांनीं बाणांनीं जखमी केलें असतां, जसा तो दुःखानें दुप्पट विक्राळ होतो, तद्वतच जगत्सिहाची स्थिति झाली. तो पठाण पुन्हां तरवार घेऊन त्याजवर वार करण्याच्या बेतांत आहे, तोंच, राजपुत्रानें दोहों हातांनीं तरवार मुठींत घट्ट धरून, उडीसरसा, त्या पठाणाच्या डोक्यावर एक भयंकर वार केला. त्या वारानें पागोट्यासह त्या पठाणाच्या डोक्या-

चीं दोन शकलें होऊन पडलीं. पण त्यावेळीं ज्या पठाणाचा हात त्यानें तोडिला होता, त्यानें डाव्या हातानें कमरेची तीक्ष्ण कट्यार काढून, ती राजपुत्राच्या कपाळाचा नेम धरून फेंकली. राजपुत्राची उडी, पठाणाच्या डोक्याची दोन शकलें करून खालीं येत असतां, केवळ प्रारब्धानें ती कट्यार, त्यास मर्मस्थळीं न लागतां, तिचा नेम चुकून, त्याच्या त्या जबरदस्त दंडांत मुठीपर्यंत घुसली. पण त्यानें तो आघात केवळ सुईच्या बोंचण्याप्रमाणें मानून, उलट त्या पठाणाच्या कमरेंत अत्यंत जोरानें एक लाथ मारली, तीबरोबर तो दूर जाऊन पडला. राजपुत्र वेगानें धांवत जाऊन त्याचें डोकें कापणार, इतक्यांत 'अल्ला-ल्ला-हो' अशी भयंकर गर्जना करीत अगणित पठाण सैन्य त्या खोलीकडे धांवलें. हें पाहून आतां लढाई करणें म्हणजे, आपण होऊन मृत्यूला आमंत्रण करण्यासारखें आहे, असा राजपुत्रानेंही विचार केला. राजपुत्राचें सर्वांग रक्तानें न्हानलें होतें, व अंगांतून फार रक्त गेल्यामुळें तो हळूहळू क्षीण होत चालला होता.

तिलोत्तमा बेशुद्धची बेशुद्ध, विमलेच्या मांडीवर पडली होती. व विमला तिलोत्तमेला मांडीवर घेऊन सारखी रडत होती. तिचींही वस्त्रें राजपुत्राच्या रक्तानें भिजत होतीं.

खोली पठाणांच्या लष्करानें भरून गेली होती. राजपुत्रानें आपल्या तरवारीवर भार देऊन एकदां मोठा श्वास सोडिला, इतक्यांत एक पठाण त्याला 'अरे ए नफर! हत्यार खालीं ठेव; मी तुला मारीत नाहीं. चल!' असें म्हणाला.

अगदीं विझत आलेल्या अग्नीवर, जसें कोणी तूप ओतिलें म्हणजे, त्यांतून एकदम ज्वाला बाहेर पडतात, त्याप्रमाणें राजपुत्रानें एका उडीसरसें, त्या पठाणाचें डोकें तोडून आपल्या पायापाशीं पाडिलें आणि तरवार गरगर फिरवीत तो हांक मारून म्हणाला ‘ अरे हे यवना ! रजपूत कोणत्या रीतीतें प्राणत्याग करतात तें पहा. ’

इतकें बोलून विजेप्रमाणें राजकुमाराची तरवार चमकूं लागली. आपल्या एकट्याच्यानें आतां लढाई होणें कठीण हें त्याला कळून चुकलें होतें. तरी मारवतील तितके शत्रु मारून मग मरावयाचें, असा त्याचा उद्देश होता, आणि त्याच हेतूनें, त्यानें आपली जबरदस्त तरवार, आपल्या वज्रप्राय मुठींत धरून, शत्रूंच्या भर गर्दींत उडी घातली. स्वसंरक्षणाचा विषय आतां त्याच्या मुळीं ध्यानींमनींच नसल्यामुळें, त्याची तरवार मात्र एकसारखी सुरू झाली. एक, दोन, तीन—असे एकसारखे त्याच्या प्रत्येक हातासरसे, पठाण मरून पडूं लागले; यदाकदाचित् जर कोणी प्रारब्धानें वांचलाच तर त्याचा हात किंवा पाय तुटल्याशिवाय रहात नसे. असा एकसारखा राजपुत्राचा क्रम सुरू झाला. राजपुत्राचे अंगावर चोहोंबाजूंनीं पर्जन्याच्या वृष्टीप्रमाणें एकसारखा शस्त्रांचा मारा होऊं लागला. असें होतां होतां राजपुत्राचा हात चालेनासा होऊं लगला; शरिरांतून अतिशय रक्त वाहून गेल्यामुळें त्याचा उजवा हात लटका पडला; त्याचें डोकें फिरावयास लागलें, व डोळ्यांपुढें अंधेरी येऊं लागली, आणि असें होतां होतां आपल्या भोंवती काय गडबड चालली आहे, हेंही त्यास स्पष्ट ऐकूं येईनासें झालें.

'राजपुत्राला कोणी मारूं नका, जिवंत असतांच वाघाला पिंजऱ्यांत घातलें पाहिजे.'

एवढें मात्र उसमानखानाच्या तोंडचें वाक्य राजपुत्रानें शेवटचें ऐकिलें, पुढें काय हें त्यास कळलें नाहीं.

राजपुत्राचे हात ढिले पडून लांब होऊन पडले होते. शक्तिहीन अशा त्याच्या मुठींतून तरवार झणझण शब्द करीत जमिनीवर पडली. तिच्याबरोबर राजपुत्रही त्यानें मारून पाडलेल्या एका पठाणाच्या मृतदेहावर मूर्च्छा येऊन पडला.

तेव्हां वीसपंचवीस पठाण राजपुत्राच्या पागोट्यावरील रत्नें लुटण्याकरितां एकदम धांवले. हें पाहून उसमानखान मोठ्या गंभीर आवाजानें ओरडून म्हणाला, 'खबरदार, राजपुत्राच्या अंगाला स्पर्श कराल तर!'

हें ऐकतांच सर्वजण मागें हटले. उसमानखानानें व दुसऱ्या एका शिपायानें राजपुत्रास उचलून पलंगावर निजविलें. आपला विवाह, तिलोत्तमेबरोबर झाल्यावर, एखादे दिवशीं तरी आपण या पलंगावर बसूं, असें ज्यानें चारच घटकापूर्वी एक क्षणभर मनांत आणिलें होतें, त्यास तोच पलंग मृत्युशय्येप्रमाणें कां व्हावा? पण 'नियतिर्बलीयसी' हें वाक्य नाहीं तर खरें कसें व्हावें?

'त्या स्त्रिया कोठें आहेत?' असें जगत्सिंहाला निजविल्यानंतर उसमानानें त्या शिपायांस विचारिलें.

कारण उसमानाच्या दृष्टीस विमला व तिलोत्तमा कांहीं पडेनात. जेव्हां दुसऱ्यानें शिपाई त्या खोलींत शिरले, तेव्हां पुढें काय होणार, हें विमलेला कळून चुकलें होतें; दुसरा जेव्हां कांहीं उपाय तिला सुचेना, तेव्हां तिलोत्तमेला घेऊन

ती पलंगाखालीं लपून बसली. तिला तसें करतांना कोणी पाहिलेंहि नव्हतें. त्या कोठें दिसत नाहींत असें पाहून उसमानखान म्हणाला, 'त्या स्त्रिया कोठें आहेत? तुह्मी सर्व किल्ला धुंडून त्यांस आधीं शोधून काढा. ती दासी मोठी भयंकर बुद्धिवान आहे. ती कोठें जर पळून गेली असेल तर माझे मनाला स्वस्थता राहणार नाहीं. पण एवढें मात्र लक्षांत ठेवा कीं, वीरेंद्रसिंहाच्या कन्येवर कोणत्याही प्रकारचा जुलूम होता उपयोगी नाहीं.'

कित्येक शिपाई त्यांच्या शोधार्थ किल्ल्याच्या निरनिराळ्या भागीं बारकाईनें धुंडून पाहूं लागले. दोन इसम दिवा घेऊन त्याच खोलींत शोधूं लागले. शोधतां शोधतां एकजण पलंगापाशीं आला. पलंगाखालीं दिवा करून पाहतांच ज्यांना आपण पाहत आहों त्या येथेंच आहेत, असें पाहून तो म्हणाला, 'ह्या येथेंच आहेत!'

उसमानखानानें व्यग्र होऊन विचारिलें, 'आहेत?' त्याचें उत्तर मिळालें, 'आहेत.' हें ऐकून उसमानाचा चेहरा आनंदित दिसूं लागला; तो त्या दोघींना ह्मणाला, 'तुह्मी बाहेर या, कांहीं चिंता करूं नका.'

विमला पहिल्यानें बाहेर आली, व मग तिलोत्तमेला तिनें बाहेर घेऊन बसविलें, तेव्हां तिलोत्तमा शुद्धीवर आली. तिचें तिला आतां बसतां आलें. तिनें विमलेला हळूहळू विचारिलें, 'आपण कोठेंग आलों आहों?'

विमलेनें तिच्या कानांत सांगितलें, 'कांहीं काळजी करूं नको. तूं आपला बुरखा तोंडावर घेऊन बस म्हणजे झालें.'

ज्या माणसानें त्यांचा तपास लावून त्यांना बाहेर काढिलें होतें, तो उसमानला म्हणाला, 'जनाब, या गुलामानें यांचा शोध लावला आहे.'

उसमान म्हणाला, 'काय, तुला इनाम कां हवें आहे? पण तुझें नांव काय?'

तो म्हणाला, 'या गुलामाचें नांव करीमबक्ष आहे: पण करीमबक्ष म्हणून मला कोणी ओळखीत नाहींत. मी पूर्वी मोंगल लष्करांत होतों, म्हणून आमच्याआमच्यांत सर्व लोक मला 'मोंगल-सेनापति' या नांवानें हाक मारितात.'

हें नांव ऐकतांच विमलेच्या अंगावर कांटा उभा राहिला आणि तिला अभिराम स्वामींच्या ज्योतिष गणिताचें स्मरण झालें.

उसमान म्हणाला,' ठीक, जा, माझ्या ध्यानांत आहे.

# द्वितीय खंड.

## प्रकरण १ लें.

### आयेषा.

जेव्हां जगत्सिहानें डोळे उघडून पाहिलें, तेव्हां आपण एका मोठ्या वाड्यांत पलंगावर निजलों आहों, असें त्यास दिसलें. ज्या खोलींत तो निजला होता, त्या खोलींत आपण पूर्वी कधीं आलों होतों असें त्यास वाटेना. ती अति विस्तीर्ण असून सुशोभित होती. त्या खोलीची जमीन फरसबंदी केलेली होती व तीवर पायाला मऊ लागणारा असा गालीचा पसरलेला होता. त्या खोलींत गुलाबदाणी वगैरे सोन्यारुप्याचीं भांडीं, व हस्तिदंताच्या व इतर मोठाल्या किमतीच्या वस्तु चोहोंकडे गालीचावर पसरलेल्या होत्या; दाराला व खिडक्यांना निळे पडदे लाविलेले होते; त्यामुळें भर दिवसाचा उजेडदेखील फार सौम्य होऊन आंत येत असे. जागजागीं फुलांचे तुरे ठेविले होते; खिडक्यांवरून व दारांवरून फुलांच्या माळांच्या मेहराफी लागून राहिल्या होत्या; मध्यंतरीं अति उत्तम काम केलेलें सोन्याचें कारंजें गुलाबपाण्यानें भरलेलें उडत होतें. एकंदरीनें ती खोली सुगंधमय होऊन राहिली होती.

इतकेंही असून खोली इतकी शांत होती कीं, तेथें कोणी नसावें असें त्यास पहिल्यानें वाटलें; पण पाहतो तों आपल्याला, एक दासी, सुवासिक पाणी शिंपडलेल्या पंख्यानें,

अगदीं आवाज न करितां, वारा घालीत आहे आणि दुसरी एक दासी जवळच वाक्शक्तिविरहित चित्रपुत्तलिकेप्रमाणें स्तब्ध उभी आहे. ज्या हस्तिदंती पलंगावर राजपुत्र निजला होता, त्याजवर बसून कोणी एक स्त्री, त्याच्या अंगावरील सर्व जखमांना, कांहीं औषध मोठ्या चातुर्यानें लावीत होती. जमिनीवर पसरलेल्या गालिचावर लोडाशीं, उत्तम पोषाक केलेला एक पठाण, एकीकडे विडा खात, व एकीकडे हातीं एक फारशी पुस्तक घेऊन आपल्याशींच वाचीत पडला होता. कोणीही कांहीं बोलत नव्हतें; अथवा कोणत्याही प्रकारची गडबड होत नव्हती.

राजपुत्रानें डोळे उघडून प्रथम खोलींत चोहोंकडे नजर फेंकली. त्यानें कुशीवर वळण्याचा यत्न केला, पण त्याच्यानें एक बोटभरदेखील वळवलें नाहीं; त्याच्या सर्व शरीराला भयंकर वेदना होत होत्या.

त्याच्याजवळ पलंगावर बसलेली स्त्री, त्याचा तो उद्योग पाहून, त्यास अति मृदु वीनासारख्या मंजुल स्वरानें म्हणाली, ‘ स्वस्थ पडून रहा, हालूं नका. ’

राजपुत्रानें आपल्या अशक्त स्वरानें विचारिलें, ‘ मी कोठें आहे ? ’

पुनः तिनें मधुर आवाजानें उत्तर दिलें. ‘ बोलूं नका, आपण चांगल्या जागीं आहांत; कांहीं काळजी करूं नका, व बोलूंही नका.’

राजपुत्रानें पुनः अगदीं खोल गेलेल्या आवाजानें विचारिलें, ‘ दिवस किती आला आहे ? ’

मधुरभाषिणीनें पुनः हळूच सांगितलें, ‘ दुपार झाली

आहे. स्वस्थ पडून रहा, बोललां तर गुण येणार नाहीं, व आपण स्वस्थ पडलां नाहीं, तर मी येथून उठून जाईन.'

राजपुत्रानें मोठ्या कष्टानें विचारिलें, ' मला आपल्याला आणखी एकच विचारावयाचें आहे; आपण कोण?'

रमणीनें उत्तर केलें, ' आयेषा.'

राजपुत्र स्वस्थ पडून आयेषेचे तोंडाकडे पाहूं लागला. हिला आपण कोठें पाहिलें आहे कीं काय, हा विचार त्याचे मनांत घोळूं लागला; पण विचाराअंतीं हिला आपण कधींही पाहिलें नाहीं, अशी त्याची पक्की खात्री झाली.

आमच्या कथानकाचे वेळीं आयेषेचें वय सुमारें बावीस वर्षांचें असावें. आयेषेला पाहिल्याबरोबर ही अत्यंत सुंदर आहे अशी पहाणाऱ्याची खात्री होई, पण तिचें स्वरूप खरोखर कसें होतें, ह्याचें वर्णन हुबेहूब थोडक्यांत करणें, हें फार कठीण काम आहे. तिलोत्तमाही अत्यंत सुंदर होती, पण आयेषेचें रूप तिच्यासारखें नव्हतें; स्थिरयौवना विमलेचें सौंदर्य अजूनही लोकांचें मन मोहून टाकिणारें होतें; आयेषेचें सौंदर्य तसेंही नव्हतें.

कांहीं कांहीं तरुणींचें सौंदर्य, वसंत ऋतूंतील मल्लिकेच्या पुष्पाप्रमाणें असतें; नुक्तें उमललेलें, लज्जेनें संकुचित, कोमल, निर्मल व परिमलमय! आमच्या तिलोत्तमेचें रूप ह्या वर्गांतील होतें.

कांहीं कांहीं सुंदरींचें रूप, तिसऱ्या प्रहरच्या स्थल पद्माप्रमाणें असतें; निर्वास, मुदितोन्मुख, शुष्कपल्लव, तरीपण सुशोभित, अधिक विकासित, अधिक प्रभाविशिष्ट व मधुपरिपूर्ण; आमच्या विमलेचें रूप ह्या वर्गांतील होतें.

आयेषेचें सौंदर्य, नुकत्याच उगवलेल्या सूर्याच्या किरणांनीं फुललेल्या पाण्यांतील नलिनी पुष्पाप्रमाणें होतें; सुविकसित, सुवासित, रसपरिपूर्ण व सूर्यप्रकाशानें प्रदीप्त; तें संकुचितही नव्हतें व विशुष्कही नव्हतें; पण कोमल असून प्रोज्ज्वल होतें; त्याच्या दलराजींवरून सूर्याचीं किरणें एकसारखीं परावर्तन पावत होतीं, आणि त्याचें हंसणें, त्यांत न समावल्यामुळें, एकसारखें बाहेर पडत असून, दाही दिशा भरून टाकीत होतें.

प्रिय वाचकहों! 'सौंदर्याचा प्रकाश' तुम्ही कधीं पाहिला आहे काय? तुम्ही पाहिला नसेलच, पण ऐकिला मात्र असेल. पुष्कळ सुंदरी आपल्या 'सौंदर्याच्या प्रकाशानें' दाही दिशा प्रकाशित करितात. पुष्कळ लोकांच्या सुना आपापलीं 'घरें प्रकाशित' करतात, असेंही आमचे ऐकण्यांत आहे. गोकुळांत, व शुंभनिशुंभांचे युद्धांत, प्रत्यक्ष कालाच्या रूपानेंही 'प्रकाश पाडिला' होता. ह्यावरून आमच्या प्रिय वाचकांस 'सौंदर्याचा प्रकाश' ह्मणजे काय हें समजून चुकलें असेल.

विमला आपल्या रूपाचा प्रकाश पाडीत असे, पण तो प्रकाश दीपप्रकाशाप्रमाणें होता; तो अगदीं अंधुक व लुकलुक्या होता; तेलच घातलें तर जळावयाचा, नाहींतर नाहीं; घरच्या कामाला मात्र उपयोगी पडण्यासारखा खरा;, घरांत नेऊन ठेविला तर त्याच्या उजेडानें, स्वयंपाक करितां येई, बिछाना घालितां येई, सगळें करितां येई; पण जर कां त्याला हात लावावयास गेलें तर मात्र फोड आल्याशिवाय रहावयाचा नाहीं.

तिलोत्तमेच्याही रूपाचा उजेड पडत असे, पण तो बालेंदूच्या चांदण्याप्रमाणें होता; तो सुविमल, सुशील, सुमधुर असा असे; पण त्याच्यानें गृहकार्य होण्यासारखा तो नव्हता; तितका तो प्रखर नव्हता, व फार लांबून आलेला होता.

आयेषेच्याही रूपाचा उजेड पडत असे, पण तो सकाळच्या उन्हाप्रमाणें होता; प्रदीप्त, प्रभामय असून त्यांत एवढी खुबी मोठी होती कीं, ज्या ज्या वस्तूवर तो पडे ती ती वस्तु एकसारखी हंसते आहे, असें वाटे.

बागेमध्यें ज्याप्रमाणें कमल, त्याप्रमाणें ह्या आमच्या आख्यायिकेंत आयेषा होय; ह्मणून तिचा प्रत्येक अवयव आमच्या प्रियवाचकांचे लक्षांत आणून द्यावा अशी आमची इच्छा आहे. मी जर चितारी असतों, आणि मला जर कमल करितां आलें असतें, मला जर तिचा वर्ण काढितां आला असता, तर धड चांप्यासारखा पिवळा नाहीं, गुलाबासारखा तांबडा नाहीं, व पांढऱ्या कमळाच्या कळीसारखा पांढरा नाहीं, पण तिघांचेंही मिश्रण ज्यांत आहे, असा रंग मीं काढिला असता; जर तिचें तें कपाळ उत्तम सुगोल मला काढितां आलें असतें, तर मीं तें नुस्तें सुगोलच नव्हे तर विस्तीर्ण असें काढून, जणूं काय मन्मथाची रंगभूमीच आहे कीं काय, असें दाखविलें असतें; तिच्या त्या असल्या कपाळावर तिच्या केंसांची सीमा दाखविणारी, अर्धचंद्राकृति रेषा, मीं दाखविली असती; तिची ती अशी सुंदर केशसीमा रेषा, तिच्या त्या सुगोल कपालाला अनुगामी होऊन, कानापर्यंत नेऊन सोडिली असती; कानापर्यंतही आलेली रेषा, नंतर मी तिच्या कानावरून कमानीसारखी नेऊन,

सोडिली असती; जर मला तिचे ते काळेभोर व रेशमासारिखे केस काढितां आले असते; जर मला तिच्या त्या तसल्या केसांच्या मध्यभागचा कपाळापासून थेट मध्य सोडून गेलेला भांग काढितां आला असता; अहाहा! किती तरी तो सूक्ष्म असून नाजुक व सुंदर होता! अशा रीतीनें असलेल्या त्या केशराशीला सुगंधपूर्ण केल्यावर, ती सुंदर घातलेली वेणी जर मला काढितां आली असती; दाट अशा त्या तिच्या भिवया जर मला काढितां आल्या असत्या; पहिल्यानें त्या दोन्ही भिवया एकमेकींना भेटण्याच्या हेतूनें जरी जवळ जवळ आलेल्या, तरी स्त्रीस्वभावचांचल्यामुळें न भेटतां, जणूं काय एकमेकींवर रुसून, सरळ मार्ग सोडून वक्रगतीनें, रागावल्यामुळें फुगून जाऊन, आपल्या मार्गाच्या अर्धावर जाताहेत न जाताहेत तोंच, खूप जाड्या होऊं लागलेल्या, व नंतर परस्परांच्या वियोगानें दुःखार्त होऊन हळू हळू जों जों त्यांच्यामधील अंतर अधिक अधिक होऊं लागलें, तों तों बारीक होत जाऊन, सरतेशेवटीं त्या कानावरून गेलेल्या केशरेषेजवळ जातां जातां, ज्या केवळ सुईच्या अग्रासारख्या सूक्ष्म होऊन गेल्या आहेत, अशा भिवया जर मला काढितां आल्या असत्या; जर ते विद्युदग्निपूर्ण अशा मेघाप्रमाणें कोमल, चंचल असे चक्षुपल्लव मला काढितां आले असते; जर मला त्या दोन्ही डोळ्यांचें विस्तृत असें आयतन काढितां आलें असतें; त्यांच्यावरच्या व खालच्या पापण्यांची धनुष्याकृति, त्या डोळ्यांची नीलालक्तक प्रभा, व त्यांच्यामधील भ्रमराप्रमाणें स्थूल व काळ्याभोर बाहुल्या जर मला काढितां आल्या असत्या; मानी

स्वभावाचें दर्शक, थोड्या नाकपुड्या उघडलेलें, असें तें तिचें नाक, तो रसमय ओष्ठाधर, ती काळ्याभोर वेणीनें स्पर्श केलेली संगमरवरी दगडाप्रमाणें श्वेत अशी तिची मान, तिचे ते कानांतील डुलांनीं, एकवार तरी आपल्याला स्पर्श करावा ह्मणून उत्सुक झालेले गोंडस खांदे, स्थूल असून कोमल असे ते रत्नालंकारांनीं भरून गेलेले हात, ज्या हिऱ्यांच्या अंगठ्या, बोटांत असल्यामुळें, हीनतेज होऊन गेल्या आहेत, अशीं तिचीं तीं बोटें, पद्मपुष्पाप्रमाणें तिचे ते लाल तळहात, गळ्यांतून येऊन वर पडलेल्या मोत्यांच्या हाराच्या तेजालाही मागें सारणारें, तिचें ते गोंडस व उन्नत वक्षस्थल, तिचे ते मनाला मोहून टाकणाऱ्या शरीराचे उन्नतानत भाग, हीं जरी मला माझ्या शक्तीप्रमाणें उत्तमोत्तम रीतीनें काढितां आलीं असतीं; तरी मी हीं सर्व काढण्यासाठीं माझे हातांत कलम धरण्याचें धैर्य केलें नसतें. आयेषाच्या सौंदर्याचें सार ह्मटलें ह्मणजे तिचे ते धीर कटाक्ष होते! संध्याकाळच्या वाऱ्यानें कांपणाऱ्या, नीलोत्पलाप्रमाणें, तिचे धीर व चंचल कटाक्ष—प्रियवाचकहो! क्षमा करा! माझ्या कल्पनाशक्तीबाहेर हें वर्णन जात चाललें आहे! माझें मानसिक चित्रच अस्पष्ट होत चाललें आहे, तेथें गरीब बिचाऱ्या लेखणीचा काय उपाय?

राजपुत्र बराच वेळपर्यंत आयेषेकडे पहात राहिला. त्याला तिलोत्तमेचें स्मरण झालें; स्मरण झाल्याबरोबर त्याचें हृदय दुभंग झाल्यासारखें झालें; शिरासमूहामध्यें रक्ताचा प्रवाह झपाट्यानें धाहूं लागला, व त्याच्या त्या

खोल जखमांतून पुनरपि रक्तस्राव होऊं लागला. राजपुत्र पुनः मूर्च्छित होऊन डोळे मिटून पडला.

पलंगावर बसलेली स्त्री हें पाहतांच धाबरून चटकन उठली. गालीच्यावर लोडाशीं टेंकून वाचीत पडलेला पठाण मधूनमधून पुस्तक वाचण्याचें सोडून मोठ्या सप्रेमदृष्टीनें तिजकडे पहात होता. इतकेंच नाहीं तर ती युवती जेव्हां पलंगावरून उठली, व जेव्हां तिच्या कानांतील डूल हलूं लागले, तेव्हां त्यांकडे देखील तो बराच वेळपर्यंत अपरितृप्त नजरेनें पाहूं लागला. आयेषेनें हळूहळू पावलें टाकीत त्या पठाणापाशीं येऊन त्याच्या कानांत सांगितलें, 'उसमान, जलदी करून हकीमजींस बोलावून आणण्यास कोणास तरी पाठवा.'

किल्ला सर करणारा उसमानखानच गालीचावर बसला होता. आयेषेच्या सांगण्यावरून तो उठून गेला.

आयेषा, रुप्याच्या छपायीवर भांडें होतें त्यांतलें कांहीं पाण्यासारखें द्रव्य घेऊन, तें पुनः मूर्च्छा पावलेल्या राजपुत्राच्या कपाळावर आणि तोंडावर शिंपडूं लागली.

उसमानखान हकीमजींना घेऊन फारच जलद आला. हकीमजींनीं मोठ्या प्रयासानें रक्तप्रवाह बंद केला, आणि पुष्कळ औषधें आयेषेच्या स्वाधीन केलीं, व तीं त्यास कशीं व केव्हां द्यावयाचीं, हें सर्व तिला सांगितलें.

आयेषेनें त्यांच्या कानांत विचारिलें, 'प्रकृति कशी काय आहे?'

हकीम ह्मणाले, 'ताप फार भयंकर आहे.'

असें बोलून ते त्यांचा निरोप घेऊन निघाले, इतक्यांत

उसमाननें पाठोपाठ जाऊन त्यांस दरवाजांत हळूच विचारिलें 'निभावेल कीं नाहीं ?'

हकीमजी ह्मणाले, 'आकार तर दिसत नाहीं. पण पुनः कमी जास्ती कांहीं झाल्यास मला बोलवावयास पाठवा.'

## प्रकरण २ रें.

## कुसुमांत पाषाण.

त्या दिवशीं बरीच रात्र होईपर्यंत, आयेषा आणि उसमानखान तेथें जगत्सिंहापाशीं बसून राहिलीं होतीं. मधून-मधून जगत्सिंह शुद्धीवर येई व पुनः बेशुद्ध पडे; हकीमजी-ही वरचेवर येऊन जात असत. आयेषा एकसारखी जवळ बसून त्याची शुश्रूषा करीत होती. दोन प्रहर रात्र उलटून गेली तेव्हां एक दासी येऊन आयेषेला म्हणाली, 'बेगमसाहेब आपल्याला पुसत होत्या.'

'आल्येंच मी' असें ह्मणून आयेषा उठली. उसमानखानही उठला. तेव्हां आयेषेनें त्यास विचारिलें, 'कां आपण देखील उठलां ?'

उसमान ह्मणाला, 'रात्र फार झाली आहे, चला मी तुह्मांला पोंचविण्यास येतों.'

आयेषेनें तेथील दासदासींस नीट सावध राहण्यास सांगून आपण आपल्या आईच्या महालाकडे जाण्यास निघाली असतां तिला वाटेंत उसमाननें विचारिलें, 'आज काय तुह्मी बेगमसाहेबापाशींच राहणार ?'

आयेषा ह्मणाली, 'नाहीं, मी राजपुत्राकडे पुनः परत जाईन.'

उसमान ह्मणाला, 'आयेषे! तुमच्या गुणांचें वर्णन माझ्यानें करवत नाहीं. हा राजपुत्र तुमचा धडधडीत शत्रु असून, बहीण आपल्या सख्या भावाची देखील करीत नाहीं अशी, मोठ्या प्रेमानें तुह्मीं त्याची शुश्रूषा करीत आहां, तुह्मीं केवळ त्याला प्राणदान देत आहां.'

आयेषेच्या जगाला मोहून सोडणाऱ्या तोंडावर थोडेंसें हास्य दिसूं लागलें; ती ह्मणाली, 'उसमान मी तर मुळीं बायकोच आहे; रोग्यांची सेवा करणें हें आमचें कर्तव्य-कर्मच आहे; तीं नाहीं केली तर मात्र आह्मांला दोष, पण केली तर त्याबद्दल आमची स्तुति करावयास नको. पण तुह्मी कां बरें त्याची शुश्रूषा करितां? जो तुमचा कट्टा शत्रु, रणक्षेत्रांत तुमचा गर्व हरण करणारा प्रतियोगी, ज्याची तुह्मी आपल्या हातांनीं ही दशा केलीत, त्याची रात्रंदिवस आपला उद्योग सोडून तुह्मी जी सेवा करवीत अहां, तो बरा व्हावा ह्मणून जे नानाप्रकारचे उपाय योजवीत आहां, त्याबद्दल मात्र खरोखर तुह्मी प्रशंसेस पात्र आहां.'

हें ऐकून उसमानाला थोडें वाईट वाटलें व तो ह्मणाला, 'आयेषे, तुह्माला आपल्या स्वतःच्या सुंदर स्वभावा-प्रमाणेंच तो सर्वांचा असावा असें वाटतें. पण माझा स्वभाव कोठें तितका सुंदर आहे, हें तुम्हाला माहीत आहे काय? जगत्सिंह जगला तर माझें किती हित होईल? आतां जगत्सिंहाला मरणच आलें तर आमच्या पक्षाचें काय होईल बरें? रणक्षेत्रीं मानसिंह जगत्सिंहापेक्षां कमी नाहीं!

एका योद्धयाचे ऐवजीं दुसरा उभा राहील. पण जर कां जगत्सिंह जिवंत राहील, आणि तोही माझ्या हातीं असा बंदिवान, तर मग मी मानसिंहाला आपल्या मुठींत आणलेंच असें समजा. तो आपल्या प्रियपुत्राला सोडवून नेण्याकरितां, आमच्याबरोबर आम्हांला अनुकूल असा तह करील. अकबरही असल्या कुशल सेनापतीला हातचा जाऊं देऊं नये म्हणून, ह्या अशा तहाचीं कलमें खुषीनें कबूल करील; आणि त्यांतही या जगत्सिंहाला आम्ही आपल्या चांगुलपणानें आपलासा करून ठेविला, तर तो खचीत आम्हांला फायदेशीर असा तह ठरविण्यांत, योग्य ती मदत किंवा यत्न तरी करील, आणि त्याचा यत्न कधींही व्यर्थ जाणार नाहीं. आतां यांतील कोणताच उद्देश सफल झाला नाहीं, तरी निदान जगत्सिंहाला स्वातंत्र्य देण्याबद्दल कां होईना, मानसिंहापासून आम्हांला पुष्कळ द्रव्य तर मिळवितां येईल. एखादे दिवशीं लढाई मारून जय मिळविण्यांपेक्षां जगत्सिंहाला जिवंत ठेवण्यांत आमचा विशेष फायदा आहे.

उसमान, हें सगळें मनांत आणून, राजपुत्राचा प्राण वांचविण्यास प्रयत्न करींत होता, यांत अगदीं शंका नाहीं; पण त्यांत आणखी दुसरेंही कांहीं होतें. कोणाकोणाचा असा स्वभाव असतो कीं, लोक आपल्याला दयाळु म्हणतील या लज्जेच्या भयानें, आम्ही कठीण हृदय आहों, असें दुसऱ्यांना दाखविण्याचा ते यत्न करीत असतात; आणि दयाशीलता ही नारी—स्वभावसिद्ध आहे असा उपहास करीत असतां देखील ते परोपकार करीत असतात. बरें, त्यांस

तसें करण्याचें कारण विचारिलेंच,'तर असें करणें आम्हांला फार अवश्य आहे' असें ते सांगतात.

उसमान ह्यांपैकींच एक आहे, हें आयेषा पक्कें जाणून होती. हंसतां हंसतां ती म्हणाली, 'उसमान! सर्वच जर तुम्हांप्रमाणें स्वार्थपरतेमुळें दूरदर्शी होतील, तर मग धर्मबंधनाचें कारणच उरलें नाहीं.'

उसमान थोडावेळ इकडे तिकडे पाहून फार मृदु स्वरानें म्हणाला, 'मी जो अत्यंत स्वार्थी आहे, त्याचें आणखी एक प्रमाण देतों.'

हें ऐकतांच आयेषेनें पोटीं विद्युल्लता असलेल्या मेघाप्रमाणें असणारे, आपले ते डोळे उसमानाकडे लाविले.

उसमान म्हणाला, 'मी एक आशालता धरून बसलों आहें, आतां किती दिवस तिच्या बुडाशीं पाणी शिंपूं?'

हें ऐकतांच आयेषेची मुखश्री गंभीर दिसूं लागली. मुद्रेंत फरक पडल्यानें तिच्या त्या नवीन सौंदर्याकडे उसमान पहातच राहिला.

आयेषा म्हणाली, 'उसमान, मी तुम्हांला भाऊ समजून बहिणीप्रमाणें तुमचेजवळ येऊन बसत्यें, उठत्यें; पण तुम्हांला जर अशी धामधूम करणें असेल, तर मी तुमच्या दृष्टीस देखील पडणार नाहीं.'

उसमानाचें हर्षोत्फुल्ल मुख अगदीं उतरून गेलें. तो म्हणाला, 'ही तर नेहमींचीच गोष्ट आहे! सृष्टिकर्त्या! ह्या कुसुमासारख्या शरिरांत पाषाणाचें हृदय कां बरें लपवून ठेविलें आहेस?'

उसमान, आयेषेला तिच्या आईच्या महालांत पोंचवून, खिन्न अंतःकरणानें, आपल्या महालांत परत आला.

आणि जगत्सिंह विषमज्वराचे विकारानें अचेतन होऊन बिछान्यावर पडून राहिला आहे.

---

## प्रकरण ३ रें.

### तिलोत्तमा कां तुम्हीं ?

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं जगत्सिंह होता त्या खोलींत आयेषा, उसमान आणि हकीमजी पहिल्याप्रमाणें गुपचुप बसले होते; आयेषा पलंगावर बसून आपल्या हातानें जगत्सिंहाला पंख्यानें वारा घालीत होती. हकीमजी वारंवार त्याची नाडी तपासून पहात होते. जगत्सिंह अचेतन होऊन पडला होता. हकीमजींनीं सांगितलें कीं, ' आज रात्रीं ज्वर निघण्याचे वेळीं त्यास दगा होण्याचा संभव आहे, आणि जर कां ती वेळ निभावली, तर मग यांचेसंबंधानें चिंता करण्याचें कांहीं कारण नाहीं. ते खचीत वांचतील. ' आतां ज्वर निघण्याची वेळ होत आली होती म्हणून सर्वजण अधिक चिंतातुर होऊन बसली होतीं. हकीमजी वारंवर नाडी पहात होते, ' आतां नाडी मंद व्हात आहे, ' आतां त्याहीपेक्षां अगदीं मंद झाली आहे, ' ' आतां कांहीं जोरानें चालत आहे ' इत्यादि वाक्यें त्यांच्या तोंडांतून वारंवार निघत होतीं. इतक्यांत एकाएकीं हकीम-

जीचें तोंड एकदम उतरून गेलें; ते म्हणाले, वेळ आली हो आली !'

आयेषा आणि उसमान निस्पंद होऊन ऐकूं लागलीं. हकीमजी हातांत नाडी धरून बसले.

कांहीं थोड्यावेळानें हकीमजी म्हणाले, 'नाडी तर सुटली' हें ऐकतांच आयेषेचें मुख अधिकच म्लान होऊन गेलें. जगत्सिंहाच्या मुखावर भयंकर फरक दिसूं लागला. तोंड अगदीं निस्तेज, पांढरें फिक्कट पडलें. हातांच्या बळकट मुठी वळल्या. डोळे गरगर फिरूं लागले. त्या चिन्हांवरून, आतां ह्याला मृत्यूच्या मुखीं पडण्यास मुळींच अवकाश नाहीं, असें आयेषेनें ताडिलें. हकीमजी हातीं औषधाचें भांडें घेऊनच बसले होते. त्यांनीं त्यांचीं तीं तशीं लक्षणें पाहतांच, त्यांच्या तोंडांत बोटें घालून दांतखीळ उघडली आणि तें औषध त्यांच्या तोंडांत ओतिलें. औषध तोंडांतून बाहेर पडूं लागलें, पण त्यांतला कांहीं थोडासा अंश पोटांत उतरला. पोटांत औषध उतरतांच रोग्याचीं चिन्हें पुन्हां पालटलीं. हळूहळू मुखावरची ती पांढुरकी दूर होऊं लागली, व पूर्वीचा वर्ण येऊं लागला. त्यांच्या वर्णाची अस्वाभाविक पांढुरता दूर होऊन त्या जागीं हळूहळू रक्त संचरूं लागलें. हातांच्या मुठी सैल झाल्या. दृष्टि स्थिर होऊन डोळे पुनः मिटून गेले. हकीमजी नीट ध्यान लावून पुन्हां नाडी तपासूं लागले. बराच वेळ गेल्यावर मग ते म्हणाले, 'आतां अगदीं चिंता नाहीं. आतां निभावलें !'

उसमानानें विचारलें, 'ताप उतरला कां ?'

हकीम म्हणाले, 'होय, उतरला आहे.'

हें ऐकतांच आयेषा व उसमान या उभयतांचींही मुखें प्रफुल्लित झालीं. हकीमजी म्हणाले, 'आतां काळजी करण्यासारखें कांहीं नाहीं. माझ्या बसण्याची आतां कांहीं गरज नाहीं. तुम्हीं हें औषध दोनप्रहर रात्र होईपर्यंत तासातासानें देत जा.' असें सांगून ते निघून गेले. नंतर उसमानही तेथें चार एक घटका बसून आपल्या महालांत निघून गेला. आयेषा पहिल्याप्रमाणें पलंगावर बसून त्याला औषधादि उपचार करूं लागली.

दोनप्रहर रात्र होण्याच्या किंचित् पूर्वीं राजपुत्रानें डोळे उघडिले. डोळे उघडतांच आयेषेचा सुखानें आनंदित झालेला चेहरा त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्या डोळ्यांच्या पाहणीवरून तो कांहीं गत गोष्टीचें स्मरण करण्याच्या प्रयत्नांत आहे, पण त्याचे ते प्रयत्न निष्फल होत आहेत, व एकंदर त्याच्या बुद्धीला भ्रम झाला आहे, असें आयेषेला वाटलें. बराच वेळ तो आयेषेकडे पाहून म्हणाला, 'मी कोठें आहे ?' दोन दिवसांपूर्वीं राजपुत्रानें हाच प्रश्न पहिल्यानें केला होता.

आयेषा म्हणाली, 'कतलुखानाच्या किल्ल्यांत.'

पुनः पहिल्याप्रमाणेंच राजपुत्र कांहीं स्मरण करण्याचा यत्न करूं लागला. पुष्कळ वेळानें त्यानें विचारिलें, 'मला येथें कां आणिलें आहे ?'

आयेषेनें पहिल्यानें या प्रश्नाचें उत्तर त्याला कांहीं वेळ दिलें नाहीं. नंतर ती म्हणाली, 'आपण अजारी आहां म्हणून.'

राजपुत्र विचार करतां करतां मान हालवून म्हणाला, 'नाहीं नाहीं, मी बंदीवान झालों आहे.' पण असें बोलतां बोलतां त्याचा चेहरा पालटून गेला.

या प्रश्नाचा जबाब आयेषेनें कांहींच दिला नाहीं. पण आतां राजपुत्राची स्मरणशक्ति पुनः जागृत व्हावयास लागली आहे एवढें मात्र तिला दिसून आलें.

कांहीं थोड्या वेळानें राजपुत्रानें पुनः विचारिलें, 'आपण कोण आहां?'

'मी आयेषा आहें.'

'आयेषा कोण?'

'कतलुखानाची कन्या.'

राजपुत्र पुनः क्षणभर स्तब्ध राहिला. कारण, एकदम पुष्कळ बोलण्यास त्याला अद्याप सामर्थ्य आलें नव्हतें. थोडी विश्रांति घेतल्यावर त्यानें विचारिलें, 'मी येथें किती दिवस आहे?'

आयेषेनें उत्तर दिलें, 'आज चार दिवस झाले.'

जगत्सिहानें विचारिलें, 'काय गडमांदारण अद्याप तुमच्याच ताब्यांत आहे?'

आयेषा म्हणाली, 'होय.'

थोडा वेळ पुनः विश्रांति घेऊन जगत्सिहानें विचारिलें, 'वीरेंद्रसिंहाची काय स्थिति आहे?'

आयेषेनें उत्तर दिलें, 'त्याला कैदेंत टाकिलें आहे व आज त्याचा न्याय होणार आहे?'

जगत्सिहाचा म्लान झालेला चेहरा हें ऐकून जास्तच म्लान झाला. मग त्यानें विचारिलें, 'किल्ल्यांतील इतर माणसांची काय अवस्था आहे?'

हें ऐकून आयेषेचें चित्त उद्विग्न झालें. ती म्हणाली, 'सगळी बातमी मला मिळाली नाहीं.'

राजपुत्र आपल्याच मनाशीं कांहीं बोलला; तेव्हां त्याच्या तोंडावाटे एक नांव निघालें; आयेषा ऐकते तों तें—'तिलोत्तमा'—हें होतें.

आयेषा हळूच उठून हकीमानें दिलेलें गोड औषध आणण्यास जेव्हां गेली, तेव्हां राजपुत्र तिच्या कानांतील असलेल्या डुलांच्या हालण्यानें तिच्या तोंडाला जी चमत्कारिक शोभा आली होती, व त्यामुळें तिच्या मूळच्या अलौकिक देहसौंदर्याला जें मोहकत्व आलें होतें, त्यानें लुब्ध होऊन तिजकडे एकसारखा पाहूं लागला. इतक्यांत आयेषा औषध घेऊन आली. तें पिऊन राजपुत्र म्हणाला, 'एक स्वर्गांतील देवकन्या माझ्या उशाकडे बसून माझी शुश्रूषा करीत आहे असें माझ्या भर दुखण्यांत मला स्वप्न पडलें होतें ती तुम्हीं कां 'तिलोत्तमा?'

आयेषा म्हणाली, 'आपण तिलोत्तमेला स्वप्नांत पाहिलें असावें.'

## प्रकरण ४ थें.

### बुरखा घेतलेली स्त्री.

किल्ला सर करून घेतल्यावर दोन दिवसांनीं सायंकाळीं कतलुखान आपल्या किल्ल्यांतील दरबारांत बसला होता. दोहों बाजूला अंमलदार लोक आपापल्या दर्जाप्रमाणें ओळीनें उभे होते; समोरच्या पटांगणांत हजारों लोक न बोलतां उभे होते. त्या दिवशीं वीरेंद्रसिंहाचा न्याय व्हावयाचा होता.

कित्येक नागव्या तरवारी घेतलेले शिपाई वीरेंद्रसिंहाला शृंखलाबद्ध करून दरबारांत घेऊन आले. या वेळीं वीरेंद्रसिंह क्रोधानें लाल भडक झाला होता, पण त्याच्या तोंडावर भीतीचें कांहींच चिन्ह दिसत नव्हतें. त्या वेळीं त्याच्या लाल झालेल्या डोळ्यांतून अग्नीच्या ज्वाळा निघताहेत असा त्याचे डोळे पाहून भास होई. त्याच्या नाकपुड्या फुगून एकसारख्या कांपत होत्या. तो दातांनीं आपला खालचा ओंठ कडकड चावीत होता. त्याला कतुलखनाच्या समोर नेऊन उभें केलें तेव्हां कतुलखानानें त्याला विचारिलें, 'वीरेंद्रसिंहा! तुझ्या अपराधांचा आज न्याय व्हावयाचा आहे. तूं काय म्हणून बरें माझ्याविरुद्ध आचरण केलेंस?'

वीरेंद्रसिंह रागानें इतका लाल झाला होता तरी आपला राग आवरून म्हणाला, 'तुझ्याविरुद्ध मी काय आचरण केलें, तें तूं आधीं मला सांग.'

एका अंमलदारानें 'थोड्या नम्रतेनें बोल' असें त्यास सांगितलें.

कतुलखान म्हणाला, 'काय म्हणून तूं माझ्या हुकुमाप्रमाणें मला द्रव्य आणि लष्कर पाठविण्याचें ना म्हणून सांगितलेंस?'

वीरेंद्रसिंहानें त्याला न भीतां उत्तर केलें, 'तूं राजद्रोही लुटारू आहेस. तुला कशाबद्दल द्रव्य देऊं? काय ह्मणून लष्कर पाठवूं?'

हें त्याचें बोलणें ऐकून तेथील प्रेक्षकांना वीरेंद्र आपल्या हातानें आपलें डोकें उडवून घेण्यास तयार झाला आहे, असें वाटून चुकलें.

कतुलखानाचें शरीर रागानें कांपूं लागलें. पण क्रोध कितीही अनावर झाला असता तो एकदम आवरून घेण्याची शक्ति त्याच्या अंगांत होती. त्यामुळें त्यानें तात्काल शांत होऊन विचारिलें, 'तूं माझ्या अंमलाखालीं रहात असून काय म्हणून मोंगलाबरोबर सख्य केलेंस ?'

वीरेंद्रानें विचारिलें, 'तुझा अंमल कोठला?'

कतुलखानाला फार राग आला व तो म्हणाला, 'ऐक दुरात्म्या, तुझ्या कर्माचें फळ तुला भोगिलेंच पाहिजे. इतका वेळ तुझ्या जीवनाची मला कांहीं आशा होती, पण तूं मूर्ख आहेस, तूं आपल्या अभिमानानें आपलें मरण आपल्यावर आणूं पहात आहेस.'

हें ऐकून वीरेंद्रसिंह मोठ्या गर्वानें हंसून म्हणाला, 'कतुलखान, मी ज्या काळीं तुझ्यापाशीं असा शृंखलाबद्ध होऊन आलों त्याच वेळीं तुझ्या दयेची आशा धरून आलों नाहीं. तुजसारख्या शत्रूच्या दयेवर जें जीवित अवलंबून आहे, त्या ह्या जीविताची मी कांहींच पर्वा करीत नाहीं. फक्त मला मारून टाकूनच जर तुझें समाधान तूं करून घेतास, तर मी तुला आशीर्वाद देत देत प्राणत्याग केला असता. पण तूं माझ्या पवित्र कुळाला कलंकित केलें आहेस. तूं मला माझ्या प्राणापेक्षां प्रिय धनाचा '—

वीरेंद्राच्यानें अधिक बोलवेना; त्याचा गळा दाटून आला, डोळे अश्रूंनीं भरून आले; निर्भीड, गर्विष्ठ वीरेंद्रसिंह खालीं तोंड घालून रडूं लागला!

कतुलखान स्वभावतः निष्ठुर होता; तो इतका निष्ठुर होता कीं, दुसऱ्याला झालेलें दुःख पाहून त्याच्या आनं-

दाला भरतें येत असे. आपल्या अत्यंत मानी शत्रूची अशी स्थिति पाहतांच त्याचें मुख हर्षोत्फुल्ल झालें, आणि तो म्हणाला, 'वीरेंद्रसिंहा! काय तूं मजपासून कांहींच मागून घेऊं इच्छित नाहींस? विचार करून पहा, तुझ्या मरणाचा समय अगदीं सन्निध आला आहे.'

ज्या दुःसह संतापाच्या अग्नीमुळें वीरेंद्राचें हृदय जळत होतें, तो संताप त्याच्या रडण्यामुळें थोडा शांत झाला, व पहिल्यापेक्षां पुष्कळ शांतपणानें त्यानें उत्तर दिलें, 'दुसरें कांहीं मागत नाहीं. फक्त इतकीच भिक्षा तुजपाशीं मागतों कीं, तूं होईल तितकें लौकर मला मारून टाक.'

कतलुखान म्हणाला, 'बरें तसेंही होईल. पण दुसरें कांहीं मागण्याची इच्छा असल्यास माग?'

वीरेंद्र म्हणाला, 'आतां या जन्मांत तर दुसरें कांहीं नको.'

कतलुखान म्हणाला, 'काय, तुझ्या या मृत्युसमयीं देखील तूं आपल्या कन्येला भेटूं इच्छित नाहींस?'

हा प्रश्न ऐकतांच सर्व प्रेक्षकगण दुःखानें निःशब्द होऊन गेला. वीरेंद्राच्या डोळ्यांतून पुनः क्रोधाग्नीच्या ज्वाळा निघूं लागल्या. तो म्हणाला, 'जर माझी कन्या तुझ्या घरांत जिवंत असेल तर मला तिची भेट नको. मेली असेल तर मात्र आण, तिला पोटाशीं धरून मी आनंदानें मरून जाईन.'

हें ऐकतांच प्रेक्षकजन एकदम तटस्थ होऊन राहिले; अगणित माणसें तेथें उभीं असून इतकी शांतता होऊन राहिली होती कीं, एखादी सुई जर पडती तर तिचाही आवाज सर्वत्र सारखा ऐकूं गेला असता. नबाबानें वीरेंद्राला वधस्थानीं घेऊन जाण्याविषयीं इशारत केली. तेथें

जाण्याचे अगोदर एका मुसलमान सरदारानें त्याच्या कानाशीं लागून त्याला कांहीं सांगितलें. पण वीरेंद्राला त्याचा उमज पडला नाहीं. तेव्हां त्या मुसलमान सरदारानें त्याच्या हातीं एक कागद दिला. वीरेंद्रसिंह दुसऱ्याच कांहीं विचारांत गर्क असल्यामुळें, त्यानें तो कागद फोडून पाहतांच, तो विमलेनें लिहिला आहे असें पाहून मोठ्या रागानें त्याचा चोळामोळा करून तो दूर भिरकावून दिला. कागद आणून देणारा तो खालीं पडतांच उचलून घेऊन तसाच चालता झाला. जवळ उभे रहाणाऱ्यांपैकीं एकजण दुसऱ्यास हळू हळू म्हणाला, 'तो कागद बहुधां वीरेंद्राच्या कन्येचा असावा.'

ते शब्द वीरेंद्राच्या कानीं पडले. तो लागलाच तिकडे वळून म्हणाला, 'माझी कन्या म्हणून कोण म्हणाला! मला कन्याच नाहीं.'

कागद आणणारा गृहस्थ कागद घेऊन गेला, पण जातेवेळीं त्यानें शिपायांस 'मी परत येईपर्यंत अंमळ थांबा.' असें फर्माविलें.

शिपाई म्हणाले, 'जसा यजमानांचा हुकूम.'

कागद आणणारा स्वतः उसमानखानच होता, व म्हणूनच शिपायांनीं त्याला यजमान म्हणून म्हटलें.

उसमानखान हातीं कागद घेऊन अंतःपुराच्या तटाच्या पायथ्यापाशीं गेला. तेथें एका बकुळीच्या झाडाच्या आड एक बुरखा घेतलेली स्त्री उभी होती. चोहोंकडे पहात पहात उसमानानें तिजपाशीं जाऊन घडलेला सर्व वृत्तांत तिला सांगितला; तो ऐकून ती स्त्री म्हणाली, 'मी आपल्याला फार

तसदी देत आहे, पण आपल्यामुळेंच माझी अशी स्थिति झाली आहे. आपल्याला माझें एवढें काम पुरें केलें पाहिजे.'

उसमान निस्तब्ध होऊन राहिला.

बुरखा घेतलेली स्त्री मनाला अत्यंत वाईट वाटत असल्यामुळें कांपत कांपत आवाजानें त्याला म्हणाली, 'नसलें करणें तर नका करूं; मी सांप्रत अनाथ झाल्यें आहें, पण जगदीश्वर तर आहेना?'

हें ऐकून उसमान म्हणाला, 'आईसाहेब! तुम्ही मला हें किती धोक्याचें काम सांगत आहां? ह्याची तुम्हांला कल्पनाच नाहीं. कतलुखानाला जर कां हें कळून आलें, तर माझें डोकें नाहीं कां तो मारणार?'

ती स्त्री म्हणाली, 'कोण कतलुखान? मला कां बरें असें ठकवूं पहातां? कतलुखानाची काय मगदूर आहे कीं तो तुमच्या एका केंसाला धक्का लावील?'

उसमान म्हणाला, 'तुम्हीं कतलुखानाला अद्याप ओळखत नाहीं. बरें चला मी तुम्हाला वधस्थानीं घेऊन जातों.'

उसमानाबरोबर ती बुरखा घेतलेली स्त्री वधस्थानीं येऊन स्तब्धपणें उभी राहिली. वीरेंद्रसिंहाची दृष्टी तिच्याकडे नव्हती; तो तिच्याकडे न पाहतां एका भिकाऱ्याचा वेष धारण केलेल्या ब्राह्मणाबरोबर कांहीं बोलत होता. बुरखा घेतलेल्या स्त्रीनें आपल्या बुरख्यांतून पाहिलें तों तो ब्राह्मण अभिरामस्वामी आहे.

वीरेंद्र अभिरामस्वामींना म्हणाला, 'गुरुदेव! मी आपली आतां रजा घेतों. ह्याच्या पलीकडे आतां काय बोलूं आतां?

या लोकीं मला कोणत्याही गोष्टीची इच्छा राहिली नाहीं, मग कोणाची प्रार्थना तरी कशासाठीं करूं?'

अभिरामस्वामींनीं बोटानें त्याला मागें येऊन उभी राहिलेली ती बुरखा घेतलेली स्त्री दाखविली; तेव्हां वीरेंद्रानें आपलें तोंड तिकडे फिरविलें. त्याबरोबर त्या स्त्रीनें बुरखा काढून घेऊन लांब फेंकून दिला व त्याच्या शृंखलाबद्ध पायांशीं ती गडबडां लोळूं लागली. वीरेंद्र गद्गद्स्वरानें म्हणाला, 'कोण? विमला!'

'स्वामी! प्रभो! प्राणेश्वरा!' अशा त्याला हाका मारितां मारितां ती अगदीं वेड्यासारखी होऊन मोठमोठ्यानें बोलूं लागली. 'मी आज सगळ्या जगापुढें बोलणार. मला कोण अडविणार आहे? अहो स्वामी! अहो प्राणनाथ! अहो माझ्या कंठरत्ना! आपण कोठें हो चाललां? मला कसें हो टाकून जातां?'

हें ऐकून वीरेंद्राच्या डोळ्यांतून एकसारख्या अश्रुधारा वाहूं लागल्या. तिचा हात धरून तिला वर उचलून घेऊन तो म्हणाला, 'विमले! प्रियतमे! तूं या वेळीं मला कां बरें रडावयास लावितेस! जर शत्रूंनीं हें पाहिलें तर ते मला 'हा मरणाला भितो,' असें म्हणतील.'

हें ऐकून विमलेनें आपलें रडें एकदम आवरलें. वीरेंद्र पुनः म्हणाला, 'विमले! मी जातों. तूं माझ्या मागून ये, बरें कां.'

विमला म्हणाली, 'होय, येईन, खचीत येईन.'

असें म्हणून एका क्षणार्धांत तिनें वीरेंद्रसिंहाच्या गळ्याला घट्ट मिठी मारिली व दुसऱ्या कोणाला ऐकूं न जाई अशा

रीतीनें तिनें त्याच्या कानांत सांगितलें, 'मी येईन, पण या दुःखाचा सूड घेईन तेव्हांच येईन.'

निर्वाणोन्मुख प्रदीपाप्रमाणें वीरेंद्राच्या मुखावर हर्षाचें तेज फांकलें, आणि तो म्हणाला, 'काय, तूं? आणि सूड उगवणार?'

विमला आपला उजवा हात त्याच्यापुढें करून म्हणाली, 'हो, ह्या, ह्या हातानें; हे पाहा, ह्या हातांतील सुवर्णालंकार मी काढून टाकित्यें; आतां मला ते घालून कोणाला दाखवावयाचे आहेत!'

असें बोलून तिनें आपल्या हातांतील कंकणादि अलंकारांच्या खिळी काढून ते फेंकून देत देत ती म्हणाली, 'आतां याउप्पर फक्त पाणीदार तरवारीशिवाय मी दुसरा अलंकार या हातांत धारण करणार नाहीं.'

वीरेंद्र हृष्टचित्तानें म्हणाला, 'तूं जें म्हणालीस तें करशील, अशी आतां माझी खात्री झाली आहे. तूं करशील, जगदीश्वर तुझी मनकामना पूर्ण करो!'

चांडाल मोठ्यान म्हणाला, 'आतां किती उशीर आहे! चला आटोपा लवकर.'

वीरेंद्रानें विमलेला विचारिलें, 'आणखी तुला कांहीं सांगावयाचें आहे कां? आतां तूं जा येथून.'

विमला म्हणाली, 'नाहीं. मला माझ्या डोळ्यांसमोर वैधव्य येऊं द्या, म्हणजे माझ्या मनांत येणाऱ्या सर्व संकोचांना मी तुमच्या रक्तानें तिलांजली देईन.' विमलेचा आवाज हें बोलतांना भयंकर रीतीचा स्थिर झाला होता.

'बरें तसें कां होईना?' असें बोलून वीरेंद्रसिंहानें चांडाळाला इशारत केली. विमलेनें पाहिलें तों, वरून खालीं येणारी कुऱ्हाड सूर्यतेजानें प्रदीप्त झाली आहे, त्यामुळें तिचे नयनपल्लव तत्काळ पळभर मिटले; पुनः डोळे उघडून ती पाहते, तों वीरेंद्रसिंहाचें छिन्न शीर रक्तानें भिजलेल्या धुळींत लोळत पडलें आहे. त्या वेळीं विमला एखाद्या दगडाच्या मूर्तीप्रमाणें उभी राहिली होती. तिच्या डोक्यावरील एक केंसही वाऱ्यानें हालत नव्हता; तिच्या डोळ्यांतून एकही अश्रुबिंदु पडत नव्हता, व पापण्या मुळींच न मिटतां एकसारख्या नजरेनें ती त्या छिन्न शिराकडे पाहत होती.

---

# प्रकरण ५ वें.

## विधवा.

तिलोत्तमा कोठें आहे? पितृविहीन अनाथ बालिका कोठें आहे? विमला तरी कोठें आहे? कोठून बरें विमला आपल्या स्वामीच्या मरणसमयीं वधस्थळीं येऊन आपल्या दृष्टीस पडली? त्यानंतर तेथून मग ती कोठें बरें गेली?

काय म्हणून बरें वीरेंद्रसिंहानें आपल्या मृत्युसमयींही आपल्या प्रियतम कन्येची भेट घेतली नाहीं? काय म्हणून बरें 'ती माझी कन्या नाहीं' असें त्यानें म्हटलें

होतें ? काय म्हणून बरें त्यानें विमलेचें पत्र न वाचतां तसेंच फेंकून दिलें होतें ?

काय म्हणून बरें म्हणजे ? प्रिय वाचकहो ! कतलुखानाचा वीरेंद्रसिंहाला जो इतका तिरस्कार उत्पन्न झाला होता त्याचें स्मरण करा, म्हणजे काय काय भयंकर कृत्यें घडून आलीं होतीं, तीं तुम्हांला समजतील.

'तूं माझ्या पवित्र कुलाला कलंकित केलें आहेस' असें बोलून शृंखलेनें जखडून टाकलेल्या त्या वाघानें भयंकर गर्जना केली होती, तिची तुम्हांला आठवण आहे काय ?

प्रिय वाचकहो ! तिलोत्तमा आणि विमला कोठें आहे हें समजण्याची तुमची इच्छा आहे काय ? कतलुखानच्या उपपत्नी राहण्याच्या मंदिरांत जर तुम्ही शोध करून पाहाल तर त्या तेथें तुमच्या दृष्टीस पडतील.

संसाराची गति अशी आहे; अदृष्ट चक्राचे फेरे असे भयंकर आहेत; रूप, यौवन, सरलता, निर्मलता हीं सर्व ह्याच चक्राच्या धांवेखालीं चुरडून त्यांचें पीठ होऊन जात आहे.

कतलुखानाचा नेम असा होता कीं, एखादा किल्ला किंवा गांव जर त्यानें घेतला, तर तेथें ज्या सुंदर स्त्रिया त्यास सांपडत, त्यांस तो आपल्या जनानखान्यांत पाठवीत असे. गडमांदारण जिंकल्यानंतर दुसऱ्या दिवशीं कतलुखानानें तेथें येऊन बंदिवानांची व्यवस्था लावण्याचें व पुढें किल्ल्याचा बंदोबस्त ठेविण्याकरितां लष्करी लोकांस नेमण्याचें वगैरे कामें केलीं. त्या गडावर सांपडलेल्या स्त्रीबंदिवानांत विमला आणि तिलोत्तमा यांस

पाहतांच कतलुखानानें त्यांस आपलें विलासगृह सुशोभित करण्यासाठीं पाठवून दिलें. ह्यानंतर तो दुसरीं कामें पुष्कळ असल्यामुळें त्यांत बरेच दिवस गुंतला होता; त्या वेळीं रजपूत सैन्य, आपला धनी जगत्सिंह त्या किल्ल्यावर पठाणांचा बंदीवान झाला असल्याचें ऐकून, त्यास सोडविण्याकरितां किल्ल्याभोंवतीं वेढा घालण्याच्या बेतांत आहे, हें ऐकून त्यांस पराङ्मुख करण्याकरितां कोणती युक्ति योजिली म्हणजे तें कार्य उत्तम सिद्धीस जाईल, हें शोधून काढण्याचे खटपटींत तो गढून गेला होता. ह्याच कारणामुळें कतलुखानाला ह्या नव्या दासींबरोबर सुखोपभोगाचा अनुभव घेण्यास इतके दिवस अवसर मिळाला नव्हता.

विमला आणि तिलोत्तमा यांस वेगवेगळ्या खोल्यांत ठेवण्यांत आलें होतें. त्यांपैकीं एका खोलींत ही आमची नुक्तीच पितृहीन झालेली तरुणी आपली धूलिधूसर देहलता धरातलावर टाकून देऊन स्वस्थ पडली होती. प्रिय वाचकहो ! तिच्याकडे पाहण्याचें आतां तुम्हांला काय कारण आहे बरें ? तिलोत्तमेकडे ह्यावेळीं कोण पहावयास बसलें आहे ? वसंतऋतूच्या प्रारंभीं जेव्हां एखादी नववल्लरी वाऱ्याच्या मंदमंद झुळकांबरोबर हालत असते, तेव्हां तिच्यावर नुकत्याच आलेल्या फुलांच्या बहाराचा वास घेण्यासाठीं कोण बरें जवळ उभें राहत नाहीं ? पण जेव्हां तीच लता पावसाळ्यांत वाऱ्याच्या झपाट्यानें ज्या वृक्षाच्या आश्रयानें ती असते, त्या वृक्षासह जमिनीवर पडते, तेव्हां त्या वृक्षाला सोडून देऊन ह्या लतेकडे कोणी तरी पाहतें काय ! लाकू-

हतोंडे येतात व त्या वृक्षाचीं लांकडें तोडून नेतात, आणि आमची ही लता त्यांच्या पायाखालीं तुडवून मात्र जाते. असो.

तिलोत्तमेला येथेंच सोडून आपण दुसऱ्या जागीं जाऊं चला; जेथें चंचल, चतुर, रसप्रिय व रसिक विमलेच्या ऐवजीं एक गंभीर, अनुताप करणारी व मलीन अशी विधवा डोळ्यांला पदर लावून रडत बसलेली तुमच्या दृष्टीस पडेल.

हीच कां आपली विमला ? हिची ती झोंकदार वेणी कोठें आहे ? हिच्या डोक्यावर तर धूलिराशी आहे; तिची ती जरीचें काम केलेली ओढणी नाहीं; ती रत्नखचित कांचोळी नाहीं; वस्त्रें तर मळलेलीं आहेत; नेसलेलें वस्त्र अति लहान असून जुनें आहे. तिचा तो अलंकारभार कोठें आहे ? ते खांद्यांना प्रेमानें स्पर्श करणारे कर्णालंकार कोठें आहेत ? डोळे असे सुजून कां आले आहेत ? तिचे ते कटाक्ष कोठें आहेत ? कपाळावर जखम कशी पडली आहे ? त्यांतून रक्त सारखें वाहत आहे !

विमला उसमानाची वाट पाहत आहे.

उसमान पठाणकुलतिलक होता. युद्ध हें आपलें स्वार्थसाधन, आपला व्यवसाय व तसाच धर्मही आहे असें तो समजत असे; आणि म्हणूनच लढाई जिंकण्याचें कामीं कोणतेंही कर्म करण्याला तो मागें पुढें पाहत नसे. पण लढाईचा एकदां कार्यभाग उरकला म्हणजे पराजित लोकांवर विनाकारण जुलूम यत्किंचितही न होऊं देण्याविषयीं तो फार खबरदारी घेत असे. आणि जर कतलुखानानें स्वतः विमला व तिलोत्तमा यां-

च्या दुर्भाग्यामुळें वर निर्दिष्ट केलेला दुष्ट हुकूम दिला नसता, तर त्यांस उसमानखानाच्या कृपेनें कदाचित् बंदीवानांसारखें राहण्याचा प्रसंगही न येता. ह्याच्याच कृपेनें विमलेला आपल्या पतीला मृत्युसमयीं भेटतां आलें होतें. विमला ही वीरेंद्राची स्त्री आहे, असें जेव्हां उसमानास कळलें, तेव्हां तर त्याचें दयार्द्रचित्त अधिकच आर्द्र झालें. उसमान हा कतलुखानाचा पुतण्या होता, यामुळें त्यास अंतःपुरांत अथवा कोठेंही जाण्यायेण्यास हरकत नसे, हें पूर्वीं आपल्या पाहण्यांत आलेंच आहे. ज्या विशालगृहांत कतलुखानाच्या भोगांगना राहत असत, तेथें प्रत्यक्ष कतलुखानाच्या पुत्रांनाही जाण्यास मोकळीक नसे, तेव्हां उसमानाला तर अर्थात्च नव्हती. पण उसमान हा कतलुखानाचा उजवा हात होता. याच्याच बाहुबलानें कतलुखानाला अगोदर नदीच्या कांठापर्यंतचा मुलूख ओरिश्याचे अंमलाखालीं आणावयास सांपडला होता. तेव्हां अर्थात्च सर्व माणसें कतलुखानाप्रमाणेंच त्याचाही मान राखीत असत; व म्हणूनच आज सकाळीं विमलेच्या विनंतीवरून अंतःकालसमयीं तिला आपल्या पतीची भेट घेतां आली होती.

पतिवधानंतर दोन दिवसांनीं, जे कांहीं दागिने राहिले होते, ते विमलेनें तिच्या सेवेस कतलुखानानें नेमून दिलेल्या दासीला देऊन टाकिले. हें पाहून ती दासी म्हणाली, 'मला आपली काय आज्ञा आहे?'

विमला म्हणाली, 'तूं काल ज्याप्रमाणें उसमानखानाकडे गेली होतीस तशीच आज जा व त्यांना सांग कीं, मी त्यांना

पुनः एकदां भेटावयास इच्छितें; आणि त्यांना आणखीं असेंही सांग कीं, मी ही त्यांची शेवटचीच भेट घेणार आहें, व पुनः तिसऱ्यानें भेटीविषयीं मी त्यांना विनंति करून त्रास देणार नाहीं.'

दासीनें तो निरोप जाऊन सांगितला, तेव्हां उसमानानें असें सांगून पाठविलें कीं, 'आपल्या महालाकडे येण्यानें आपण दोघेंही संकटांत पडूं, म्हणून आपणच माझे महालांत येण्याचें करावें.'

विमलेनें तिला विचारिलें, 'पण मी तिकडे जाऊं कशी?' दासीनें उत्तर दिलें, 'त्यांनीं सांगितलें आहे कीं, मी त्याला कांहीं तरी उपाय काढीन.'

संध्याकाळ झाल्यावर आयेषेची एक दासी विमला होती त्या महालांत आली, व अंतःपुरांतील खोजांना कांहीं सांगून विमलेला आपल्याबरोबर घेऊन उसमानाकडे गेली.

विमला आली असें पाहतांच उसमानानें तिला विचारिलें, 'आतां माझ्या हातून तुमचें काय काम होण्यासारखें आहे म्हणतां?'

विमला म्हणाली, 'काम कशाचें? तें आपल्याशीं बोलण्यानेंच होणारें आहे; रजपूत कुमार जगत्सिंह जिवंत आहे काय?'

उसमान म्हणाला, 'होय, तो जिवंत आहे.'

विमलेनें विचारिलें, 'तो मोकळा आहे किंवा कैदेंत आहे?'

उसमानानें उत्तर दिलें, 'तो कैदी राच, पण

हल्लीं तो कैदखान्यांत मात्र नाहीं. त्याला जखमा झाल्या आहेत व त्यामुळें तो पीडित होऊन अंथरुणाला खिळून राहिला आहे.'

विमला तें ऐकून म्हणाली, 'या अभागिणीच्याच संगतीनें त्याला ह्या विपत्ति भोगणें भाग पडलें आहे. पण हा देवाच्या घरचा खेळ आहे. राजपुत्र जर जगला आणि त्याला चांगला आराम पडला, तर आपण हा एवढा कागद त्याला द्या; तोंपर्यंत तो आपल्याजवळच राहूं द्या; एवढीच माझी आपल्याला प्रार्थना आहे.'

उसमान तो कागद तिला परत देऊन म्हणाला, 'हें काम करणें मला उचित नाहीं. राजपुत्र कोणत्याही अवस्थेंत असला तरी तो बंदिवानच आहे. कोणत्याही कागदांत काय मजकूर आहे, तो वाचून पाहिल्याशिवाय बंदीवानाकडे तो जाऊं देणें, हें अयोग्य आहे आणि तें आमच्या नबाबसाहेबांच्या हुकमाविरुद्ध आहे.'

विमला म्हणाली, 'या कागदांत आपल्याविरुद्ध एक अक्षरही लिहिलेलें नाहीं, म्हणून हें गैरवाजवी काम आहें असें मानितां येणार नाहीं. आपल्याला आणि नबाबसाहेबांचा हुकूम? आपण आपलेच नबाब आहां.'

उसमान म्हणाला, 'ह्याशिवाय दुसऱ्या प्रकारच्या कामांत पुष्कळ वेळेस मी काकांच्या हुकमाविरुद्ध जातों, पण असल्या कामांत नाहीं. ह्या पत्रांत आमच्याविरुद्ध कांहीं नाहीं, हें जें आपण सांगत आहां त्यावर माझा पूर्ण भरंवसा आहे; पण ह्या कामांत नियम मोडितां येत नाहीं. माझ्या हातून हें काम होणार नाहीं.'

विमला दिलगीर होऊन म्हणाली, ' तसें असेल तर आपण तो वाचून पाहून मग द्या. '

उसमान तो कागद घेऊन वाचूं लागला.

## प्रकरण ६ वें.

### विमलेचें पत्र.

' युवराज ! मीं आपणांस वचन दिलें होतें कीं, एके दिवशीं मी आपला सर्व वृत्तांत आपणांस कळवीन. तसें करण्याची वेळ आज आली आहे. '

' माझी तिलोत्तमा अंबरसिंहासनारूढ झाली म्हणजे मग माझा सर्व वृत्तांत आपणांस कळवावा, अशी मला आशा होती. पण तो माझा आशावृक्ष मुळांसकट उपटून पडला आहे. मला वाटतें कीं, थोड्याच दिवसांत तिलोत्तमा या जगांत नाहीं, विमलाही नाहीं, असें आपण ऐकाल; कारण आमची आयुर्मर्यादा अगदीं पुरी होत गेली आहे.'

' ह्याचकरितां आज आपणांस हें पत्र मी लिहित्यें आहें. मी मोठी पापी आहें, अनेक प्रकारचीं दुष्कृत्यें माझ्या हातून घडलीं आहेत. मी मेल्यें म्हणजे लोक माझी निंदा करतील, पुष्कळ वेडेंवांकडें बोलतील, तेवेळीं माझ्या निंद्य नांवाला लागलेला कलंक कोण बरें धुऊन टाकील? माझ्या वर इतकें प्रेम करणारा कोणी आहे काय ?'

'इतकें प्रेम करणारा एक गृहस्थ होता; पण त्यानें फारच थोड्या दिवसांपूर्वी ह्या क्षणभंगुर अशा मर्त्यलोकची वस्ती सोडून देऊन स्वर्गीचा रस्ता धरिला आहे.'

'अभिरामस्वामींच्या हातानें ह्या दासीचें कार्य सिद्धीस जाण्यासारखें नाहीं. राजकुमार! कधीं तरी मला माझे सोयरे मान देऊन आपलीशी म्हणतील अशी मला फार आशा होती. एका दिवसाकरितां तरी माझे आपण आप्त होऊन माझें काम करा. ही गोष्ट कोणाला सांगूं? ह्या अभागिनीचें खडतर नशीब अग्निशिखेसारखें आहे; जो प्रेमानें माझे जवळ राहतो, त्यालाच ती स्पर्श करिते. कांहींही होवो, पण ह्या दासीची एवढी विनंति ध्यानांत ठेवा. जेव्हां लोक म्हणतील कीं, विमला कुलटा होती, दासीवेषानें गणिका होती, तेव्हां त्यांना सांगा कीं, विमला नीच कुलांत उत्पन्न झालेली होती, विमला मंदभागिनी होती, विमला जीभ ताब्यांत नसल्यामुळें शेंकडों अपराध करणारी होती, पण विमला गणिका नव्हती. सांप्रत ज्यानें स्वर्गी गमन केलें आहे, त्यानें विमलेच्या महद्भाग्यानें, तिचें यथाशास्त्र पाणिग्रहण केलें होतें; विमलेनें एक क्षणभर देखील आपल्या पतीशीं विश्वासघाताचें वर्तन केलेलें नाहीं.'

'इतके दिवस ही गोष्ट उघडकीस आली नव्हती. आज तिच्यावर कोणी विश्वास ठेवील काय? मी पत्नी असून दासीप्रमाणें कां राहत होत्यें तें ऐका—

'गडमांदारणाच्या नजीक एका गांवीं शशिशेखर भट्टाचार्य म्हणून एक गृहस्थ राहत होता. तो एका श्रीमंत

ब्राह्मणाचा पुत्र होता. तरुणपणीं त्यानें यथारीति विद्याध्ययन केलें होतें, पण अध्ययनामुळें त्याच्या स्वभावांतील दोष दूर झाले नव्हते. जगदीश्वरानें शशिशेखरांत सर्व प्रकारचे गुण घातले होते, पण त्यांत एक प्रबल दोषही घातला होता. तो तरुणदशेंतील जो प्रबल दोष, तो होता.'

'गडमांदारण गांवीं जयधरसिंहाच्या एका सेवकाच्या घरीं एक पतिविरहित रमणी होती. तिचें सौंदर्य अलौकिक होतें, तिचा नवरा राजसेनेंत शिपाई होता, व त्यामुळें पुष्कळ दिवस त्यानें देशत्याग केला होता. ती सुंदरी शशिशेखराच्या नजरेस पडली. थोडयाच काळांत त्याच्यापासून त्या पतिविरहित स्त्रियेला गर्भ राहिला.'

'अग्नि आणि पाप हीं फार दिवस छपून राहत नाहींत. शशिशेखराचें हें दुष्कृत्य त्याचे बापाला समजलें. आपल्या पुत्राच्या हातानें दुसऱ्याच्या कुळाला लागलेला कलंक दूर करावा म्हणून शशिशेखराच्या बापानें पत्र लिहून त्या गरोदर स्त्रीच्या पतीला लौकर घरीं आणविलें, व आपल्या अपराधी पुत्राची त्यानें फार निर्भत्सना केली. बापानें केलेला तिरस्कार सहन न झाल्यामुळें शशिशेखर गांव सोडून चालता झाला.'

'शशिशेखर घर सोडून काशीस गेला. तेथें एका मोठ्या सर्व विद्यासंपन्न स्वामींच्या विद्येची ख्याति ऐकून त्यांच्यापाशीं अभ्यास करण्यास त्यानें आरंभ केला. त्याची बुद्धि अति तीक्ष्ण होती. दर्शनादिकांत तो 'अत्यंत सुपटु' झाला. ज्योतिषांत तर त्यानें 'अद्वितीय महामहोपाध्याय'

अशी पदवी मिळविली. त्यामुळें अध्यापकही अत्यंत संतुष्ट होऊन त्याला शिक्षण देत असत.'

'शशिशेखर काशींत एका शूद्र स्त्रीच्या घराशेजारीं राहत असे. त्या स्त्रीला एक नवयुवती कन्या होती. ब्राह्मणावर तिची फार भक्ति असल्यामुळें ती त्याची खाण्यापिण्याची वगैरे नीटनेटकी तयारी करून देत असे. आईबापांच्या दुष्कृत्यांवर पांघरूण घालणें हेंच त्यांच्या संततीचें कर्तव्य आहे. आपणास आणखी फोड करून काय सांगूं ? त्या शूद्र कन्येच्या पोटीं शशिशेखरापासून या अभागिनीचा जन्म झाला.'

'हळू हळू हें वर्तमान त्यांच्या अध्यापकांना कळलें. तेव्हां ते म्हणाले, ' शशिशेखरा ! आमचेसारखे संन्याशाच्या हातानें तुझ्यासारख्या मनुष्याला विद्यादान करणें आतां व्हावयाचें नाहीं; तूं आतां काशींत कोणाला आपलें तोंड न दाखवितां, चालतें होणें हेंच बरें. '

'शशिशेखरही लज्जित होऊन काशी सोडून चालता झाला.'

'माझ्या आईला आजोबांनीं दुराचारी म्हणून घरांतून काढून दिलें.'

गरीब बिचारी माझी दुःखी आई, मला घेऊन एका झोंपडींत जाऊन राहिली. ती मोलमजुरी करून पोटाला मिळवीत नसे. आमच्या आप्तांपैकीं कोणीही आमची नुसती विचारपूस देखील करीत नसत. आम्हाला माझ्या बापाचाही कांहीं समाचार कळेना. अशीं कांहीं वर्षें लोटल्यानंतर हिंवा-

ळ्यांत एके दिवशीं एक श्रीमंत पठाण बंगाल्यांतून दिल्लीस जाण्यासाठीं काशीस आला. त्याला काशींत येण्यास फार रात्र झाली असल्यामुळें रातोरात उतरण्याची कोठें सोय सांपडेना; त्याजबरोबर त्याची स्त्री व एक लहानसा मुलगा होता. तीं सर्व माझ्या आईच्या झोंपडीजवळ येऊन रातोरात जागा देण्याविषयीं तिची विनंति करूं लागलीं, आणि म्हणालीं कीं, 'या इतक्या रात्रीं या अवघ्या आळींत आम्हाला कोणी उतरण्यास जागा देत नाहीं. आतां आम्ही ह्या बाळाला घेऊन कोठें बरें जावें! ह्याला ही कडक थंडी सहन होणार नाहीं. आमचेबरोबर फार माणसेंही नाहींत. आमचा ह्या झोंपडींत सहज समावेश होण्यासारखा आहे; जागा द्याल तर मी तुमचे उपकार विसरणार नाहीं. खरोखर पाहतां ह्या पठाणाला दिल्लीस इतक्या घाईनें जाण्यांत कांहीं तसेंच विशेष कारण होतें. त्याजबरोबर फक्त एकच चाकर होता. माझी आई गरीब होती खरी, पण मोठी दयाळू होती. ...च्या लोभानें म्हणा, किंवा त्या तान्ह्या लेंकराची दया आली क..न म्हणा, माझ्या आईनें त्या पठाणाला उतरावयास ग..ा दिली. पठाण आपल्या स्त्रीपुत्रांसह रात्र काढण्या..रितां झोंपडीच्या एका कोंपऱ्यांत दिवा लावून निजून राहिला व आम्ही दुसऱ्या एका कोंपऱ्यांत निजलों.

त्याच सुमारास काशींत लहान मुलें चोरीस जाण्याचें मोठें बंड माजून राहिलें होतें. माझें वय त्या वेळीं सहा वर्षांचें होतें. हें सर्व मला आठवतें, म्हणूनच मी सांगत्यें असें नाहीं, तर माझ्या आईपासून जसें जसें मीं ऐकिलें आहे, तसें मी आपणांस लिहित्यें.

रात्रीं दिवा जळत होता; मध्यरात्र उलटून गेल्यावर एक चोर भिंत फोडून झोंपडींत येऊन पठाणाच्या मुलाला उचलून नेण्याच्या बेतांत होता, त्याचवेळीं कर्मधर्मसंयोगानें मी जागी झाल्यें आणि त्याचें तें कृत्य माझे दृष्टीस पडलें; तो चोर बाळाला घेऊन चालला असें पाहून मी मोठ्यानें किंकाळी फोडिली. ती ऐकून सर्व जागीं झालीं.

पठाणाच्या बायकोनें पाहिलें तो मुलगें अंथरुणावर नाहीं. त्यासरशी ती एकसारखी रडूं लागली. तेव्हां चोर पलंगाखालीं त्या बाळाला घेऊन लपून बसला होता. मुलगें लोळत लोळत पलंगाखालीं तर गेलें नसेलना? असें पठाणास वाटून तो पलंगाखालीं पाहूं लागला तों, त्याचे दृष्टीस ही स्वारी पडली. तेव्हां पठाणानें त्याची शेंडी धरून त्याला बाहेर काढून त्याजपासून आपलें मुलगें घेतलें. चोर हातींपायीं पडूं लागला, तेव्हां तरवारीनें फक्त त्याचे कान कापून घेऊन पठाणानें त्याला सोडून दिलें.'

इतकें पत्र वाचल्यावर उसमान एकाग्रचित्तानें विचार करूं लागला आणि नंतर त्यानें विमलेला विचारिलें, 'त्या वेळीं तुमचें दुसरें कांहीं नांव नव्हतें कां?'

विमला म्हणाली, 'होय, होतें; पण तें नांव मुसलमानी असल्यामुळें माझ्या बापानें तें पुढें बदलिलें.'

उसमान म्हणाला,' तें नांव 'महारु' कां होतें?'

विमलेला मोठें आश्चर्य वाटून ती म्हणाली, 'पण आपल्याला तें कसें कळलें?'

उसमान म्हणाला, 'मीच तो चोरलेला मुलगा.'

विमलेला मोठें आश्चर्य वाटलें. उसमान पुनः पुढें वाचूं लागला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जातेवेळीं पठाण माझ्या आईला म्हणाला, 'तुमच्या मुलीनें आमच्यावर जे उपकार केले आहेत त्याची आतांच फेड करण्यापुरतें आमच्यांत सामर्थ्य नाहीं. पण तुम्हांला जें कांहीं हवें असेल तें मला सांगून ठेवा; मी दिल्लीस जात आहें, तेथून तें पाठवून देईन. कांहीं द्रव्याची मदत हवी असल्यास ती देखील मी तेथून करीन.'

माझी आई म्हणाली, 'धन मला काय करावयाचें आहे? मी मजुरी करून आनंदानें कालक्रमणा कारित्यें, पण जर बादशहाकडे आपलें कांहीं वळण असेल तर--'

ती पुढें बोलणार तोंच पठाण म्हणाला, 'होय माझें उत्तम वळण राजदरबारीं आहे, कांहीं तेथें तुमचें काम असेल तर मात्र मी तें खात्रीनें करीन.'

त्यावर माझी आई म्हणाली, 'तर मग या मुलीच्या बापाचा पत्ता लावून मला तो कळेल असें करा.'

पठाणानें तसें करण्याविषयीं वचन दिलें, आणि तो गेला. त्यानें माझ्या आईच्या हातावर एक सुवर्णमुद्रा ठेविली, पण ती तिनें घेतली नाहीं. पठाणानें आपल्या वचनाप्रमाणें माझ्या बापाचा तपास करण्याकारितां पुष्कळ दरबारांतील लोकांना सांगितलें, पण त्या वेळीं त्यांची ती तपास लावण्याविषयींची, मेहनत सर्व व्यर्थ गेली.

या गोष्टीला चवदा वर्षें झाल्यावर, त्या दरबारांतील लोकांना माझ्या बापाचा पत्ता लागला, तेव्हां पहिल्या झा-

लेल्या हुकुमाप्रमाणें त्यांनीं माझ्या आईला पत्र पाठविलें. त्यांत एवढाच मजकूर होता कीं, 'माझा बाप दिल्लींतच राहत असून त्यानें शशिशेखर भट्टाचार्य हें आपलें नांव बदलून अभिरामस्वामी असें नवें नांव धारण केलें आहे. हें पत्र जेव्हां आलें, तेव्हां माझी आई स्वर्गीं गेली होती. फक्त मंत्राविना ज्यांचें पाणिग्रहण झालें असेल, त्यास स्वर्गारोहणाचा अधिकार असल्यास, माझ्या आईनें स्वर्गारोहण केलें असावें यांत संदेह नाहीं.'

'माझ्या बापाकडील अशी वार्ता कळल्यावर माझें मन काशीवरून उडालें. आईच्या मागें आतां या जगांत मला काय तो माझा बापच होता. तो दिल्लींत राहत असल्यामुळें मला तरी कोणासाठीं आतां काशींत राहावयाचें आहे ? असा विचार करून मी बापाकडे एकटी दिल्लीस जाण्यास निघालें. मला आलेली पाहून माझा बाप पहिल्यानें मजवर फार रागावला, पण जेव्हां मी अतिशय रडूं लागलें, तेव्हां त्यास दया आली आणि त्यानें आपल्या सेवेकरितां मला जवळ राहण्यास परवानगी दिली. त्यानें माझें मूळचें नांव 'माहरु' होतें तें बदलून 'विमला' असें ठेविलें. मी माझ्या बापाच्या घरीं नित्य नियमानें मन लावून त्याची सेवा करीत असे; त्याला जेणेंकरून संतोष होईल तसें करण्याचा मी नेहमीं यत्न करीत असे. आपली स्वार्थसिद्धि व्हावी, अथवा आपल्या बापाचें प्रेम आपल्यावर बसावें, म्हणून मी तसें करीत होत्यें असें नव्हे, तर खरोखरच बापाच्या सेवेपासून माझ्या अंतःकरणाला आनंद होत असे. बापाशिवाय मला दुसरें कोणी नव्हतें. मला वाटत असें कीं, आप-

त्या बापाच्या सेवेशिवाय दुसरें सुख या जगांत कांहींच नाहीं. माझे बाबाही माझी भक्ति पाहून म्हणा, किंवा मानव स्वभावसिद्धगुणामुळें म्हणा, मजवर फार प्रीति करूं लागले. समुद्राला मिळणाऱ्या नदीप्रमाणें स्नेह हा उत्तरोत्तर वाढतच जावयाचा! जेव्हां माझ्या सुखाच्या दिवसांचा प्रारंभ झाला, तेव्हां मजवर बाबा किती प्रेम करीत असत हें मला कळून आलें.'

---

# प्रकरण ७ वें.

## विमलेच्या पत्राची समाप्ति.

'मी पूर्वी लिहिलेंच आहे कीं, गडमांदारण गांवांतील एक गरीब स्त्री माझ्या पित्यापासून गर्भवती झाली होती. ज्याप्रमाणें माझ्या आईची तिच्या प्रारब्धानें दशा झाली होती, तशीच तिचीही स्थिति झाली होती. तिच्या पोटीं देखील एक कन्याच आली, आणि त्या कन्येच्या आईलाही थोड्याच काळांत वैधव्य प्राप्त झालें. तीही माझ्या आईप्रमाणेंच आपला व आपल्या मुलीचा निर्वाह मोलमजुरी करून करीत असे. ज्या स्वरूपाचा जो पदार्थ असेल, तशी त्याचे भोंवतालची स्थिति ठेवावी, असा ब्रह्मदेवाचा नियम नाहीं. पर्वतावरील खडकाळ प्रदेशांत देखील कोमल कुसुमलता उत्पन्न होतात; गाढ अंधःकारमय खाणींत उज्ज्वल रत्नें सांपडतात; गरिबाच्या घरांत देखील

अद्भुत सुंदर अशीं कन्यारत्नें जन्मतात. त्या विधवेच्या कन्येची गडमांदारण गांवांत सर्व स्त्रियांत अत्यंत सुंदर अशी प्रसिद्धी झाली. फार दिवस झाले म्हणजे कोणतीही गोष्ट टिकत नाहीं. ह्याच न्यायानें कांहीं वर्षांनीं विधवेचा कलंकही लयास गेला. विधवेची सुंदर कन्या जारज आहे, ही गोष्ट बहुधा सर्व लोक विसरून गेले. कोणाकोणाला तर तें माहितही नव्हतें. किल्ल्यांत तर ही गोष्ट कोणालाच माहीत नव्हती. ह्याहून अधिक काय सांगवयाचें ? त्याच सुंदरीच्या पोटीं तिलोत्तमेचा गर्भ राहिला.'

'तिलोत्तमा आपल्या मातेच्या उदरीं होती, तेव्हां या विवाहामुळेंच माझ्या आयुष्यांतील एक अतिशय महत्वाची गोष्ट घडून आली. त्याच सुमारास एके दिवशीं बाबांनीं आपल्याबरोबर आपल्या जांवयाला घरीं आणिलें व हे गृहस्थ माझे शिष्य आहेत, असें मला त्यांनीं सांगितलें; पण खरोखर ते कोण होते, हें मला त्यांचेपासूनच समजलें.'

'मी ज्या वेळेस प्राणेश्वरांना पाहिलें, तेव्हांपासूनच माझे चित्तावरून माझा अंमल उडाला. ते रोजरोज बाबांकडे येत, पुष्कळ वेळ बसत, गप्पाटप्पा मारीत, व गोष्टी सांगत; मी वेडी होऊन त्यांचा मधुर वाक्यस्रोत कर्णद्वारें पिऊं लागल्यें; कायामनानें मी त्यांची दासी झाल्यें; तेही माझा विशेषसा तिरस्कार करीत नसत. थोडक्यांत एकमेकांचीं मनें एकामेकांस कळलीं. मी त्यांच्याशीं बोलूं देखील लागलें. त्यावेळेस आमचें बोलणें म्हणजे हळूहळू व कोणाला ऐकूं न जाईल व समजेल अशा रीतीनें व्हावयाचें; त्यांचा तो अत्यंत

मोहक व गोड आवाज अजून देखील माझे कानांत गुण-गुणत आहे.'

'मी माझें मन प्राणनाथांना विनामूल्य अर्पण केलें होतें खरें, पण ह्या अशाच करण्यानें माझे आईची जी आजन्म दुर्दशा झाली होती, ती मी विसरलें नव्हतें धर्म सोडून चालणें मला अगदीं पसंत नव्हते. असें होतें तरी त्यांच्यावरील माझें प्रेम कांहीं कमी झालें नव्हतें. वीरेंद्रसिंहाला विवाह केल्याविना मी प्राप्त होणें नाहीं असें कळून आलें बाबांना तो सर्व वृत्तांत प्रत्यक्ष कळला असावा, असें एके दिवशीं त्या उभयतांचें झालेलें बोलणें मी आडून ऐकलें, त्यावरून मला कळून चुकलें.'

' माझे बाबा म्हणाले, 'मला विमलेला सोडून दुसऱ्या कोठें राहतां येत नाहीं. पण विमला जर तुझी धर्मपत्नी होत असेल तर मी तुजपाशीं राहतों. तुझा तसा अभिप्राय नसेल तर—'

'बाबांचें बोलणें पुरें झालें नाहीं तोंच मध्यें माझे स्वर्गस्थ स्वामी कांहीं राग आणून म्हणाले, 'महाराज! शूद्रकन्येशीं विवाह कसा करावा?'

' त्याचें बाबांनीं श्लेषात्मक उत्तर दिलें, 'जारज कन्येबरोबर कसा बरें विवाह झाला?'

'प्राणेश्वरांनीं थोडें खिन्न होऊन उत्तर दिलें, 'विवाह होण्यापूर्वीं ती जारज आहे असें मला ठाऊक नव्हतें. जाणूनबुजून शूद्रकन्येबरोबर कसें लग्न करावें? तशांत तुमची थोरली कन्या जारज असली तरी शूद्रकन्या नाहीं.'

'बाबा म्हणाले, 'तूं विवाह करण्यास नाकबूल आहेस, ठीक आहे. पण माझ्या येथें तुझ्या येण्याजाण्यानें विमलेचें नुकसान होण्याचा संभव आहे, म्हणून तूं आजपासून माझे घरीं येण्याचें करूं नको. तुझ्या घरीं मीच येऊन तुला भेटून जात जाईन.'

'त्यानंतर बरेच दिवस त्यांनीं आमचे घरीं येणें जाणें सोडिलें. मी चातकीप्रमाणें त्यांच्या येण्याची रोज वाट पाहत असे; पण ती आशा पुष्कळ दिवस निष्फळ होऊं लागली. त्यांचेंही मन माझ्या भेटीकरितां आतुर झालें असावें असें मला वाटतें. कारण पुन्हा ते आमच्या घरीं पहिल्याप्रमाणें येऊं जाऊं लागले; पण ह्या इतक्या अवकाशांत प्रेम हा पदार्थ काय असतो हें मात्र मला पुरें कळून चुकलें; ह्यामुळें त्यांचें पुनरपि दर्शन होऊं लागलें, तेव्हां मला पूर्वीप्रमाणें लाज वाटेनाशी झाली. बाबांच्या तें साहजिकच दृष्टोत्पत्तीस आलें. एके दिवशीं मला जवळ बोलावून ते म्हणाले, 'मी अनाश्रम व्रतधर्म स्वीकारिला आहे, म्हणून सर्वदां तुझा सहवास मला आतां घडणें नाहीं. मी ठिकठिकाणीं फिरण्यास जाणार, तेव्हां आतां तूं कोठें राहशील ?'

'मी बाबांचा वियोग होणार या भीतीनें दुःखित होऊन रडूं लागलें, व म्हणाल्यें, 'मी आपण जाल तेथें तेथें आपल्याबरोबर येईन.' इतक्यांत मला प्राणेश्वराची आठवण झाली व मी आणखी म्हणाल्यें, 'नाहीं तर काशींतल्याप्रमाणें येथेंही एकटी राहीन'

'बाबा म्हणाले, 'तसें नाहीं, विमले! यापेक्षां मी दुसरा एक उत्तम विचार काढिला आहे. मी जेव्हां येथें नसेन,

तेव्हां तुला एका चांगल्या रक्षकाच्या हवालीं करून जात जाईन. तूं आतां महाराज मानसिंहाच्या नव्या राणीच्या जवळ जाऊन रहा.'

'हें ऐकून मी रडूं लागलें, व रडत रडत बाबांना म्हणाल्यें, 'बाबा! नकाहो मला असें सोडून जाऊं!'

'तेव्हां बाबा म्हणाले, 'नाहीं, मी सध्यांच कोठें जात नाहीं. आतां तूं मानसिंहाच्या घरीं जा. मी येथें राहिलों आहे; तुला रोजच्यारोज भेटत जाईन. तूं तेथें कशी काय वागतेस, हें पाहून मग मला काय करणें तें मी करीन!'

'युवराज! मी आपल्या घरीं दासी होऊन राहिलें. अशा युक्तीनें बाबांनीं मला आपल्या जांवयाच्या दृष्टीआड केलें.'

'युवराज! मी आपल्या वडिलांच्या घरांत पुष्कळ दिवस दासी होऊन राहिलें होत्यें, पण आपली माझी ओळख नव्हती. त्या वेळीं आपलें वय फक्त दहा वर्षांचेंच होतें. आपण अंबर येथें राजवाड्यांत आपल्या आईबरोबर राहत होता. मी तुमच्या नव्या सावत्र आईबरोबर दिल्लींत राहत होत्यें. गळ्यांतील पुष्पांच्या माळेंत जशीं फुलें गुंफिलेलीं असतात, त्याप्रमाणें महाराज मानसिंहाच्या गळ्यांतील स्त्रीरत्नहारांत शेंकडों रमणी होत्या. आपल्या सर्व उपमातांना आपण ओळखितां काय? जोधपूर येथील ऊर्मिळा देवीचें आपणांस स्मरण आहे काय? ऊर्मिळाबाईच्या सद्गुणांचें आपल्यापाशीं किती तरी वर्णन करूं? त्या कधीं मला आपल्या सेवेंतील दासींप्रमाणें वागवीत नसत. त्या मला आपल्या प्राणापेक्षां जास्त प्यार अशा सख्ख्या बहिणी-

प्रमाणें मानीत असत. मोठ्या प्रयत्नानें त्यांनींच मला नाना- प्रकारच्या विद्या शिकवून चांगल्या नांवारूपास आणिलें. त्यांच्या कृपेनें मी शिल्पादि कला शिकलें; तसेंच त्यांच्या मनोरंजनार्थ नृत्यगीतही शिकलें. त्यांनीं स्वतः मला लिहि- ण्या-वाचण्यास शिकविलें, आणि आज हें वेडेंवांकडें पत्र पाठविण्यास समर्थ जी मी झालें आहे, हें आपल्या सावत्र माता उर्मिळाबाईच्या कृपेचेंच फळ होय.'

'माझ्या प्रिया ऊर्मिळाबाईच्या कृपेनें मला दुसरा एक मोठा लाभ झाला होता; तो हा कीं, त्या स्वतः ज्याप्रमाणें मजवर प्रेमदृष्टि ठेवीत, तसें महाराजांपाशींही मजविषयीं सांगत असत. संगीतादिकांत मी जी थोडी प्रवीण झालें होत्यें तें ऐकून व पाहून, महाराज मजवर फार लोभ करीत. काय असेल तें असो, ते मला आपल्या कुटुंबांतील माणसा- प्रमाणेंच लेखित असत. त्यांचा माझ्या वडिलांच्या ठिकाणीं मोठा भक्तिभाव असे; आणि माझे बाबाही सर्वदां मला भेटण्यास तेथें येत असत.'

'ऊर्मिळाबाईच्या सहवासांत मला सर्व प्रकारचें सुख अ- नुकूल असे. पण ज्या मनमोहनाकरितां एक धर्म शिवाय करून माझ्या सर्वस्त्राचा त्याग करण्यास मी सिद्ध झालें होत्यें, त्यांचें दर्शन तेथें राहून होण्यास मार्ग नसे, एवढेंच कायतें मला दुःख असे. ह्या अवकाशांत त्यांना माझें विस्मरण कां पडलें होतें? तसें कांहीं नव्हतें. युवराज! अस्मानी म्हणून कोणी दासी होती, असें आपल्याला स्मरतें काय? कदा- चित् स्मरतही असेल. तिचें माझें चांगलें सख्य होतें. तिला मी आपल्या प्राणेश्वराची खबर काढून आणण्यासाठीं पाठ-

विलें. तिनें त्यांचा तपास करून माझा निरोप त्यांना कळविला. त्यांनीं उत्तर म्हणून मला जें सर्व सांगून पाठविलें होतें तें काय लिहूं ? अस्मानीच्या हातांनीं मी त्यांना पत्र धाडिलें. त्यांनींही त्याचा जबाब लिहिला. ह्याप्रमाणें वारंवार आह्मां उभयतांचीं पत्रें जाऊं येऊं लागलीं. अशा रीतीनें अप्रत्यक्ष रीतीनें दर्शन होऊन एकमेकांचें हितगूज एकमेकांस कळूं लागलें.'

अशा रीतीनें तीन वर्षें लोटलीं. तीन वर्षांत देखील कोणाचा कोणास एक तिळभरही विसर पडला नाहीं; तेव्हां आपलें परस्परांचें परस्परांवरील प्रेम, हें केवळ शेवाळ्याच्या फुलाप्रमाणें पाण्यावरच नुस्तें तरंगत राहणारें नाहीं. पण कमळाप्रमाणें, त्याचीं मुळें खोल गेलेलीं आहेत. अशी आह्मां उभयतांची खात्री झाली. काय कारणानें तें मला सांगतां येत नाहीं, पण या वेळीं माझ्या प्राणेश्वरांचा धीर सुटला; ते अत्यंत अधीर झाले, व एके दिवशीं त्यांनीं विपरीत आचरण केलें. रात्रीं मी आपल्या निजण्याच्या खोलींत एकटीच निजले होत्यें. सुमारें मध्यरात्रीच्या सुमारास मी एकाएकीं जागीं झाल्यें आणि दिव्याच्या मंद प्रकाशांत पाहत्यें तो कोणी पुरुष माझ्या उशागती उभा आहे.

इतक्यांत ' प्राणेश्वरी ! भिऊं नको. हा तुझा दासच आहे. ' असे गोड शब्द माझ्या कानीं पडले.

मी उत्तर तें काय देणार ? तीन वर्षांनीं कोठें भेट झालेली, त्यामुळें मी सर्व गोष्टी विसरून गेलें, त्यांच्या गळ्याला मिठी मारून रडूं लागलें.

जेव्हां बोलण्याला मला स्फूर्ति आली, तेव्हां मी त्यांना विचारिलें. ' आपण येथें अंतःपुरांत कसे आलां ? '

त्यांनीं सांगितलें, ' अस्मानीला विचार; तिच्याबरोबर पाणक्या बनून मी वाड्यांत शिरकाव करून घेतला आणि इतका वेळ मी लपून बसलों होतों. '

मी विचारिलें, ' आतां ? '

ते म्हणाले, ' आतां काय ? तूं जें करशील तें. '

हें ऐकून ' आतां काय करावें ? ह्यांना कोठें लपवावें ? ' ह्या विचारांत मी पडलें. बुद्धीला काय, तिला जिकडे मन नेईल तिकडे ती जाते. मी असा विचार करीत आहेत तोंच अकस्मात् माझ्या खोलीचें दार उघडण्यांत आलें ! पाहत्यें तों महाराज मानसिंह उभे आहेत !

' उगाच पाल्हाळ करण्यांत काय फायदा आहे ? माझ्या प्राणनाथांना बंदिशाळेंत घातलें, तेव्हां ' ह्याला बादशहाकडून शिक्षा करवितों ' असें महाराज म्हणाले. त्यावेळीं माझ्या अंतःकरणाची स्थिति काय झाली असेल, ह्याची कल्पना आपणच करा, म्हणजे आपणास कळून येईल. मी रडत रडत ऊर्मिळाबाईसाहेबांच्या पायांवर लोळण घेतली; स्वतःचा अपराध कबूल केला; दोषाचें सगळें ओझें माझे शिरावर मीं घेतलें. बाबा जेव्हां मला भेटले, तेव्हां मी त्यांच्याही पायांवर लोळण घेतली. महाराजांचा त्यांच्यावर भक्तिभाव असे; त्यांना ते गुरूप्रमाणें मानीत असत; त्यांचें सांगणें महाराज खात्रीनें ऐकतील, असा विचार करून मी त्यांना म्हटलें, ' आपल्या थोरल्या कन्येचें स्मरण करा ' ! मला वाटतें कीं, बाबांचा व महाराजांचा एक विचार झाला

असावा. त्यांनीं माझ्या त्या वेळच्या रडण्याकडे लक्ष मुळींच दिलें नाहीं. ते संतापून म्हणाले, 'दुष्टे! तूं तर अगदीं लाज सोडलीस, कर काळें एकदाचें!'

ऊर्मिळाबाईसाहेबांनीं प्राणनाथांचें रक्षण व्हावें म्हणून महाराजांपाशीं पुष्कळ रदबदली केली, तेव्हां महाराज म्हणाले, 'तो विमलेशीं लग्न करील तर मी त्या चोराला सोडितों.'

मी त्यावेळीं महाराजांच्या बोलण्याचा अभिप्राय समजून गप्प राहिलें. प्राणेश्वर महाराजांच्या त्या बोलण्यानें अत्यंत रागावून म्हाणाले, 'मला सर्व जन्मभर कैदेंत रहावें लागलें तरी तें पत्करलें, मला देहांत शिक्षा दिली तरी मी ती भोगण्यास तयार आहें, पण शूद्रकन्येबरोबर कधींही लग्न करणार नाहीं. आपण हिंदु असून मला असें विपरीत वर्तन करण्यास कसें सांगतां!'

महाराज म्हणाले, 'मी आपल्या बहिणीचा शाहाजाद्या सेलिमाशीं विवाह करून दिला आहे. तेव्हां तुम्हांला ब्राह्मणाच्या कन्येशीं विवाह करण्यास सांगतों, त्यांत विपरीत तें काय?'

तथापि त्या कामीं ते राजी होईनात. उलट ते म्हाणाले, 'महाराज, होण्याची गोष्ट ती तर होऊनही गेली, आतां मला सोडा, पुनरपि मी या विमलेचें नांवही घेणार नाहीं.'

महाराज म्हणाले, 'तसें केल्यावर मग तुम्हीं जो अपराध केला त्याचें प्रायश्चित्त तुम्हाला मिळालें असें कसें होईल? तुम्ही विमलेचा त्याग केल्यावर दुसरें कोणी तिला

कलंकिनी समजून तिचा धिक्कार करून तिला स्पर्शही करणार नाहीं.'

इतकें झालें तरी त्यांचा लग्न करण्याविषयीं नकार होता तो होताच. शेवटीं बंदीशाळेंतले कष्ट असह्य झाल्यानें ते लाचार होऊन अर्धेमुर्धे कबूल झाले, आणि म्हणाले, 'विमला जर माझ्या घरांत दासीसारखी राहून मी जिवंत आहे तोंपर्यंत कोणापाशीं ती माझी धर्मपत्नी असल्याचें सांगणार नाहीं, तर मी शूद्र स्त्रीच्या पोटच्या मुलीशीं विवाह करीन, नाहीं तर, नाहीं.'

हीही गोष्ट मी आनंदानें कबूल केली. मी धन, गौरव, सेवा यांची भुकेली नव्हतें; सगळ्या ऐहिक संपत्तीपेक्षां माझे प्राणेश्वर मला जास्त होते. बाबा आणि महाराज यांचीही कबुली ह्या गोष्टीस पडली. मी दासी वेशानें राजभवनांतून माझ्या भर्त्याच्या घरांत आलें.'

अनिच्छेनें, दुसऱ्यानें भाग पाडल्यामुळें, त्यांनीं मजबरोबर लग्न केलें होतें. अशा स्थितींत लग्न केलेल्या स्त्रीवर कोण प्रेम करणार आहे बरें?

विवाह झाल्यावर ते मला विषवत् मानूं लागले. पहिलें प्रेम एकदम नाहींसें झालें. महाराज मानसिंहाकडून झालेल्या अपमानाचें वारंवार स्मरण होऊन ते माझा तिरस्कार करीत असत, तो तिरस्कारसुद्धां मला, हें एक प्रेमाचेंच लक्षण आहे, असें वाटे. अशा प्रकारें कांहीं दिवस गेले; पण ती कर्मकथा व्यर्थ सांगत बसण्याचें काय कारण आहे? मला मी कोण आहे, एवढीच ओळख आपल्याला द्यावयाची आहे; बाकीची हकीकत सांगत बसावयाचें नाहीं. काळेंकरून

मी आपल्या प्राणनाथांच्या प्रेमाचा पुनः अनुभव घेऊं लागलें. पण अंबर पतीवर त्यांचा तिरस्कार व रागहीं मात्र कांहीं कमीं झालीं नाहींत. माझें कपाळींच हें सर्व लिहिलेलें होतें! नाहीं तर हें सर्व कसें घडून येतें? असो.

'आपल्याला माझी ओळख देणें संपलें. केवळ वचनच दिलें होतें म्हणून मी आपणास हें पत्र लिहिलें आहे असें नाहीं. पुष्कळ लोक असें समजतात कीं, मी कुलधर्माचा त्याग करून गडमांदारणाच्या अधिपतीपाशीं येऊन राहिलें आहे. माझ्या मागें माझ्या नांवावरचा हा डाग आपण दूर कराल एवढीच आशा बाळगून हें पत्र लिहिलें आहे.'

'या पत्रांत केवळ माझा स्वतःचा वृत्तांत मी लिहिला आहे. जिचा समाचार कळावा म्हणून आपलें चित्त वारंवार चंचल होत असेल, तिचें नुस्तें नांव देखील मी ह्यांत लिहिलें नाहीं; पण तें नांव पृथ्वीतलावरून नाहींसे झालें आहे असें आपण समजा. तिलोत्तमा म्हणून जी कोणी होती तिला विसरून जा.–'

'पत्र वाचण्याचें संपतांच उसमान म्हणाला, 'मासाहेब! आपण माझे प्राण रक्षण केलें आहां, मी त्याचा कांहीं तरी उतराई झाल्याशिवाय राहणार नाहीं.'

विमला दीर्घ श्वास सोडून म्हणाली, 'आतां पृथ्वीतलावर मला उपकार तो कशाचा करून घ्यावयाचा आहे? तुम्ही मजवर काय उपकार करणार? उपकार करण्याची इच्छाच असेल तर एक उपकार–'

उसमान म्हणाला, ‘ मी तेवढा करीन. ’

विमलेचे डोळे प्रोज्ज्वल झाले. ती म्हणाली, ‘ उसमान! आपण काय बोलतां? या माझ्या होरपळून गेलेल्या हृदयाला नका आतां फसवूं बरें! ’

उसमान हातांतील अंगठी काढून म्हणाला, ‘ ही आगठी घ्या; एक दोन दिवसांत कांहीं साधेल असें नाहीं. कतलुखानाचा वाढदिवस आतां जवळ आला आहे, त्या दिवशीं येथें मोठी धामधूम उडेल, रखवालदार लोक मौजमारण्यांत गुंग होऊन जातील, त्या दिवशीं मी आपणांस सोडवीन. आपण त्या दिवशीं रात्रीं अंतःपुरांतल्या दरवाजावर या; तेथें आपणांस जो असलीच दुसरी अंगठी दाखवील त्याजबरोबर बाहेर पडा. आपली बिन हरकत सुटका होईल, अशी माझी खात्री आहे. तरी पण जशी ईश्वरेच्छा. ’

विमला म्हणाली, ‘ जगदीश्वर आपणांस उदंड दीर्घायुषी करो. जास्त काय बोलूं! ’

विमलेचा गळा दाटून आला, त्यामुळें तिच्यानें पुढें बोलवेना.

विमला उसमानाला आशीर्वाद देऊन त्याचा निरोप घेऊन निघते आहे तोंच तो म्हणाला, ‘ आणखी मी आपणास एक गोष्ट सांगतों, ती पक्की लक्षांत ठेवा. आपण एकट्याच या. आपल्याबरोबर कोणी सोबतीण आल्यास आपलें कार्य सिद्धीस न जातां उलटें दुसरें कांहीं संकट ओढवेल! ’

हें ऐकून उसमानानें तिलोत्तमेला बरोबर घेण्याची मनाई केली आहे, हें विमला समजली व आपल्या मनाशीं म्हणाली. ‘ ठीक, दोघीजणी नाहीं, तर निदान एकटी तिलोत्तमा तर जाईल. ’

आणि तेथून निघाली.

---

## प्रणरण ८ वें.

---

### आरोग्य.

प्रिय वाचकहो ! हे दिवस जातील. तुम्हांला वाटेल तें करा, हे दिवस जातील, राहणार नाहींत. ज्या स्थितींत तुम्हांला राहावयाचें असेल त्या स्थितींत राहा, दिवस हे जातील, राहाणार नाहींत. प्रवाशा ! भयंकर तुफानाच्या झपाट्यांत का तूं सांपडला आहेस ? तुझ्या मस्तकावर मेघांचा गडगडाट का होऊन राहिला आहे ? तुझ्यावर पावसाच्या सरीवर सरी का कोसळत आहेत ? भिजून चिंब का झाला आहेस ? तुझ्या उघड्या अंगावर गारा का येऊन तडातड आपटताहेत ? तुला आश्रय का कोठें मिळत नाहीं ? क्षणभर धैर्य धर, हेही दिवस जातील, राहाणार नाहींत. थोडा वेळ वाट पहा; मेघांनीं व्यापून टाकिलेलें हें आकाश स्वच्छ होईल व पुनः ऊन पडेल. उद्यांपर्यंत वाट पहा

कोणाचे दिवस जात नाहींत ? कोणाचें दुःख कायमचें करावें म्हणून दिवस का बसून राहिले आहेत ? मग अशी ही माथेफोड कां ?

कोणाचे दिवस गेले नाहींत? आमची तिलोत्तमा जमिनीवर धुळींत लोळत पडली आहे, तिचेही दिवस जात आहेत.

विमलेच्या हृदयपद्मांत प्रतिहिंसारूपी काळसर्प येऊन राहून तो तिचें शरीर आपल्या विषानें जर्जर करून टाकित आहे, आणि त्याचा दंश तर एक क्षणभरदेखील मनुष्याच्यानें सहन करवत नाहीं; एका दिवसांत असे क्षण किती बरें आहेत? तथापि विमलेचे दिवस जावयाचे का राहिले आहेत?

कतलुखानाला मसमुद मिळाली आहे; त्यानें आपले शत्रु पादाक्रांत केले आहेत; त्याचे दिवस सुखानें जात आहेत. त्याचेही दिवस जातच आहेत, राहात नाहींत.

जगत्सिंह अंथरुणाला खिळून पडला आहे; आजारी मनुष्याला दिवस किती मोठा वाटतो, हें कोणाला माहीत का नाहीं? तथापि त्याचेही हे दिवस गेलेच!

असे पुष्कळ दिवस गेले. दिवसेंदिवस जगत्सिंहाची प्रकृति सुधारत चालली. एकदांचा यमाच्या दाढेंतून सुटून आल्यावर राजपुत्र दिवसेंदिवस बरा होत चालला. पहिल्यानें त्याची ग्लानि गेली, नंतर त्याला भूक लागूं लागली, थोडेंबहुत तो खाऊं लागला, त्यामुळें त्याला थोडीशी शक्ति येऊं लागली, व अखेरीस विचारांनीं त्याला आपल्या ताब्यांत घेतलें.

पहिला विचार—तिलोत्तमा कोठें असावी? जसजसा राजपुत्र बरा होत चालला, तसतसा अधिक अधिक व्याकूळ होऊन तो सर्वांना तिच्याविषयीं विचारूं लागला. कोणीही समाधानकारक उत्तर त्याला देईना. आयेषेला माहिती

नव्हती, उसमान सांगेना. दासदासींना एक तर ठाऊक नसावें, किंवा त्यांना माहीत असून त्या सांगत नव्हत्या. त्यामुळें जसें एखाद्याला कांट्यांवर घालावें म्हणजे त्याची स्थिति होते, त्याप्रमाणें तो विव्हळ होऊं लागला.

दुसरा विचार—स्वतःचे भविष्याविषयीं. 'काय होईल' या प्रश्नाचा जबाब कोणास विचार केल्याशिवाय देतां येणार आहे काय? राजपुत्रानें पाहिलें कीं, आपण बंदिवान आहों. करुणहृदयीं उसमान आणि आयेषा यांच्या कृपेनेंच फक्त बंदिशाळेऐवजीं उत्तम शृंगारलेल्या आणि सुवासित अशा खोलींत आपण सुरक्षित आहों. दासदासी आपली सेवा करीत आहेत; ज्या वस्तूची आपणास गरज लागते ती वस्तु तिची इच्छा व्यक्त करण्यापूर्वींच आपणांस मिळत आहे; आयेषा सख्ख्या बहिणीपेक्षां जास्ती ममतेनें आपली बरदास्त ठेवीत आहे, तरी पण दरवाजावर पहारा आहे; सोन्याच्या पिंजऱ्यांत, उत्तम खाणें मिळत असलेल्या पक्ष्याप्रमाणें आपण बंदींत आहों. आपली सुटका केव्हां तरी होईल कां? सुटका होण्याचा कांहीं संभव तरी आहे काय? आपलें सर्व लष्कर कोठें आहे? सेनापति नसल्यामुळें त्यांची काय दशा झाली असेल?

तिसरा विचार—आयेषेसंबंधीं. ही चमत्कार करावयास लावणारी, परहिताची केवळ मूर्तीच, या मृन्मय पृथ्वीवर काय म्हणून बरें अवतरली असावी?

आयेषा कधीं विसावा घेत नसे, कधीं थकत नसे, किंवा कधीं कंटाळाही करीत नसे, हें जगत्सिंह रोज पाहत असे. रात्रंदिवस ती एकसारखी त्याची शुश्रूषा करीत असे.

जोंपावेतों त्याची प्रकृति सुधारली नव्हती, तोंपावेतों, ती जेव्हां रोजच्यारोज त्याच्या शुश्रूषेकरितां त्याच्या खोलींत येई, तेव्हां त्या सुप्रभातीं तिचें तें बालसूर्याप्रमाणें स्वरूप, तिच्या हातांतली अत्यंत सुवासिक अशा ताजा फुलांची माळ, तिचें तें अत्यंत मनोहर तरी पण निःशब्दपणें पावलें टाकीत चालणें, हीं पाहून त्याला उषादेवीची आठवण होत असे. ती एकदां सकाळीं आली ह्मणजे थेट स्नानादि कृत्यांची अगदीं वेळ होई तोंपर्यंत त्याच्या जवळून हालत नसे व एकदां आहारादि आटोपलें ह्मणजे तावडतोब त्याच्याजवळ जी येऊन बसे. ती अत्यंत जरूरीचें काम पडलें तर मात्र उठत असे. रात्रीं तिच्या आईकडून दासी बोलावणें येईतोंपर्यंत, ती त्याला तिळभरसुद्धां अंतर पडूं देत नसे.

आजारी होऊन अंथरुणावर कोण बरें पडत नाहीं? पण ज्या कोणा आजारी मनुष्याच्या अंथरुणावर बसून,एखादी अत्यंत मनोहर स्त्री त्याला पंख्यानें वारा घालीत असेल,तेव्हां मात्र त्याला खचीत वाटत असेल कीं, आजारीपणांतही सुख आहे.

वाचकहो! जगत्सिंहाला कसें वाटत असेल, याची कल्पना तुम्हांला करावयाची आहे काय? निजा तर मग त्या बिछान्यावर. पण मनांतल्या मनांत हो! आतां त्याला जखमांचें जें दुःख होत होतें तें तुह्मांला होत आहे, अशी कल्पना करा. आपल्याला शत्रूनें बंदिवान करून ठेविलें आहे असें मनांत आणा. नंतर ती सुवासित, व उत्तम शृंगारलेली खोली मनांत आणा. तुह्मी बिछान्यावर पडून दाराकडे पाहात आहां अशी कल्पना करा. अकस्मात्

तुमचें मुख प्रफुल्लित होऊन गेलें आहे; कारण या शत्रुपुरींत जी तुमच्या सख्ख्या बहिणीप्रमाणें तुमचा समाचार घेते ती येत आहे. ती पूर्ण विकसित पद्माप्रमाणें दिसत आहे. निजलेले आहां तसेंच निजून तिच्याकडे एकसारखी दृष्टि लावून पहा! अहाहा! काय हें तिचें स्वरूप! ती थोडीशी उंच आहे खरी, पण तिचा बांधा त्या उंचीला शोभे असा आहे! साक्षात् महामहिम देवीप्रमाणें तिचें स्वरूप आहे! जन्मतः हिच्या ताब्यांत लोकांनीं राहावें असेंच हिचें हें स्वरूप आहे! अहाहा! तिचीं पावलें किती तरी मनोहर पडत आहेत! गजेंद्रगमन तुह्मी पाहिलें आहेना, तें कसें असतें? मरालगमन कसें असतें? हीं दोन्हीं गमनें तुह्मांला प्रत्यक्ष पाहावयाचीं आहेत काय? तर पहा! तें तिचें चालणें; सुराचा लय तर वाद्यांत होतो, पण ह्या पावलें टाकण्याच्या आवाजाचा लय तर तुमच्या हृदयांत होत आहे! तिच्या हातांतली ही फुलांची माळ पहा; तिच्या हातांच्या तेजापुढें फुलें फिकीं पडून गेलीं, तिकडे तुमची नजर गेली आहे काय? तिच्या कंठप्रभेपुढें गळ्यांतील सुवर्णहार कसा निष्प्रभ होऊन गेला आहे, हेंही तुह्मांला दिसतें आहेना? तुमच्या डोळ्यांच्या पापण्या कां हालत नाहींत? तिच्या मानेचा बांक किती सुंदर आहे, हें तुमच्या लक्षांत आलें आहे काय? तिच्या त्या संगमरवरी दगडाप्रमाणें शुभ्र मानेवर काळ्या व दाट कुरळ्या केसांच्या बटा कशा पडल्या आहेत? व त्यांच्याच जवळ ते कानांतले डूल कसे बरें हालताहेत, हे तुह्मी पाहत आहांना? तिच्या मस्तकाला फारच थोडासा बांक तुह्मांला दिसतो आहे कां? तो तुह्मांला तिचें डोकें तुमच्यापासून किंचित् लांब आहे म्हणून दिसत

आहे. इतकी टक लावून काय पाहत अहां? आयेषा तुम्हांला म्हणेल तरी काय? असो.

जितके दिवस जगत्सिहाची आजारीपणांत अशा रीतीनें शुश्रूषा करणें अवश्य होतें, तितके दिवस आयेषा दररोज या रीतीनें ती करीत होती. राजपुत्र जसजसा बरा होऊं लागला, तसतसें त्याजकडे येण्याचें आयेषेनें कमी मान ठेविलें, आणि तो अगदीं चांगला बरा झाल्यावर तर तिनें येण्याचें अगदींच बंद केलें. ती महिना पंधरा दिवसांनीं एखादवेळीं त्याचेकडे येई व तें देखील उसमान असेल तेव्हां. थंडीनें कांकडलेला मनुष्य जसा ऊन खाण्याकरितां उन्हांत बसतो, व सूर्याच्या गतीनें तें जसें जसें त्याला सोडून पलीकडे जातें, त्याचप्रमाणें जसें जसें जगत्सिहाचें आरोग्य होऊं लागलें, तसतशी आयेषा त्याच्यापासून दूर दूर होऊं लागली.

एके दिवशीं दोनप्रहरीं जगत्सिह वाड्यांतील खिडकींत उभा राहून किल्ल्याच्या बाहेर पहात होता. पुष्कळ लोक बिन हरकत आपआपल्या इच्छेप्रमाणें कामकाजांच्या ठिकाणीं जात येत होते, तें पाहून राजपुत्र दुःखित होऊन त्यांची आपल्या स्थितीशीं तुलना करीत होता. इतक्यांत एका ठिकाणीं कित्येक लोक एका माणसाला अथवा कांहीं वस्तुला घेरा घालून उभे आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. ही मंडळी कांहीं गडबड न करितां कांहीं लक्षपूर्वक ऐकत आहेत असें त्याला वाटलें. त्या गर्दीत मध्यें कोणी मनुष्य आहे किंवा कांहीं वस्तु आहे, हें त्याला तेथून दिसेना. त्यामुळें त्याच्या मनांत मोठी जिज्ञासा उत्पन्न झाली. कांहीं वेळानें

कित्येक ऐकणारे तेथून गेले, तेव्हां त्याची जिज्ञासा पूर्ण झाली. त्यानें पाहिलें तों त्या गर्दीच्या मध्यभागीं एक मनुष्य एखाद्या पोथीप्रमाणें दिसणाऱ्या कांहीं कागदांवरून कांहीं वाचून दाखवीत होता. त्या वाचणाराचा आकार पाहून राजपुत्राला मोठें आश्चर्य वाटलें. त्याला मनुष्य म्हटलें असतें तरी शोभलें असतें, किंवा वीज पडून पानें जळून गेलेला ताडाचा सोट म्हटलें असतें, तरी चाललें असतें. सरासरी तो उंचीला तितकाच होता व त्याचें प्रस्तही तसेंच होतें. ताडाच्या झाडाला त्याच्या प्रमाणें मोठें नाक मात्र नव्हतें. बाकी त्याचा आकार व हालचाल हीं ताडाच्या झाडाप्रमाणें होतीं. पोथी वाचतां वाचतां तो जे हातवारे करी, डोकें हालवी, व नाक वर खालीं करी, तें सर्व तो अगदीं आश्चर्यचकित होऊन पाहत होता; इतक्यांत उसमान खोलींत आला.

परस्परांचें अभिवादन झाल्यावर उसमानानें जगत्सिंहाला 'आपण खिडकींतून इतक्या एकाग्रचित्तानें काय पाहत होतां ?' असें विचारिलें.

जगत्सिंह म्हणाला, 'कांहीं नाहीं. एका जातीच्या सरळशा लांकडाप्रमाणें कांहींसें दिसत आहे, त्याचेकडे पाहत होतों.'

राजपुत्रानें दाखविलेल्या त्या वस्तूकडे पाहून उसमानानें त्यास विचारिलें, 'राजपुत्र, काय, आपण ह्याला पूर्वी कधीं पाहिलें नव्हतें ?'

राजपुत्र म्हणाला, 'नाहीं.'

उसमान म्हणाला, 'हा आपला ब्राह्मण आहे. गप्पा-गोष्टी सांगण्यांत मोठा पटाईत आहे. मी ह्याला गडमांदारणांत पाहिलें होतें.'

हें ऐकून राजकुमार 'हा जर गडमांदारणांतला असला तर ह्याला कांहीं तरी तिलोत्तमेची बातमी लागली असावी' ह्या विचारांत अगदीं गर्क झाला व त्यानें उसमानाला विचारिलें. 'खानसाहेब याचें नांव काय?'

उसमानानें विचार करून उत्तर दिलें, 'याचें नांव कांहीं बिकटसें आहे, एकदम तोंडांत येत नाहीं. गनपत? नाहीं;–गनपत–गजपत–नाहीं; गजपत काय?'

तें ऐकून जगत्सिंह म्हणाला, 'काय गजपत? हें इकडील नांव नव्हे. तेंच जर असेल तर तो कोणी बंगाली असावा.'

उसमान सांगूं लागला, 'बंगाली तर खराच, त्यास भट्टाचार्य म्हणतात. व त्याला एक पदवी आहे, 'इलम–इलम' असें कांहीं आहे?'

जगत्सिंह म्हणाला, 'खानसाहेब, बंगाली पदव्यांत 'इलम' शब्द वापरण्यांत येत नाहीं. इलम शब्दाला बंगालींत विद्या म्हणतात. विद्याभूषण अथवा विद्यावागीश असेल.'

उसमान म्हणाला, 'हां हां, विद्या एक तर खरेंच, पण बंगाली भाषेंत हत्तीला काय म्हणतात?'

जगत्सिंह म्हणाला, 'हस्ती.'

उसमानानें विचारिलें, 'दुसरें काय?'

जगत्सिंह म्हणाला, 'करी, दंती, वारण, नाग, गज–'

उसमान म्हणाला, 'हां, आतां आठवलें, त्याचें नांव गजपति विद्यादिग्गज आहे.'

जगत्सिंह म्हणाला, 'विद्यादिग्गज! ही तर चमत्कारीक पदवी आहे बोवा! जसें नांव तशी पदवी आहे. याच्याशीं गप्पा मारण्यांत मोठी मजा येईल असें मला वाटतें.'

उसमानानें गजपतीचें थोडेसें बोलणें ऐकलें होतें. त्याच्याशीं हा जरी बोलला तरी त्यांत कांहीं नुकसान नाहीं, असा विचार करून मग तो म्हणाला, 'ठीक आहे, त्याला आपण बोलावून आणूं.'

असें बोलून जवळच्या बाहेरील खोलींत जाऊन उसमानानें एका चाकराला गजपतीला बोलावून घेऊन येण्यास सांगितलें.

---

## प्रकरण ९ वें.

---

### दिग्गजसंवाद.

चाकराबरोबर गजपति विद्यादिग्गज खोलींत आला. राजकुमारानें त्याला विचारिलें, 'आपण ब्राह्मण आहांत काय?'

दिग्गज हांतवारे करीत म्हणाला,

" यावत् मेरौ स्थिता देवा यावत् गंगा महीतले ।
असारे खलु संसारे सारं श्वशुरमंदिरम् ॥ "

जगत्सिहानें हंसूं आवरून त्याला प्रणाम केला. गजपतीनें त्याला आशीर्वाद दिला कीं, 'खोदाखान बाबूजींचा चांगला सांभाळ करो!'

राजपुत्र म्हणाला, 'महाशय, मी मुसलमान नाहीं. मी हिंदु आहें.'

दिग्गजाला वाटलें कीं, 'हा बेटा यवन असून मला ठकवीत आहे. याच्या मनांत कांहीं तरी हेतु असावा नाहीं तर यानें कां बरें बोलाविलें असावें?' तो भयानें अगदीं घाबरें तोंड करून म्हणाला, 'खान बाबूजी, मी आपल्याला ओळखतों. आपलाच शेर मी खातों आहें. आपण मला कांहीं सांगूं नका. मी आपल्या चरणांचा दास आहें.'

जगत्सिंहाला वाटलें कीं, हें एक मोठें लचांडच झालें आहे. तो म्हणाला, 'महाशय, आपण ब्राह्मण आहां; मी रजपूत आहें. आपण असें बोलूं नये. आपलें नांव गजपति विद्यादिग्गज आहेना?'

हें ऐकून दिग्गज मनांत म्हणाला,' अरेरे! नांवसुद्धां याला ठाऊक आहे. काय संकट ओढवलें हें!' तो हात जोडून बोलूं लागला, 'शेखजी माफ करा! मी गरीब आहें! आपल्या पायां पडतों.'

हा ब्राह्मण भयभीत झाला आहे, तेव्हां आतां त्याच्या हातून आपलें कांहींही कार्य सिद्ध होणें नाहीं, असें जगत्सिंहाला कळून आलें; आणि विषयांतर करावें म्हणून तो म्हणाला, 'आपल्या हातीं ती पोथी कसली आहे?'

जगत्सिंह म्हणाला, 'ब्राम्हणाच्या हातांत आणि माणिकपिराची पोथी?'

दिग्गज म्हणाला, 'मी मुळचा ब्राह्मणच होतों, पण आतां नाहीं.'

हें ऐकून राजपुत्राला अमळ विस्मय वाटला, तसाच रागही पण आला. तो म्हणाला,' असें कसें ? तुम्ही पूर्वी गडमांदारणावर राहत नव्हता कां ? '

दिग्गजानें विचार केला कीं,' आतां मात्र आपलीं पुरीं शंभर वर्षें भरलीं. वीरेंद्रसिंहाच्या किल्ल्यांत मी राहत होतों, हें देखील ह्याला माहीत आहे. आतां वीरेंद्राची जी गत झाली, तीच निःसंशय आपली होणार.' तो गर्भगळीत होऊन रडूं लागला.

तेव्हां राजपुत्रानें त्याला विचारिलें, 'आपण असें काय करितां ? '

दिग्गज हात जोडीत जोडीत बोलूं लागला ! 'खानसाहेब मला मारूं नका बाबा ! मीं तुमचा गुलाम आहे. बाबा ! मीं तुमचा गुलाम आहे बाबा ! '

राजपुत्र म्हणाला, ' तुला वेडबीड तर नाहींना लागलें?'

दिग्गजानें प्रत्युत्तर केलें, ' नाहीं बाबा! मी तुमचा दास आहें बाबा ! मी तुमचा आहें बाबा ! '

जगत्सिंह ब्राह्मणाला धीर यावा म्हणून म्हणाला, ' तुम्हीं कांहीं चिंता करूं नका. ती माणिकपिराची तेवढी पोथी तर वाचा पाहूं. माझी ऐकण्याची फार इच्छा आहे.'

ब्राह्मण माणिकपिराची ती पोथी घेऊन हेल काढून वाचूं लागला. शाळेंतल्या पंतोजींनीं कान पिळून हातावर दिल्यानंतर जशीं पोरें गातात, तसें दिग्गज पंडित गाऊं लागले.

थोड्या वेळानें राजपुत्रानें पुन्हा विचारिलें, ' तुम्हीं ब्राह्मण असून माणिकपिराची पोथी कां बरें वाचितां ? '

आपला सूर बंद करून ब्राह्मणानें उत्तर दिलें, ' मी मुसलमान झालों आहें. '

जगत्सिहानें ब्राह्मणाला विचारिलें, ' तें कसें काय? '

गजपति म्हणाला, ' मुसलमान गडावर आले तेव्हां मला म्हणूं लागले कीं, ये, ब्राह्मणा तुझी जात बुडवूं. असें म्हणून त्यांनीं मला पकडिलें, आणि मुरगीचा पालो* शिजवून तो मजकडून खावविला. '

राजपुत्रानें विचारलें, ' पालो तें काय ?

दिग्गज म्हणाला, ' उन्हांत वाळविलेले व साजूक तुपांत शिजविलेले तांदूळ.'

तो पदार्थ काय असावा हें राजपुत्र समजला आणि म्हणाला, ' मग काय झालें ? '

दिग्गज म्हणाला, ' त्यानंतर मला कल्मी शिकविली. '

राजपुत्रानें विचारलें, ' कल्मी शिकविली आणि मग? '

दिग्गज म्हणाला, ' आणि मग मला म्हणाले, तूं आतां मुसलमान झालास; आणि तेव्हांपासून मी मुसलमान झालों.

* ह्या भागांत आपल्याला दिग्गज पंडितांची शेवटची भेट घेणें आहे. ते मोठे वैय्याकरण व स्मार्त होते; ह्याची प्रिय वाचकहो, तुह्मांला आठवण असेलच. त्यांचे खोदाखान, खानबाबु इत्यादि व्याकरणशुद्ध प्रयोग व पुलाव्याच्या ठिकाणी पालो ( कण्हेरी ) व कल्मा ( मुसलमानीं धर्मपुस्तक ) ह्या शद्बाबद्दल कल्मी ( चढणी ) हा शद्ब घालणें, ह्यावरून त्यांचे अद्वितीय वैयाकरण व भाषाज्ञान धर्मांतर झाल्यावरही कायम होतें असें आपणांस मानण्यास कांहीं एक हरकत नाहीं; त्याचप्रमाणें त्यांचें मार्मिक पीरपुराण हेंही त्यांचीं स्मृतिवरील प्रीति उत्तम रीतीनें व्यक्त करित. भा. क.

राजपुत्रानें त्यावेळीं विचारलें, ‘ बाकीच्यांचें काय झालें? ’

दिग्गजानें उत्तर दिलें, ‘ दुसरे आणखी सगळे ब्राह्मण असेच मुसलमान झाले आहेत ! ’

राजपुत्र उसमानकडे पाहूं लागला. उसमान त्याचा तो मुग्ध तिरस्कार पाहून म्हणाला, ‘राजपुत्रा, त्यांत कसला दोष ? मुसलमानी मताप्रमाणें महंमदी हाच खरा धर्म आहे; आणि म्हणूनच बळानें असो कीं छळानें असो, सत्य धर्मप्रचार करण्यांत आमच्या मतें अधर्म मुळींच नसून उलटा धर्मच आहे. ’

राजपुत्र त्याला कांहीं उत्तर न देतां विद्यादिग्गजाला म्हणाला, ‘ विद्यादिग्गज महाशय ! ’

दिग्गज म्हणाला, ‘ आतां मी आपल्याला शेखदिग्गज म्हणवीत असतों ! ’

राजपुत्र म्हणाला, ‘ ठीक, शेखजी, गडावरील दुसरा कांहीं समाचार माहीत आहे का ? ’

उसमान राजपुत्राचा उद्देश समजून उद्विग्न झाला.

दिग्गज म्हणाला, ‘ आणखी अभिरामस्वामी पळून गेले. ’

राजपुत्र मनांत म्हणाला कीं, ‘ या मूर्खाला अगदीं उघड विचारल्याशिवाय कांहीं जबाब मिळणें नाहीं. तेव्हां त्यानें उघड विचारिलें, ‘ वीरेंद्राची काय हकीकत आहे ?’

ब्राह्मण म्हणाला, ‘ नवाब कतलुखानांनीं त्याला कधींच छाटून टाकिलें आहे. ’

राजपुत्राचा चेहरा लाल झाला, त्यानें उसमानला विचारिलें, 'हा काय सांगतो ? हा ब्राह्मण कांहीं खोटें सांगतो आहे काय ?'

उसमान गंभीर स्वरानें म्हणाला, 'नबाबांनीं न्याय करून त्याला राजद्रोही ठरवून देहांत शिक्षा दिली आहे.'

राजपुत्राच्या डोळ्यांतून जणूं आगीच्या ठिणग्या पडताआहेत कीं काय, असें भासूं लागलें. त्यानें उसमानला विचारिलें, 'आपल्याला मी आणखी एक विनंति करूं का ? या कामीं आपलें मत होतें काय ?'

उसमान म्हणाला, 'माझ्या मताविरुद्ध हें काम झालें आहे.'

राजपुत्र बराच वेळपर्यंत स्तब्ध होऊन बसला; उसमान संधि सांपडली असें पाहून दिग्गजाला म्हणाला, 'आपल्याला आतां रजा आहे आपण जावें.'

दिग्गज निघणार तों राजपुत्रानें त्याचा हात धरून त्याला खालीं बसविलें आणि विचारिलें, 'आणखी एक विचारावयाचें आहे, विमला कोठें आहे ?'

ब्राह्मणानें दीर्घ उसासा टाकिला व रडत रडत तो म्हणाला, 'विमला नबाबाची उपपत्नी झाली आहे.'

राजपुत्र विजेसारखे डोळे करून उसमानकडे पाहून म्हणाला, 'काय हें खरें आहे ?'

उसमान त्याचा कांहींही जबाब न देतां ब्राह्मणाला म्हणाला, 'तुम्ही हें काय करितां ? आपले मुकाट्यानें येथून चालते व्हा ना कसे !'

राजपुत्रानें ब्राह्मणाचा हात गच्च धरून ठेवला होता त्यामुळें त्यास जातां येईना. राजपुत्र म्हणाला, ‘ एक क्षण-भर थांबा, आतां एकच गोष्ट विचारावयाची आहे. ’ असें बोलतां बोलतां त्याच्या लाल झालेल्या डोळ्यांतून आतां दुप्पट मोठमोठाल्या अग्नीच्या ठिणग्या पडत आहेत असें दिसूं लागलें व तो पुनः म्हणाला, ‘ आतां एकच गोष्ट विचारा-वयाची राहिली आहे. तिलोत्तमा कोठें आहे ? ’

ब्राह्मणानें उत्तर दिलें, ‘ तिलोत्तमा देखील नबाबाची उपपत्नीच झाली आहे. दासदासी घेऊन त्या आनंदांत आहेत. ’

राजपुत्रानें हें ऐकून ब्राह्मणाचा हात इतक्या जोरानें हिसडून टाकिला कीं, बिचारा ब्राह्मण पडतां पडतां राहिला.

उसमान शरमून मोठ्या विनयानें म्हणाला, ‘ मी फक्त सेनापति आहें. ’

राजपुत्र म्हणाला, ‘ हो, हो, कळलें; तुम्ही सैतानाचे सेनापति आहां तें. ’

---

## प्रकरण १० वें.

### प्रतिमाविसर्जन.

कांहीं केल्यानें जगत्सिंहाला त्या रात्रीं झोंप येईना. बिछान्यावर निखारे पसरले आहेत व हृदयांत अग्नीचा भडका होऊन राहिला आहे, असें त्याला वाटूं लागलें. जी

तिलोत्तमा मेली असती तर त्याला हें जगत् शून्यवत् झालें असतें, तीच तिलोत्तमा प्राणत्याग केल्याशिवाय अजून कशी जिवंत राहिली आहे, ह्याजबद्दल त्याला फार खेद होऊं लागला.

हें काय? तिलोत्तमा मेली कशी नाहीं? जो कुसुमसुकुमार देह माधुर्यमय कोमल प्रकाशानें वेष्टित आहे, जो देह, जिकडे जिकडे जगत्सिंहाची दृष्टि जात आहे तिकडे तिकडे मानसिक दृष्टीनें पहात आहे, तो देह स्मशानमृत्तिका होईल काय? या पृथ्वींत, ह्या निस्सीम पृथ्वींत, कोठेंही त्या देहाचें चिन्ह देखील राहणार नाहीं काय? ज्या वेळीं असे विचार त्याच्या मनांत येऊं लागले, त्यावेळीं त्याच्या नेत्रांतून अश्रूंचे लोट वाहूं लागले; इतक्यांत आणखी त्या दुरात्म्या कतलुखानाचें विहारमंदिर त्याच्या हृदयांत विजेसारखें एकदम उभें राहिलें. तो कुसुमसुकुमार देह, त्या पापी पठाणाच्या मांडीवर आहे असें त्यास दिसलें, आणि पुनः दारुणाग्नीनें त्याचें हृदय भडकूं लागलें.

जी तिलोत्तमा त्याची हृदयमंदिराधिष्ठात्री प्रत्यक्ष देवी मूर्ति! ती तिलोत्तमा आणि पठाणाच्या घरांतना! तीच तिलोत्तमा कतलुखानाची उपपत्नी होऊन राहिली आहे काय? आतां त्या मूर्तीची कोणी तरी रजपूत आराधना करील काय? ती प्रतिमा आपल्या हातानें स्थानच्युत करण्याचा संकोच करणें रजपूत कुळाला शोभेल काय?

जी प्रतिमा आमच्या जगत्सिंहाच्या हृदयांत अतिशय खोल जाऊन बसली होती; ती तेथून काढणें ह्मणजे ती काढतांना त्याचें हृदय देखील विदीर्ण होऊन जाणार! कोणत्या रीतीनें

यावज्जीव त्या मोहिनीमूर्तीचें स्मरण होणार नाहीं असें करावें बरें ? पण तें होणार कसें ? जोंपर्यंत बुद्धि ही आहे, जोंपर्यंत अस्थि, मज्जा, शोणित यांनीं बनलेला हा देह आहे, तोंपर्यंत ती हृदयेश्वरी होऊन त्या हृदयांत विराजमान होऊन राहणारच राहणार ! '

या असल्या कष्टकर विचारांनीं राजपुत्राच्या मनाची स्थिरता राहणें, हें तर बाजूलाच राहिलें; पण त्याच्या बुद्धीला मात्र भ्रंश होऊं लागला व त्याची स्मरणशक्ति वाटेल तिकडे भडकूं लागली. सगळी रात्र गेली तरी राजपुत्र दोहों हातांनीं डोकें धरून तसाच बसला होता; त्याचें देहभान सुटत चाललें होतें; व त्यास विचार करण्याची शक्ति मुळींच राहिली नव्हती.

एकाच अंगावर जगत्सिंह बराच वेळ बसून राहिला असल्यामुळें त्याच्या शरीरास वेदना होऊं लागली. मानसिक दुःख फार झाल्यामुळें तापाच्या रूपानें त्याचा संताप बाहेर पडूं लागला; अंगाची अतिशय तलखी होऊं लागल्यामुळें जगत्सिंह खिडकीपाशीं जाऊन उभा राहिला; तेथें पहांटच्या रात्रीचा थंडगार वारा त्याच्या कपाळाला लागूं लागला.

ती रात्र काळोखी होती; आकाश अभ्राच्छादित होतें; तारागण लोपून गेला होता मधून मधून झपाट्यानें जाणाऱ्या एखाद्या ढगाच्या आडून कोठें एखादें नक्षत्र निस्तेजसें दृष्टीस पडत होतें, लांब लांब असलेले वृक्ष अंधःकारांत एकांत एक मिसळून जाऊन त्यांची एक तमोमय भिंत आकाशतलाला आधार देण्यासाठींच उभी केली आहे कीं काय, असा भास होत होता; नजीकच्या प्रत्येक झाडावर काजवे

हिऱ्याच्या चूर्णाप्रमाणें चमकून राहिले होते. समोरच्या एका तलावांत आकाश, वृक्ष, इत्यादिकांचें प्रतिबिंब अंधःकार असल्यामुळें अस्पष्ट पडलेलें दिसत होतें.

मेघांनीं स्पर्श केल्यामुळें त्या अधिक थंड झालेल्या पहाटेच्या रात्रीच्या वाऱ्याच्या स्पर्शानें जगत्सिंहाच्या शरीराचा संताप कांहींसा दूर झाला. खिडकीच्या कठड्यावर आपले हात टेवून त्यावर डोकें टेंकून जगत्सिंह उभा राहिला. निद्रा न आल्यामुळें व इतका वेळ उत्कट मानसिक दुःख होत असल्यामुळें तो अगदीं थकून गेला होता. आतां मस्तकाला थंड वारा लागल्यामुळें, त्याचे विचार अमळ कमी होऊं लागले आणि त्याचें मन दुसऱ्या गोष्टीकडे वळलें. एवढा वेळ ज्या विचारांनीं त्याचें हृदय विद्ध होत होतें, ते आतां दूर झाल्यामुळें कल्पनाशक्तीच्या बाहेरचें, तीक्ष्णताशून्य असें नैराश्य, त्याच्या मनांत शिरूं लागलें. आशेचा त्याग करणें हेंच जास्त क्लेशकारक असतें; एक वेळ मनांत निराशा स्थिर झाली म्हणजे ती इतकी क्लेशदायक होत नाहीं. हत्याराचा घाय होतवेळीं फारच क्लेश होतात, पण तीच एकदां कां जखम झाली म्हणजे तिच्या वेदना स्थीर होऊन राहतात, व त्यांपासून पहिल्याइतका त्रास होत नाहीं. जगत्सिंह निराशेच्या कमी क्लेशदायक अशा वेदना भोगूं लागला. त्यावेळच्या अंधारांतील नक्षत्रहीन आकाशाकडे पाहून आपलें हृदयाकाशही ह्याचप्रमाणें अंधःकारमय व नक्षत्रहीन झालें आहे, हा विचार त्याचे मनांत येऊन त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. आजपर्यंत घडून आलेल्या सर्व गोष्टींचें त्यास हळूहळू स्मरण होऊं लागलें. बाल्यकाल, किशोर

वयांत गेलेले आनंदाचे दिवस, हीं सर्व त्याचे मनांत येऊं लागलीं. जगत्सिहाचें मन ह्या विचारांत मग्न होऊन गेलें. हळू हळू त्याचें मन शांत होऊं लागलें; व त्याचप्रमाणें त्याचें शरीरही शीतल होत चाललें. थकवा आला असल्यामुळें त्याची चेतना जाऊं लागली व खिडकीला टेंकला असतांच त्याला झोंप लागली. निद्रावस्थेंत राजकुमारानें एक स्वप्न पाहिलें. त्याच्या त्या निद्रित चेहऱ्यावर रागाचीं चिन्हें दिसूं लागलीं; त्याच्या त्या चेहऱ्यावर घडलेला फेरफार पाहून ह्याला फार दुःख होतें आहे असें स्पष्ट दिसूं लागलें; त्याचा खालचा ओंठ कांपूं लागला, कपाळाला घाम सुटला व हातांच्या मुठी वळल्या.

एकदम चमकल्यासारखें होऊन त्याची झोंप उडाली, घाबरा होऊन कुमार खोलींत इकडे तिकडे फिरूं लागला; असें किती वेळ तरी त्याला दुःख भोगावें लागलें हें खात्रीपूर्वक सांगतां येणें कठीण आहे; पण जेव्हां सकाळीं सूर्यकिरणें त्या किल्ल्याचे आंतील वाड्याचे भिंतीवर पडलीं, तेव्हां जगत्सिंह भूमीवर बिछान्याशिवाय व पांघरुणाशिवाय तसाच निजलेला तेथील सेवकांच्या दृष्टीस पडला.

उसमाननें येऊन त्याला जागें केलें. राजपुत्र जागा झाला. तेव्हां उसमाननें त्याला सलाम करून त्याच्या हातीं एक पत्र दिलें. राजपुत्र तें हातीं घेऊन तसाच मुकाट्यानें त्याच्या तोंडाकडे पाहूं लागला. तेव्हां उसमाननें ताडलें कीं, राजपुत्राचा आत्मा विव्हळ झाला आहे, म्हणून आतां जास्ती बोलण्यांत हांशील नाहीं; असें समजून तो म्हणाला, 'राजपुत्रा! आपण असे जमिनीवर कां निजलां होतां हें

विचारण्याचें मला कारण नाहीं, व तितकी उत्सुकताही नाहीं. हें पत्र पाठविणारीला मीं वचन दिलें होतें कीं, मी तें आपल्याला आणून देईन; हें पत्र ज्या कारणासाठीं आजपर्यंत आपणास दिलें नव्हतें, तें आतां दूर झालें आहे हें आपण सर्व जाणतच आहां. मी हें पत्र आपणापाशीं ठेवून जातों, आपण तें सावकाश वाचा. मी संध्याकाळीं पुन्हां येईन, व आपण त्याचा कांहीं जबाब दिल्यास मी तो ह्या पत्र लिहिणारीस नेऊन पोंचवीन.'

असें बोलून उसमान राजपुत्राला पत्र देऊन निघून गेला.

राजपुत्र एकटा बसून चांगला सावध झाल्यावर तें विमलेचें पत्र वाचूं लागला. अथपासून इतिपर्यंत वाचल्यानंतर त्यानें तें पत्र दिव्यावर धरून जाळून टाकिलें. पत्र पुरें जळेपर्यंत त्याकडे तो पहात होता. पत्र जळून खाक झाल्यावर तो आपल्याशींच बोलूं लागला, 'हें स्मृतिचिन्ह अग्नींत टाकून मला निःशेष करितां आलें; परंतु ही माझी स्मृति इतक्या संतापाग्नींत जळत असतां एकदांची नाहींशी कशी होत नाहीं बरें?'

जगत्सिंहानें नित्यक्रमाप्रमाणें प्रातःकृत्य आटोपलें. पूजा करून भक्तिभावानें इष्ट देवाला त्यानें प्रणाम केला; नंतर हात जोडून डोळे वर लावून तो म्हणाला, 'प्रभो! दासाचा त्याग करूं नका. मी राजधर्म प्रतिपालन करीन, क्षत्रकुलोचित योग्य करीन. ह्या आपल्या पादपद्मांच्या प्रसादाचीच फक्त मी याचना करितों. विधर्म्याच्या उपपत्नीला या चित्तांतून दूर करीन. असें करण्यांत माझा शरीरपात झाला तरी आपल्याच चरणांचा लाभ होईल. मानवानें जें

करावें तें मीं केलें आहे; पुरुषाचें कर्तव्य तें मी करीन. पहा, प्रभो ! आपण अंतर्यामी आहां, माझें अंतःस्थलापर्यंत दृष्टि लावून पहा, आतां मी तिलोत्तमेच्या प्रेमाचा अभिलाषी नाहीं. आतां मला तिच्या दर्शनाची देखील इच्छा नाहीं, केवळ पूर्वस्मृति हें हृदय क्षणोक्षणीं जाळीत आहे. आकांक्षेचें मी विसर्जन केलें आहे, आपण माझा स्मृतिलोप करणार नाहीं काय ? प्रभो ! आपल्या पायापाशीं इतकीच भिक्षा मला मागावयाची आहे, नाहीं तर ही स्मरणवेदना मला सहन होणें शक्य नाहीं. '

प्रतिमा विसर्जन झाली.

त्या वेळीं तिलोत्तमा धूलिशय्येवर पडून काय बरें स्वप्न पाहात होती ! या घोर अंधःकारांत एका ताऱ्याकडे ती पहात होती तो तिच्या दृष्टीस पडेनासा झाला आहे; या घोर तुफानाच्या वेळीं ज्या वेलीचें तिनें प्राणबंधन केलें होतें, ती तुटून पडली आहे; ज्या भोंपळ्यावर भार ठेवून ती समुद्रोल्लंघन करीत होती, तो बुडून गेला आहे; आणि दुसरें काय ?

---

# प्रकरण ११ वें.

## स्थानांतर.

सांगून ठेविल्याप्रमाणें उसमान संध्याकाळीं राजपुत्राकडे येऊन म्हणाला, ' युवराज! आपली उत्तर पाठविविण्याची इच्छा आहे का.?'

राजपुत्रानें उत्तर लिहून ठेविलें होतें, तें घेऊन त्यानें उसमानाचे हातीं दिलें. उसमान पत्र हातीं घेऊन म्हणाला, 'आपण मला दोष देऊं नये; पण किल्ल्यांतील रहिवाशांनीं कोणी कोणाला जरी पत्र धाडिलें, तरी तें किल्ल्याचे रक्षण करणारानें वाचून पाहिल्याशिवाय कोठेंही पाठविण्यांत येऊं नये, अशी आमची पद्धत आहे.'

युवराज थोडा दिलगीर होऊन म्हणाला, 'इतकें सांगण्याची अवश्यकता नाहीं; आपण पत्र उघडून खुशाल वाचा, आणि तें पाठविण्यासारखें असल्यास पाठवा.'

उसमाननें पत्र उघडून वाचिलें, त्यांत एवढाच मजकूर होता:——

'मंदभागिनि! मी तुझी विनंति विसरणार नाहीं. परंतु जर तूं पतिव्रताच असशील, तर तूं तुझा पति ज्या मार्गानें गेला आहे, तो मार्ग होईल तितक्या जलदीनें अनुसरून, आपल्या कलंकाचा लोप कर.'

'जगत्सिंह.'

उसमान पत्र वाचून म्हणाला, 'राजपुत्र! आपलें हृदय इतकें का कठोर आहे?'

राजपुत्रानें रागावून उत्तर दिलें, 'पठाणापेक्षां जास्त नाहीं.'

हें ऐकून उसमानचा चेहरा एकदम लाल पडला, व तोही थोडासा रागावून म्हणाला, 'आपल्याशीं पठाणांनीं आजपर्यंत कोणत्याही रीतीनें अयोग्य आचरण केलें नाहीं, असें मला तर वाटतें.'

राजपुत्राला ह्या बोलण्यानें राग आला, पण तशीच त्याला लाजही वाटली. तो म्हणाला 'खानसाहेब! माझी स्वतःची नाहीं मी गोष्ट सांगत. आपण मजवर सर्व प्रकारें कृपा केली आहे, आणि बंदिवान झालों असतांही आपण माझें रक्षण करून मला प्राणदान दिलें आहे. आपले इतके लोक मी मारिले असतांही आपण माझ्या जखमा बऱ्या करविल्या आहेत; जो कैदखान्यांत शृंखलेनें बंधन करून ठेवण्यास योग्य त्याला आपण अत्यंत सुखांत राखिलें आहे, ह्याहून माझें अधिक चांगलें तें काय करावयाचें आहे? पण मी बोलतोंच—मी आपल्या पाहुणचाराच्या जाळ्यांत पडून फसलों आहें. या सुखाचा परिणाम काय होईल तो कांहीं मला कळत नाहीं. जर मी बंदिवान असलों, तर मला कैद्यांच्या कोठडींत नेऊन कोंडा. या दयेच्या शृंखलाबंधनांतून मला सोडवा. आतां जर मी कैदी नसलों तर मला या सोन्याच्या पिंजऱ्यांत अडकवून ठेवण्याचें तरी काय कारण आहे?'

उसमाननें स्थीर चित्तानें उत्तर दिलें, 'राजपुत्र! आपल्या वाइटासाठीं इतके आतुर कशाला होतां? अमंगलाला कांहीं बोलवावें लागत नाहीं, तें आपल्या आपणच येत असतें.'

राजपुत्र गर्वानें म्हणाला, 'आपली ही पुष्पशय्या मोडून कैदखान्यांतील शिलाशय्येवर निजणें, म्हणजे मोठेंसें अमंगल आहे असें आम्हीं रजपूत मानीत नाहीं.'

उसमाननें विचारिलें,'शिलाशय्या हीच अमंगलाची हद्द असेल तरच नाहींना मग कांहीं दरकार?'

राजपुत्र, उसमानकडे तीव्र दृष्टीनें पाहून म्हणाला, 'जर कतलुखानाला योग्य असें शासन माझ्याहातून नाहीं झालें, तर मग मरण आलें म्हणून त्याची काय मी दरकार का करणार आहें ?'

उसमान म्हणाला, 'युवराज ! सावध रहा ! पठाणां-संबंधीं जें कांहीं बोलावयाचें आहे तेवढेंच बोला.'

राजपुत्र हंसून म्हणाला, 'सेनापति साहेब ! आपण मला भीति दाखविण्याकरितांच जर आलां असाल तर मग आपला यत्न निष्फळ आहे असें समजा.'

उसमान म्हणाला, 'राजपुत्र, आपला परस्परांचा सहवासानें आतां इतका परिचय झाला आहे कीं, उगाच खोटें वाग्डंबर घालून कोणाचाही हेतु सिद्धीस जावयाचा नाहीं. मी आपल्याकडे एका विशेष कामासाठीं आलों आहें.'

जगत्सिंह थोडासा आश्चर्यचकित होऊन म्हणाला, 'बोला तर मग.'

उसमान म्हणाला, 'मीं आतां जें कांहीं सांगणार आहें, तें केवळ कतलुखानाच्याच हुकमानें आहे असें धरून चाला.'

जगत्सिंह म्हणाला, 'ठीक आहे.'

उसमान म्हणाला, 'ऐका, रजपूत आणि पठाण यांच्या ह्या युद्धांत दोहोंबाजूंकडील लोकांचा संहार होत आहे.'

जगत्सिंह म्हणाला, 'पठाणांचा नाश करावा हाच या लढाईचा हेतु आहे.'

उसमान म्हणाला, 'असेलही कदाचित्, पण दोन्ही पक्षांचा कांहींना कांहींतरीं नाश झाल्याशिवाय एका पक्षाचाच नाश होणें हे किती अशक्य आहे, हें आपण जाणतच आहां. गडमांदारणावर विजय मिळविणारे अगदींच कांहीं पुळपुळीत नाहींत, हें आपण तर पाहिलेंच आहे.'

जगत्सिंह थोडेंसें हंसून म्हणाला, 'ते युक्तिवान आहेत खरे.'

हें ऐकून उसमान म्हणाला, 'कसेंही असो, माझा बढाई मारण्याचा हेतु नाहीं. मोंगल बादशहाशीं रात्रंदिवस युद्ध करून पठाणांना ओरिश्यांत राहणें हें सुखदायक होणार नाहीं, पण मोंगल बादशहानांही पठाणांस आपल्या ताब्यांत कधीं आणतां येणार नाहीं. मीं म्हणतों, हें केवळ स्वतःच्या लोकांची फुशारकी मारण्यासाठीं आहे, असें मात्र आपण समजूं नये. आपण राजनीतिज्ञ आहां, नीट विचार करून पहा, दिल्लीपासून ओरिसा किती दूर आहे तो! दिल्लीश्वरानें केवळ मानसिंहाच्याच बाहुबळानें पठाणांना जिंकून घेतलें आहे पण त्याची ही जयपताका किती दिवस या प्रदेशांत अशी फडकत राहणार आहे? महाराज मानसिंह एकदां का ससैन्य दिल्लीकडे परतले कीं, दिल्लीश्वराचा येथील अंमल संपलाच म्हणून समजा. पूर्वी एकदां अकबर बादशहानें ओरिसा हस्तगत करून घेतला होता, पण ह्या प्रांताचा करभार किती दिवस त्यानें चालविला बरें? या वेळींही जय मिळवून तरी तोच परिणाम होणार. बरें तसें झालें कीं, दिल्लीहून पुनरपि सैन्य रवाना होईल, तें पुनः ओरिश्यावर जय मिळवून मागें परतेल व पुनः

पठाण स्वतंत्र होऊन बसतील! हे पठाण कांहीं बंगाली नव्हेत; ते कधींही कोणाच्या ताब्यांत राहणारे नाहींत; आमच्यांतला एक मनुष्य जरी जिवंत राहिला, तरी तो परवशता कबूल करील असें कधींही व्हावयाचें नाहीं, हें तुम्हाला खात्रीनें सांगून ठेवितों; असें जर आहे, तर रजपूत आणि पठाण यांच्या रक्तानें या धरणीला कां बरें व्यर्थ स्नान घालावें?'

जगत्सिंह म्हणाला, 'मग आपलें काय म्हणणें आहे?'

उसमान म्हणाला, 'मी स्वतः कांहीं म्हणत नाहीं, पण आमच्या नबाबसाहेबांची इच्छा तह व्हावा अशी आहे.'

जगत्सिंह म्हणाला, 'तह ह्मणजे कसा?'

उसमान म्हणाला, 'उभय पक्षांनींही थोडी पड घेतली पाहिजे. नबाब कतलुखान हे आपल्या बाहुबळानें काबीज केलेला बंगाल्यांतील सर्व मुद्धख सोडून देण्यास तयार आहेत. अकबरशहांनींसुद्धां ओरिसा प्रांतावरचा आपला ताबा सोडून आपलें लष्कर मागें घेऊन जावें, व पुनः त्या प्रांतावर स्वारी करण्याचें सोडून द्यावें. ह्यांत त्यांचें कांहीं देखील नुकसान नाहीं, उलट पठाणांचेंच नुकसान आहे. कारण, आम्हांला जो मुलूख हस्तगत करून घेण्याला फार त्रास पडला तो सोडून देण्याला आह्मी तयार आहों; पण अकबर बादशहाला जो मुलूख जिंकितां आला नाहीं तोच त्याला सोडावयाचा आहे.'

राजपुत्र हें सर्व ऐकून मग म्हणाला, 'आपण म्हणतां तें ठीक आहे; पण हें सगळें मजजवळ सांगण्याचें कारण

काय? संधिनिग्रह करणें हें महाराज मानसिंहाचे हातांत आहे; त्यांजकडे दूत पाठवा.'

उसमान म्हणाला, 'महाराजांकडे आम्हीं दूत पाठविला होता, पण दुर्दैवानें कोणी दुष्टानें त्यांना असें कळविलें आहे कीं, पठाणांनीं आपला प्राणनाश केला आहे; महाराजांनीं त्या शोकामुळें व त्या रागानें आपले कडील मुत्सद्यांस तहाचें नांवदेखील काढूं दिलें नाहीं, व आमच्या दूताच्या सांगण्यावर भरंवसाही ठेविला नाहीं. यासाठीं जर आपणच जाऊन तहाचें बोलणें त्यांजपाशीं लावाल तर ते आपलें म्हणणें कबूल करतील.'

राजपुत्र पुनः उसमानाकडे स्थीर दृष्टीनें पाहून म्हणाला, 'सर्व कांहीं नीट स्पष्ट बोला. खुणेकारितां माझ्या हातचीं दोन अक्षरें पाठविलीं तरी देखील महाराजांची खात्री होईल, मग आपण मला स्वतः जाण्याविषयीं कशाला सांगतां बरें?'

उसमान म्हणाला, 'त्याचें असें कारण आहे कीं, महाराज मानसिंहांना आमची सर्व स्थिति माहीत नाहीं; आपण गेलां म्हणजे आपल्यापासून त्यांस ती खरोखरी सहज कळणार आहे; त्यांतही आपल्या सांगण्यानें विशेष कार्यसिद्धीचा संभव आहे, तसें पत्रानें होणार नाहीं. तह झाल्याबरोबर एक एवढें होईल कीं, आपली पुनः सुटका होईल; सारांश आपण हें काम पत्कराल, अशी नबाब कतलुखानांची पूर्ण खात्री आहे.'

जगत्सिंह म्हणाला, 'वडिलांकडे जाण्यास मजकडून ना नाहीं.'

उसमान म्हणाला, ' हें ऐकून मला फार बरें वाटतें; पण आपल्याला आणखी एक सांगावयाचें आहे. जर अशा रीतीनें स्थान करण्यांत आपण यशस्वी नच झालां, तर पुनः या किल्ल्यांत आपण परत येण्याचें कबूल करावें.'

जगत्सिंह म्हणाला, ' मी कबूल करून परत येईनच ह्याची तरी काय खात्री? '

उसमान म्हणाला, ' ती आमची खात्री आहे; रजपूत वचनपराङ्मुख होत नसतात हे जगजाहीर आहे.'

राजपुत्र संतुष्ट होऊन म्हणाला ' मी आपल्याला वचन देतों कीं, वडिलांची भेट घेऊन मी एकटाच किल्ल्यांत परत येईन. '

उसमान म्हणाला, ' आणखी एक आपणांस सांगावयाचें आहे, तेवढें जर आपण आमचें ऐकाल, तर आम्हीं आपले फार फार आभारी होऊं. आपण महाराजांना भेटाल तेव्हां आमच्या इच्छेप्रमाणें तह करविण्याला आपण यत्न कराल, असें आम्हांला वचन द्या. '

राजपुत्र म्हणाला, 'सेनापति साहेब, मला हें असें वचन देतां येत नाहीं. दिल्लीपतीनीं आम्हांला पठाणांना जिंकण्याकरितां इकडे धाडिलें आहे, तर आम्हीं पठाणांना जिंकूं; सल्ला करण्याकरितां त्यांनीं आम्हांला नेमिले नाहीं व आम्हीही सल्ला करणार नाहीं, व आपण मला हें कामही सांगूं नका. '

उसमानाचे मुखावर संतोष व क्षोभ ह्या उभयतांचींही चिन्हें दिसूं लागलीं. तो म्हणाला, 'युवराज ! आपण रजपूताप्रमाणें हा जबाब दिलात, पण आपण विचार करून

पहा कीं, आपली सुटका करून घेण्याला याशिवाय दुसरा कांहीं मार्गच नाहीं.'

जगत्सिंह म्हणाला, 'मी एक नाहीं सुटलों म्हणून त्यानें दिल्लीपतीचें काय वांकडें होणार आहे? रजपूत कुळांत देखील आणखी पुष्कळ राजपुत्र आहेत.'

उसमान दिलगीर होऊन म्हणाला, 'युवराज! आपण माझी विनंति ऐका, आणि हा आपला नाद सोडून द्या.'

जगत्सिंहानें विचारिलें, 'कां, कशाकरितां बरें?'

उसमान म्हणाला, 'राजपुत्र! आतां मी आपणांस स्पष्ट सांगतों कीं, आपल्या योगें कार्य फत्ते होईल अशी खात्री जाणून नबाब साहेबांनीं आपल्याला आजपर्यंत असें मानपूर्वक संभाळिलें होतें. आतां आपण जर त्यांच्या इच्छेप्रमाणें वागलां नाहीं, तर आपणास ते दुःख देण्यास मागेंपुढें पहाणार नाहींत.'

जगत्सिंह म्हणाला, 'पुनः भय दाखवितां! आतांच, कैदखान्यांत राहण्याची माझी इच्छा मीं आपणास कळविली आहे.'

उसमान म्हणाला, 'केवळ कैदखान्यांत घालूनच नबाबसाहेब खूष राहिले तर बरें समजा.'

युवराज भिवया वर चढवून म्हणाला, 'नाहींतर वीरेंद्रसिंहाच्या रक्ताचा प्रवाह वाढविला जाईल इतकेंच कीं नाहीं?' असें बोलतांना राजपुत्राच्या डोळ्यांतून अग्नीच्या ठिणग्या पडताहेत असें वाटूं लागलें.

उसमान म्हणाला, 'मी आतां रजा घेतों. माझें काम मी केलें आहे, आतां कतलुखानाच्या दुसऱ्या दूताच्या तोंडानें त्यांचा हुकूम आपण ऐकाल.'

थोड्या वेळानें उसमाननें सांगितल्याप्रमाणें कतलुखानाकडून दूत आलाच. तो मनुष्य लष्करी पोषाख केलेला व साधारण पायदळ शिपायापेक्षां वरच्या पायरीचा असा दिसत होता. त्याच्याबरोबर आणखी चार हत्यारबंद पायदळ शिपाई होते. त्यांना पाहून राजपुत्र म्हणाला, 'तुम्हीं का आलां आहांत?'

दूत म्हणाला, 'आपली जागा बदलावी म्हणून.'

'चला तर मग ही मी तयारच आहें' असें बोलून तो दूताच्या मागून चालूं लागला.

---

# प्रकरण १२ वें.

## विलक्षण अलंकार.

महोत्सव प्राप्त झाला आहे. आज कतलुखानाचा वाढदिवस आहे. दिवसास रंग, नृत्य, दान, खानपानादिकांत सर्व गुंतून गेलीं आहेत. रात्रीं तर ह्याहूनही मौज उडावयाची आहे. नुक्तीच संध्याकाळ होऊन गेली आहे; किल्ल्यांत जिकडे तिकडे उजेडच उजेड झाला आहे; सैनिक, शिपाई, उमराव, चाकरमाणसें, शहरांतील लोक, भिक्षुक, अमली लोक, नट, नर्तकी, नायक, नायिका, वादक, ऐंद्र-

जालिक, माळी, अतार, तांबोळी, खाण्याचे [illegible]वा[illegible] विक-
णारे व कारागीर लोक, हे चोहोंकडे सारखे प[illegible]रून राहिले
आहेत; जिकडे जावें तिकडे दिवेच दिवे व [illegible]गीत, वाद्य,
अत्तर, गुलाब, पान, फूल, आतषबाजी व [illegible]त्रा हीं दृष्टीस
पडत आहेत. अंतःपुरांत सुद्धां तोच थाट [illegible] कोठें उडून
राहिला आहे. नबाबाचे विलासगृहांत नेह[illegible]
शांतता जास्त आहे खरी, तथापि आज तें नि[illegible]ींपेक्षां आज
दिसत आहे. खोल्याखोल्यांतून चांदीचे दि[illegible]शेष आनंदमय
दिवे, अत्तरें घालून लाविल्यामुळें, सुगंधयुक्त [illegible] स्फटिकांचे
कडे तिकडे पसरून राहिला आहे; सुगंधि[illegible] प्रकाश जि-
पुष्पें ठेवण्याच्या भांड्यांतून, स्तंभावरून [illegible] पुष्पांच्या माळा,
नांवरून आणि तेथें राहणाऱ्यांच्[illegible], बिछान्यांतून, आस-
[illegible]ा अंगावरून, लटकून रा-
हिल्या आहेत. आतां [illegible]ली गुलाबाच्या वासाचा भार उच-
[illegible]तनासा झाला आहे. अगणित दासी, कोणी भरजरीचीं, कोणी आपआपल्या इच्छेप्रमाणें हिरवीं, पिवळीं, तांबडीं, जांभळीं इत्यादि रंगाचीं चीन देशचीं रेशमी वस्त्रें नेसून, शरीरावर स्वर्णालंकार घालून, दिव्याच्या प्रकाशानें झळकत फिरत आहेत. त्या ज्यांच्या दासी आहेत त्या सुंदरी, महालोंमहालीं बसून अतिशय श्रम घेऊन चट्टीपट्टी करीत आहेत. आज नबाब प्रमोद मंदिरात येऊन सर्वांस घेऊन आनंद करील, नाचगाणेंही होईल, ज्यांची जी इच्छा असेल ती त्यांची त्यांस आज पूर्ण करून घेतां येईल. एक सुंदरी आज आपल्या भावाला चाकरी लाववून देण्याची आशा धरून लक्षपूर्वक केंस विंचरीत आहे. दुसरी आपल्याला दासदासी जास्त मिळाव्या म्हणून केंसाच्या जटा वक्षस्थळापर्यंत नेऊन सोडीत आहे. ति-

सरी आपल्याला झालेल्या नवीन बालकाला एखादी जहागीर मिळविण्याच्या हेतूनें गाल लाल दिसावे म्हणून जोरानें रक्त निघेपर्यंत त्यांना पुसून काढीत आहे. चौथी नबाबाच्या अमक्या स्त्रीनें नवीन रत्नालंकार मिळविले आहेत तसेच आपणही मिळवावे म्हणून डोळ्यांत सुरमा घालित आहे; पांचवी रागीट स्त्री आपल्याला वस्त्र नेसवितांना दासीनें पेशवाजावर पाय दिला म्हणून तिच्या तोंडांत मारीत आहे; कोणा प्रगल्भेचें वय झाल्यामुळें कमी होत चाललेले केंस जेव्हां तिची दासी विंचरूं लागली ते वेळीं दासीच्या हातच्या फणींत ते तुटून आलेले पाहून ती मोठा गळा काढून रडूं लागली आहे; असा जिकडे तिकडे मनोविकारांचा गोंधळ उडून राहिला आहे. आज सर्वांना कतलुखानाचें आनंद कार्यच सिद्धीस न्यावयाचें आहे असें नाहीं तर आपापलीं कार्येंही सिद्धीस न्यावयाचीं आहेत.

कुसुमवनांत स्थलपद्मप्रमाणें, किंवा पक्षीगणांत मयूरीप्रमाणें एक सुंदरी वेणीफणी करून खोलीखोलींतून फिरत होती. आज कोणाला कोठेंही जाण्याला मनाई नव्हती. ज्या अवयवाचें जसें सौंदर्य असावें तसें ब्रह्मदेवानें तिच्या अवयवांना दिलें होतें; ज्या स्थानीं जो अलंकार पाहिजे तो तिला कतलुखानानें दिला होता; तथापि त्या स्त्रीच्या मुखावर किंचित् सुद्धां सौंदर्याचा अथवा अलंकाराचा गर्व दिसण्यांत येत नव्हता; आनंद, हंसणें वगैरे कांहीं दृष्टोपत्तीस येत नव्हतीं. तिच्या मुखाची कांति गंभीर व स्थिर होती, पण तिचे डोळे मात्र लाल झालेले होते.

विमला अशा रीतीनें त्या महालांत ठिकठिकाणीं फिरत एका सजविलेल्या खोलींत गेली व आंत जाऊन तिनें दाराला कडी लावून घेतली. आज उत्सवाच्या दिवशीं देखील या खोलींत फक्त एकच मंदसा दिवा जळत होता. खोलीच्या एका बाजूला एक पलंग होता; त्या पलंगावर पायापासून डोक्यापर्यंत पांघरूण घेऊन कोणी निजलें होतें. विमला पलंगापाशीं जाऊन उभी राहिली व हळूच म्हणाली, 'मी आल्यें आहें.'

आपल्या निजलेल्या व्यक्तीनें झटकन भ्याल्याप्रमाणें मुखावरील पांघरूण काढिलें, व विमलेला पाहतांच ती व्यक्ति अंगावरचें पांघरूण काढून उठून बसली, पण कांहीं बोलली मात्र नाहीं.

विमला पुनः म्हणाली, 'तिलोत्तमे मी आल्यें आहें.'

तरी तिलोत्तमेनें कांहींच जबाब दिला नाहीं, ती एकसारखी स्थीर दृष्टीनें तिच्या तोंडाकडे मात्र पहात राहिली.

तिलोत्तमा आतां कांहीं उगाच लाजणारी मुलगी नव्हती. त्या वेळीं तिच्याकडे कोणी पाहिलें असतें तर त्या अंधुक दिव्याच्या प्रकाशांत तिच्या वयांत दहा वर्षे जास्त मिळालीं असावीं असें त्याला वाटलें असतें. ती अत्यंत क्षीण झाली होती. तिचा चेहरा फिक्का पडून गेला होता. एक मळलेलें लहानसें वस्त्र ती नेसली होती. पुष्कळ दिवस वेणीफणी न झाल्यामुळें व त्यांत धूळ गेल्यामुळें तिच्या केंसाच्या जटा होऊन गेल्या होत्या. तिच्या शरीरावर त्या वेळीं एक-देखील अलंकार नव्हता, पण पूर्वी जे ती अलंकार घालीत असे त्यांच्या खुणा मात्र तिच्या अंगावर दिसत होत्या.

विमला पुनः म्हणाली, 'मीं तुला येईन म्हणून सांगितलें होतें, त्याप्रमाणें आल्यें आहें. तूं अशी बोलत कां नाहींस ?'

तिलोत्तमा म्हणाली, 'मला जें कांहीं सांगावयाचें होतें तें मीं तुला सर्व सांगितलें आहे. आतां आणखी काय बोलूं ?'

तिलोत्तमेच्या आवाजावरून ती रडत असावी असें विमलेला वाटलें. डोक्यावर हात ठेऊन तिचें तोंड वर करून तिनें पाहिलें तों तिच्या डोळ्यांतून पडणाऱ्या अश्रूंनीं तिचे गाल भिजून गेले होते. लुगड्याच्या पदराला तिनें हात लावून पाहिलें तों तो भिजून चिंब झाला होता. ज्या उशीवर ती डोकें टेकून निजली होती, त्या उशीला तिनें हात लावून पाहिलें तों तीही भिजून गेली होती. तेव्हां विमला म्हणाली, 'असें रात्रंदिवस रडत राहिलीस तर तुझ्या या शरीराची काय वाट होईल ?'

हें ऐकून तिलोत्तमा निश्चयात्मक भावानें म्हणाली, 'आतां या शरीराची जतन करून काय करावयाचें आहे ? इतके दिवस हें कसें राहिलें आहे, ह्याचेंच मला वाईट वाटत आहें,'

हें ऐकून विमला स्तब्ध झाली, व तिलाही रडूं कोसळलें. कांहीं वेळानें विमला दीर्घश्वास सोडून म्हणाली, 'आतां कायतो एक उपाय आहे.'

तिलोत्तमा असंतोषानें विमलेच्या डागडागिन्यांकडे पुनः पाहून म्हणाली, 'उपायाची काय गरज आहे ?'

विमला म्हणाली, 'बेटा! असा धीर नको सोडूं. अजून कतलुखानाला ओळखिलें नाहींस काय ? त्याला

स्वतःला आजपर्यंत फावलें नव्हतें म्हण, कीं त्यानें आपल्याला शोक निवारण करण्याला अवकाश दिला म्हणून म्हण, त्या दुरात्म्यानें आपल्याला गय केली आहे. त्यानें आधींच सांगून पाठविलें आहे, त्याप्रमाणें आपली मुदत आज संपत आहे, म्हणून जर कां तो आपल्याला नृत्यशाळेंत आलेल्या न पाहील, तर मग आपलें काय होईल, तें बाई मला कांहीं सांगता येत नाहीं.'

तिलोत्तमेनें विचारिलें, 'आतां आणखी तें काय व्हावयाचें आहे?'

विमला किंचित् स्थिर होऊन म्हणाली, 'तिलोत्तमे! एकदम अशी निराश काय म्हणून होतेस! अजून आपले प्राण आहेत, आपला धर्मही आपण सोडिला नाहीं, जितके दिवस जीव आहे तितके दिवस आपण धर्म राखूंच राखूं.'

तेव्हां तिलोत्तमा म्हणाली, 'असें असेल तर मग आई! हे अलंकार काढून टाक पाहूं, तुझे हे घातलेले दागिने माझ्या डोळ्यांत सलत आहेत.'

विमला थोडीशी हंसून म्हणाली, 'बेटा, माझे सर्व अलंकार पाहिल्याशिवाय तूं मला अशी धिक्कारूं नको.'

असें बोलून विमलेनें आपल्या लुगड्यांत लपवून ठेवलेली एक तीक्ष्ण कट्यार बाहेर काढिली; दिव्याच्या उजेडांत तिची ती तीक्ष्ण पात विजेप्रमाणें चमकून उठली; ती पाहून तिलोत्तमेला आश्चर्य वाटलें व तिच्या तोंडाला कोरड पडली; ती म्हणाली, 'ही तुला ग कोठून मिळाली?'

विमला म्हणाली, 'काल अंतःपुरांत एक नवी दासी आली आहे, ती तूं पाहिली आहेस?'

तिलोत्तमा म्हणाली, ' होय पाहिली आहे, ती तर आपली अस्मानी आहे. '

विमला म्हणाली, ' तर मग मी तिच्याच हातांनीं ही अभिरामस्वामींकडून आणविली आहे.'

हें ऐकून तिलोत्तमा कांहीं बोलल्याशिवाय बसली; तिचें हृदय कांपूं लागलें. थोड्या वेळानें तिला विमला म्हणाली, ' आज तूं आपला पोषाख टाकून देत नाहींस का ? '

तिलोत्तमा म्हणाली, ' नाहीं.'

विमलेनें विचारिलें, 'काय, तूं आज तिकडे नृत्य गीतादिकांकडे जाणार नाहींस ?'

तिलोत्तमा म्हणाली, 'नाहीं, नाहीं.'

विमला म्हणाली, ' गेल्यावांचून तर तुला सुटकाच नाहीं. '

तिलोत्तमा रडूं लागली. तेव्हां विमला म्हणाली, ' स्थिर राहून नीट ऐक, मी तुझ्या सुटकेला उपाय योजिला आहे. '

हें ऐकतांच तिलोत्तमा लक्षपूर्वक विमलेच्या मुखाकडे पाहूं लागली. विमलेनें उसमाननें दिलेली ती अंगठी तिच्या हातांत दिली व ती म्हणाली, ' ही अंगठी संभाळ. नृत्यगृहांत जाऊं नको. मध्यरात्र उलटून जाईतोंपर्यंत आपल्याकडील धामधूम आज कमी व्हावयाची नाही; तोंपर्यंत मीं पठाणाला थांबवून धरीन; मी तुझी सावत्र आई आहे हें त्याला कळलें आहे व त्यामुळें तूं माझ्या देखत पुढें येणार नाहींस ह्या निमित्तानें नृत्यगीत पुरें होईतोंपर्यंत तुला पाहण्याची त्याची इच्छा मी आंवरून धरीन.

अर्धी रात्र झाली, कीं तूं ही अंगठी घेऊन अंतःपुराच्या दरवाजापाशीं जा; तेथें एक मनुष्य तुला अशीच दुसरी अंगठी दाखवील ती पाहून ती अशीच असेल, तर तं त्याजबरोबर जा. तूं सांगशील तेथें तो तुला खात्रीनें घेऊन जाईल. तूं त्याला—मला अभिरामस्वामींच्या आश्रमांत घेऊन जा, म्हणून सांग.'

तिलोत्तमेला हें ऐकतांच मोठा अचंबा वाटला. विस्मयानें असो किंवा आनंदानें असो, तिच्यानें कांहीं वेळपर्यंत बोलवलें नाहीं. नंतर ती म्हणाली, ' हें कसें जुळून आलें ? ही अंगठी तूं कशी मिळविलीस ?'

विमला म्हणाली, ' तें एक पुराणच आहे; पुनः केव्हां तरी तें तुला मी सांगेन. आतां अगदीं मनांत कांहीं न आणितां मीं जसें सांगितलें आहे, तसें कर ह्मणजे झालें.'

तिलोत्तमा म्हणाली, ' पण तुझी वाट काय होईल ?' तूं कशी बाहेर येशील ?

विमला म्हणाली, ' माझी नको तूं काळजी करूं. मी दुसरी कांहीं युक्ति करून तुला उद्यां सकाळीं येऊन खचीत भेटेन.'

अशा रीतीनें विमलेनें कांहींशी तिची समजूत घातली. पण तिनें तिच्याकारितां आपला स्वतःचा सुटण्याचा मार्ग बंद केला आहे हें कांहीं तिलोत्तमेला कळलें नाहीं.

आज बरेच दिवस तिलोत्तमेचें मुख सोडून आनंद कोठें पळून जाऊन नाहींसा झाला होता, पण आज विमलेची गोष्ट ऐकतांच तो पूर्ववत् स्वस्थानीं आल्यानें तिलोत्तमेचें मुख हर्षोत्फुल्ल झालें.

तें पाहून विमलेच्या अंतरात्म्याला फार संतोष झाला. नंतर तिला रडण्याचा हुंदका येऊन ती गद्गद् आवाजानें म्हणाली, ' मी आतां जात्यें.'

तिलोत्तमा थोडी लाजून म्हणाली, आई ! ' मला वाटतें तुला किल्ल्यांतील सर्वांचा समाचार कळला आहे. आपली मंडळी कोठें आहे ? सर्वजण कोठकोठें आहेत, तेवढें तरी मला सांगून मग तूं जा.

हें तिचें बोलणें ऐकून विमलेची खात्री झाली कीं, ह्या अशा विपत्सागरांतही जगत्सिंह तिलोत्तमेच्या मनांत जागृत आहे. विमलेला राजपुत्राचें निर्दय पत्रोत्तर आलें होतें, व त्यांत त्यानें तिलोत्तमेचें नांवसुद्धां लिहिलें नव्हतें; ही गोष्ट सांगून तिलोत्तमेच्या अगोदर दग्ध झालेल्या हृदयाला दग्ध केल्यासारखें मात्र होईल, असा विचार करून त्याविषयीं एक चकार शब्द न काढतां फक्त ती इतकेंच म्हणाली, ' जगत्सिंह या किल्ल्यांतच आहे व तो शरीरानें मात्र कुशल आहे. '

हें ऐकून तिलोत्तमा पुढें कांहीं बोलली नाहीं.

विमला डोळे पुशीत पुशीत तेथून निघून गेली.

---

# प्रकरण १३ वें.

## अंगठी.

विमला निघून गेल्यावर एकटी खोलींत बसून तिलोत्तमा जे विचार करीत होती, त्यांना सुख व दुःख हीं दोन्हीं कारण होतीं. ह्या पापात्म्याच्या कैदेंतून लौकर मुक्त होण्याचा आतां संभव आहे, हें तिच्या मनांत वारंवार येऊं लागलें. येवढेंच तिच्या मनांत येत होतें असें नाहीं, तर विमला आपल्यावर आपल्या प्राणापेक्षां अधिक प्रेम करिते व तिच्यामुळेंच आपल्याला सुटकेचा मार्ग खुला झाला आहे, हेंही तिच्या मनांत वारंवार घोळूं लागलें, व त्यामुळें तिला द्विगुणित सुख होऊं लागलें. तिच्या मनांत आणखी असेंही येऊं लागलें कीं, येथून सुटल्यावर आपण कोठें जावें? आतां आपल्याला बापाचें घर तरी आहे का?' ह्या विचारांनीं तिची धांदल उडाली, व ती रडूं लागली. हे सर्व विचार शांत झाल्यावर दुसरे विचार मनांत उद्भवले 'राजकुमार तर मग खुशाल आहेत का? पण ते कोठें बरें असतील? कोणत्या स्थितींत असतील? ते देखील कैदीच का आहेत?' विचार करितां करितां तिलोत्तमेचे डोळे पाण्यानें भरून आले. 'अहारे अदृष्टा! राजपुत्र मजकरितां बंदिवान झाले ना? त्यांच्या चरणीं मीं हे पंचप्राण दिले तरी त्यांचे उपकार मजकडून फिटतील का? मी त्यांच्यासाठीं काय बरें करूं?' ती पुन्हा विचार करूं लागली, 'ते काय बंदिशाळेंत असतील? ते कोणत्या बंदिशाळेंत असतील बरें? बंदिशाळा ती मेली कशी असते! तेथें दुसऱ्या

कोणाला जाऊं देतात कीं नाहीं? बंदिशाळेंत बसून ते काय विचार करीत असतील बरें? तिलोत्तमेचें नांव घेत-ल्याबरोबर त्यांना काय बरें वाटत असेल? दुसरें काय वाटणार आहे? मीच त्यांच्या दुःखाचें मूळ आहे, हेंच. कोण जाणे मनांतले मनांत ते मला काय म्हणत असतील ते!' तिनें पुनः विचार केला कीं, 'हें काय? मी काय हा विचार करीत आहें ही? ते कोणाला तरी कधीं वाईट म्हणतील का पण? तसें नाहीं, पण असें वाटतें कीं, ते मला विसरून गेले असतील. केवळ मी यवनगृहवासिनी झाल्यें आहे, म्हणून मजबद्दल त्यांच्या मनांत तिरस्कार निपजून त्यांनीं मला आपल्या मनांतून दूर केलें असेल.' ती पुनः आपल्याशीं म्हणाली, 'नाहीं नाहीं,–तसें ते काय म्हणून करतील बरें, ते जसे या किल्ल्यांत बंदिवान आहेत तशीच मीही पण, बंदिवानच होऊन राहिल्यें आहे. तर मग ते माझा धिःकार काय म्हणून करितील बरें? त्यांनीं तसें केलें तर मी त्यांच्या चरणावर लोळण घेऊन त्यांची कशी तरी समजूत करीन. काय? त्यांची समजूत नाहीं पडणार? पडलीच पहिजे. न पडली तर मी त्यांच्यापुढें प्राणत्याग करीन. पूर्वी अग्निदिव्यानें खऱ्याखोट्याची परीक्षा होत असे; पण तसें दिव्य कलियुगांत करितां येत नाहीं. तें होवो अथवा न होवो, पण जर त्यांची खात्री नाहीं झाली तर मी त्यांच्यासमोर अग्नींत उडी टाकून प्राणत्याग करीन.' ती पुनः आपल्याशीं म्हणाली, 'मला त्यांची भेट केव्हां तरी होईल का? त्यांची सुटका काय केल्यानें होईल बरें? मी जर सुटल्यें तर कांहीं कार्यसिद्धी होईल काय?

ही अंगठी माझ्या आईला कोठून बरें मिळाली असेल ? त्यांना सोडविण्याकरितां तर नसेलना ही युक्ति केली ? ही अंगठीच त्यांच्याकडे पाठवून दिली तर होणार नाहीं का ? मला कोण न्यायला येईल बरें ? त्याच्या द्वारें कांहीं बंदोबस्त होऊं नाहींका शकणार ? ठीक आहे, मी त्याला विचारत्यें, तो काय म्हणतो तें तर पाहीन. एकवेळ त्यांची माझी भेट नाहींका होणार ?' पुनः ती विचार करूं लागली. 'पण काय म्हणून मी त्यांच्या भेटीची इच्छा करित्यें आहे बरें ? भेटीअंतीं तरी काय मीं त्यांच्याशीं बोलूं ? त्यांना काय सांगून त्यांच्या मनाची शांति करूं ?'

तिलोत्तमा ह्याप्रमाणें पुष्कळवेळ चिंतन करीत बसली होती.

इतक्यांत एक दासी त्या खोलींत आली, तिला तिलोत्तमेनें विचारिलें, 'आतां किती रात्र झाली आहे बरें ?'

दासीनें उत्तर केलें, 'आतां दोनप्रहररात्र उलटून गेली आहे.' तिलोत्तमा, दासी बाहेर जाण्याची वाट पाहूं लागली. ती काम होतांच चालती झाली, व तिलोत्तमा विमलेनें दिलेली अंगठी घेऊन खोलीबाहेर पडली; तेव्हां तिच्या पोटांत भीतीनें धडकी भरली. चालतां चालतां पाय थरथर कांपूं लागले; तोंड सुकून गेलें; काळीज थरारूं लागलें; ती पाऊल पुढें टाकी व पुनः मागें घेई. हळूहळू धीर धरून तशीच ती अंतःपुराच्या दरवाजापर्यंत गेली. महालांतील खोजे, हबशी वगैरे सर्व मौज मारण्यांत गुंतून राहिले होते. कोणीही तिला पाहिलें नाहीं, अथवा पाहिलें तरी कोणीही तिजकडे लक्ष दिलें नाहीं; पण तिलोत्तमेला

वाटलें होतें कीं, आपल्याला सर्वांनीं पाहिलें आहे. असो. ती कशी तरी अंतःपुराच्या दारापर्यंत येऊन पोहोंचली. तेथें देखील आनंदानें पहारेकरी गुंग होऊन पडले होते. कोणी स्वस्थ निजले होते, कोणी जागे असून देखील सुस्त होऊन पडले होते, कोणी अर्धवट बेशुद्ध होऊन पडले होते, पण कोणींही तिजकडे पाहिलें नाहीं. एकजण मात्र दारापाशीं उभा होता. त्यानें रखवालदाराचा पोशाख केला होता. त्यानें तिलोत्तमेला पाहतांच विचारिलें, आपल्याजवळ अंगठी आहे काय?'

तिलोत्तमेनें भीत भीत विमलेनें दिलेली ती अंगठी त्याला दाखविली. त्या रखवालदाराचा वेष घेतलेल्या मनुष्यानें ती अंगठी नीट निरखून पाहिल्यावर आपल्याजवळ असलेली तशीच अंगठी तिलोत्तमेला दाखविली आणि नंतर म्हणाला, 'आपण मजबरोबर चलावें, कांहीं भीति मनांत आणूं नये.'

तिलोत्तमा चंचल चित्तानें त्या रखवालदाराबरोबर चालली. अंतःपुराच्या दरवाजावरील पहारेकऱ्याप्रमाणेंच वाड्यांत सर्व पहारेकरी धुंद होऊन पडले होते. विशेष आजरात्रीं दरवाजा अगदीं मोकळा होता. कोणीही कोणाला विचारीत नव्हतें. तो रखवालदार तिलोत्तमेला निरनिराळ्या दरवाजांतून, निरानिराळ्या खोल्यांतून व निरनिराळ्या चौकांतून आणीत होता. शेवटीं किल्ल्याच्या दरवाजाशीं आल्यावर पहारेकऱ्यानें तिला विचारिलें, 'आपल्याला कोठें जावयाचें आहे? तें सांगा म्हणजे मी घेऊन जातों.'

तिलोत्तमेनें काय सांगून ठेविलें होतें तें तिला आठ-

वेना. आठवण करितां करितां प्रथम जगत्सिहाची आठवण झाली आणि वाटलें कीं, 'जेथें राजपुत्र आहे तेथें घेऊन जा,' ह्मणून पहारेकऱ्याला सांगावें. पण यावेळीं तरुण कुमारिकांची वैरीण जी लज्जा, तिनें येऊन आपलें वैर साधलें. शब्द तिच्या तोंडांत अडखळूं लागले. तेव्हां पहारेकऱ्यानें पुनः विचारिलें, 'कोठें घेऊन जाऊं ?'

तिलोत्तमेला कांहींच बोलवेना; ती अगदीं ज्ञानशून्य झाली आहे असें दिसूं लागलें. आपोआप तिचें काळीज धडकूं लागलें. ती डोळ्यांनीं पहात होती, तरी तिला दिसत नव्हतें व कानांनीं ऐकत होती तरी तिला ऐकूं येत नव्हतें. तिचें तोंड काय बोललें, हेंही तिला कळेनासें झालें. इतक्या गडबडींत पहारेकऱ्याच्या कानावर 'जगत्सिह' असा अर्धवट शब्द आला.

तेव्हां पहारेकरी म्हणाला, 'जगत्सिह तर आतां बंदिखान्यांत बंदिवान आहेत, तेथें दुसऱ्या कोणाला आतां नेण्याजोगें नाहीं, पण मला असा हुकूम आहे कीं, आपण सांगाल तेथें आपल्याला घेऊन जावें. चला पाहूं तर खरें.'

मार्गदर्शक पहारेकरी पुनः किल्ल्यांत परतला. तिलोत्तमा आपण काय करीत आहों, कोठें जात आहों, हें न समजतां, कळसूत्री बाहुल्याप्रमाणें तो तिला जिकडे जिकडे नेत होता तिकडे तिकडे त्याच्या मागें मात्र चालली होती; पहारेकरी बंदिशाळेच्या दरवाजापाशीं जाऊन पाहूं लागला, तों तेथील रखवालदार किल्ल्यांतील इतर रखवालदारांप्रमाणें त्या आनंदाच्या दिवशींही बेसावध नसून आपआपल्या कामीं अगदीं दक्ष होते. तेथें जातांच त्यानें एकास विचारिलें

' राजपुत्र कोणच्या जागीं आहेत ? ' तेव्हां त्यानें त्यास बोटानें तें स्थळ दाखविलें. मार्गदर्शक पहारेकऱ्यानें बंदिशाळेवरील पहारेकऱ्यास विचारलें, ' राजपुत्र या वेळीं जागे आहेत कीं निजले आहेत ? ' बंदिशालारक्षक आंत राजपुत्राला जेथें ठेविलें होतें तेथें जाऊन पाहून म्हणाला, ' बंदिवान जागा आहे, अशी आंतून वर्दी आली आहे. '

मार्गदर्शक बंदिखान्यावरील मुख्य अंमलदाराला म्हणाला, ' मग तर तुम्ही त्या कोठडीचें दार उघडून द्या, म्हणजे ह्या बाई त्यांस भेटण्यास जातील. '

तो अधिकारी आश्चर्यचकित होऊन म्हणाला, ' हें कसें होईल ? असा आम्हांला हुकूम नाहीं, हें तुम्हांला माहीत नाहीं काय ? '

मार्गदर्शक पहारेकऱ्यानें ती उसमानची खुणेची अंगठी त्या अधिकाऱ्याला दाखविली, तेव्हां त्यानें तावडतोब त्यास मुजरा करून तत्काल दार उघडून दिलें.

राजकुमार त्या कोठडींत एका साधारण खाटल्यावर निजला होता; दरवाजा उघडण्याचा आवाज ऐकून तो दचकून आश्चर्यानें तिकडे पाहूं लागला. तिलोत्तमा बाहेरून दरवाजापाशीं आली, पण आंत तिच्यानें येववेना, आणि पुढें तिचें पाऊलच उचलेना, तेव्हां दाराची एक फळी धरून ती उभी राहिली.

मार्गदर्शक तिला अशी आंत जाण्याला नाखूष पाहून म्हणाला, ' हें काय ? आपण येथेंच वेळ कां घालवितां ? ' तरीही तिलोत्तमेचें पाऊल पुढें उठेना.

पहारेकरी पुनः म्हणाला, ' आपली आंत जाण्याची

इच्छा नसेल तर परत जाऊं चला. असें उभें राहण्याची ही जागा नव्हे.'

तिलोत्तमा परत जाण्यास तयार झाली, पण तिकडेही जाण्याला तिचें पाऊल उचलेना, तेव्हां काय करणार बिचारी! पहारेकरी तर घाई करूं लागला. अशा स्थितींत विचार करतां करतां तिलोत्तमेचें, तिला नकळत तिचें एक पाऊल उंबऱ्याचे आंत पडलें, आणि शेवटीं ती एकदांची कोठडींत शिरली.

कोठडींत आल्यावर राजपुत्राचें दर्शन होतांच पुनः तिची मति खुंटली आणि पुनः दरवाजाजवळच्या भिंतीला टेंकून तोंड खालीं घालून ती उभी राहिली.

राजपुत्रानें तिलोत्तमेला एकदम ओळखिलें नाहीं. कोणी स्त्री आंत आली असें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. ती रमणी भिंतीला धरून अधोमुखी होऊन उभी आहे, ती पुढें येत नाहीं, याचेंही त्याला नवल वाटलें. तेव्हां बिछान्यावरून उठून तो दरवाजाशीं आला आणि त्यानें त्या स्त्रीकडे नीट निरखून पाहिलें, तों ती त्याच्या ओळखीचीच निघाली.

क्षणमात्र त्यांची दृष्टादृष्ट झाली. तोंच तिलोत्तमेनें आपली दृष्टि पृथ्वीकडे लवविली. परंतु तिचें शरीर मात्र अंमळ पुढें कललें व आतां राजपुत्राच्या पायावर ती पडत आहे कीं काय, असा भास होऊं लागला.

राजपुत्र अंमळ मागें सरला व उभा राहिला. यामुळें तात्काळ तिलोत्तमेचा देह मंत्रमुग्धवत् स्तंभित होऊन स्थिर राहिला, व त्याबरोबर नुकतेंच फुललेलें तिचें हृत्कमल

पुनः कोमेजून गेलें. राजपुत्रानें विचारिलें, आपण 'वीरेंद्रसिंहाच्या कन्या काय?'

हें ऐकतांच तिलोत्तमेच्या हृदयांत जणूं बाण खोंचला. 'काय, आपण वीरेंद्रसिंहाच्या कन्या काय?' ह्यावेळीं आणि हें असें हाक मारणें! जगत्सिंह 'तिलोत्तमा' हें नांव देखील कां विसरून गेला? दोघेंही कांहीं वेळ मुग्ध राहिलीं. पुनः राजपुत्रानें तिला विचारिलें, 'येथें कां आलां आहां?'

'येथें कां आलां आहां?' हा प्रश्न काय? तिलोत्तमेचें मस्तक फिरूं लागलें. चोहोंबाजूंनीं खोली, बिछाना, दिवा आणि भिंत हीं सर्व गरगर फिरताहेतसें तिला वाटूं लागलें. झोंक न जावा म्हणून तिनें भिंतीला डोकें टेंकलें. व डोळे मिटून खालीं तोंड करून ती मुकाट्यानें उभी राहिली.

कांहीं जबाब मिळेल या आशेनें बराच वेळ राजपुत्र तेथें उभा राहिला; पण जबाब कोण देणार? उत्तर मिळण्याची आतां आशा राहिली नाहीं असें पाहून तो म्हणाला, आपल्याला दुःख होत आहे, आपण परत जा, आणि मागचें सर्व विसरा.'

तिलोत्तमेला आतां मात्र भ्रम राहिला नाहीं. झाडाचा आधार सुटून अकस्मात् जशी एखादी वेल झाडावरून खालीं पडते, तशी ती जमिनीवर धाडकन् पडली.

---

# प्रकरण १४ वें.

## मूर्च्छा.

जगत्सिंह खालीं वांकून पाहूं लागला, तों तिलोत्तमा अगदीं बेशुद्ध पडली आहे. तो आपल्या अंगवस्त्राच्या पदरानें तिला वारा घालूं लागला, तरी तिला शुद्धि येण्याचें कांहींच चिन्ह दिसेना. तेव्हां त्यानें पहारेकऱ्याला हांक मारिली.

तिलोत्तमेचा मार्गदर्शक त्याजपाशीं आला. त्याला जगत्सिंहानें सांगितलें, 'अकस्मात् ही मूर्च्छित होऊन पडली आहे. हिच्याबरोबर कोण आलें आहे त्याला घेऊन या, व हिला सावध करण्यास सांगा.'

पहारेकरी म्हणाला, 'मीच यांच्याबरोबर आलों आहें.'

राजपुत्रानें आश्चर्यानें विचारिलें. 'कोण, तुम्हीं ?'

पहारेकरी म्हणाला, 'दुसरें कोणीही आलें नाहीं.'

'मग आतां काय उपाय योजावा ? किल्ल्यांतील कोणा दासीला इकडे येण्याविषयीं सांगून पाठवा.'

पहारेकरी जाऊं लागला. राजपुत्रानें त्यास परत हाक मारून सांगितलें; 'ऐका, दुसऱ्या कोणाला सांगितलें तर फार गडबड होईल, आणि त्यांतही आजची मौज सोडून इकडे येण्यास कोण बसलें आहे ?'

पहारेकरी म्हणाला, 'तेंही खरें आहे; दुसऱ्या कोणालाही या बंदिशाळेंत पहारेकरी येऊं देतील काय ? दुसऱ्या कोणाला येथें आणण्याला मला तर धीर होत नाहीं.'

हें ऐकून राजपुत्र म्हणाला, ‘ मग तर काय करावें बरें ? याला फक्त एकच उपाय आहे; तुम्हीं झटकन् कोणा दासीकडून नबाबांच्या कन्येला हा वृत्तांत कळवा. ’

पहारेकरी धाईधाईनें तसें करण्यास निघून गेला. राजपुत्र आपल्याकडून होईल तितकी तिलोत्तमेची सेवा चाकरी करूं लागला. त्या वेळीं त्याचे मनांत काय काय विचार येत होते ते कोणाला सांगतां येतील काय ? त्याच्या डोळ्यांत अश्रु आले होते कीं नाहीं, तें तरी कोणी सांगेल काय ?

राजपुत्र बंदिखान्यांत तिलोत्तमेला एकटा घेऊन बसला असतां अत्यंत घाबरून गेला. त्याला असें वाटूं लागलें कीं, जर आयेषेला ही खबर पोहोंचलीच नाहीं, अथवा तिला जर ह्या गोष्टीला कांहीं उपायच योजतां आला नाहीं तर कसें बरें होईल ?

तिलोत्तमा थोडथोडी शुद्धीवर येऊं लागली; तेव्हां जगत्सिंहानें त्या उघड्या दरवाजांतून पाहिलें तों तिकडून एका पहारेकऱ्याबरोबर कोणी दोन स्त्रिया येत आहेत, असें त्याला दिसलें. त्यांपैकीं एकीनें मात्र बुरखा घेतला होता. दुरून देखील त्या बुरखा घेतलेल्या स्त्रीचें उन्नत शरीर, संगीताप्रमाणें मधुर असा तिचा पदविन्यास, व तिच्या मानेची अत्यंत सुंदर ठेवण पाहून राजपुत्रानें ताडिलें कीं, दासीला बरोबर घेऊन ही आयेषा स्वतः आली असावी, व त्यामुळें त्याला थोडीशी आशाही निपजली.

आयेषा आणि दासी त्या पहारेकऱ्याबरोबर कैदखान्याच्या दरवाजापर्यंत आलेल्या पाहून अंगठी आणणाऱ्या

त्या पाहारेकऱ्याला तेथील द्वाररक्षक विचारूं लागले, 'यांनांही जाऊं द्यावयाचें कीं काय ?'

तो म्हणाला, 'ते तुम्हाला ठाऊक भाई, मी कांहीं तें जाणत नाहीं.' रक्षकानें 'ठीक आहे' असें म्हणून त्या उभय स्त्रियांना आंत येण्याविषयीं बंदी केली. मनाईचे शब्द ऐकून आयेषा तोंडावरचा बुरखा काढून म्हणाली, 'अरे पहारेकरी ! मला जाऊं दे; मला आंत जाऊं देण्याबद्दल तुझें कांहीं बरेंवाईट झालें तर मग तूं मला दोष दे.'

पहारेकरी आयेषेला ओळखीत नव्हता, पण त्या दुसरीनें त्याला गुपचुप ती कोण आहे हें सांगितलें. पहारेकरी एकदम आश्चर्यचकित होऊन मोठ्या अदबीनें लवून सलाम करून आणि हात जोडून म्हणाला, 'मज दीनाचा हा अपराध माफ व्हावा; आपणांस कोठेंही जाण्याची बंदी नाहीं.'

आयेषेनें बंदिशाळेंत प्रवेश केला. त्यावेळीं ती हंसत नव्हती, तरी तिचें स्वाभाविकच हंसतमुख होतें, त्यामुळें पाहणाराला असें वाटे कीं, ती हंसतेच आहे. तिचा प्रवेश बंदिशाळेंत झाल्यावर बंदिशाळेचें बंदिशाळापणच नाहींसें झालें. त्यावेळीं ही बंदिशाळा आहे असें कोणाच्यानेंही म्हणवलें नसतें.

आयेषा राजपुत्राला अभिवादन करून म्हणाली, 'राजपुत्रा ! हें कसें काय घडलें ?'

राजपुत्र काय जबाब देणार ? कांहींच न बोलतां त्यानें फक्त त्या भूतलशायिनी तिलोत्तमेकडे बोट केलें.

आयेषेनें तिलोत्तमेला पाहून विचारिलें, 'ही कोण आहे?'

राजपुत्र मोठ्या संकोचानें म्हणाला, 'ही वीरेंद्रसिंहाची कन्या आहे.'

आयेषा तिलोत्तमेला मांडीवर घेऊन बसली. दुसरें कोणी असतें, तर तें तसें करण्यास मागेंपुढें पहातें; असें केलें तर असें होईल, तसें केलें तर तसें होईल, असा विचार करीतच राहतें, पण आयेषेनें ती तिलोत्तमा आहे असें कळतांच तिला चटकन् आपल्या मांडीवर घेतलें.

आयेषा जें कांहीं करी तें सुंदरच दिसे; प्रत्येक काम ती जें करी तें सुंदरच करी. आयेषा तिलोत्तमेला मांडीवर घेऊन जेव्हां बसली तेव्हां जगत्सिंह आणि ती दासी या दोघांनांही वाटलें कीं, 'अहाहा! हें किती सुंदर चित्र आहे बरें!'

येतेवेळीं दासीजवळ आयेषेनें गुलाबपाणी, सरबत वगैरे लागणारे पदार्थ देऊन ठेविले होते, त्यांपैकीं तिनें तिच्या तोंडांत थोडें सरबत घातलें व तिच्या डोळ्यांना गुलाबपाणी लाविलें व डोक्यावर शिंपडलें आणि दासी तिला वारा घालूं लागली. आधींच तिलोत्तमेला थोडीशी शुद्धि येऊं लागली होतीच, तशांत तिला असे हे आयेषेचे उपचार जेव्हां होऊं लागले तेव्हां मग काय? हां हां म्हणतां ती चांगली शुद्धीवर आली.

चोहोंकडे पाहिल्याबरोबर तिला पूर्ववृत्त आठवलें, त्याबरोबरच ती त्या खोलींतून निघून गेली असती; परंतु त्या रात्रीच्या शारीरिक आणि मानसिक श्रमातिशयामुळें व ती अगोदर फार क्षीण झाली होती त्यामुळें, ती फार थकून गेली

होती, आणि म्हणूनच तिच्यानें जाववलें नाहीं. पहिल्या गोष्टीचें स्मरण झाल्याबरोबर तिचें डोकें फिरूं लागलें व ती मटकन खालीं बसली. आयेषा तिचा हात धरून म्हणाली, ‘ बये,—भगिनी ! तूं कां बरें अशी भितेस ? तूं आतां फार क्षीण झाली आहेस, म्हणून माझ्या खोलींत जाऊन अंमळ विश्रांति घे. चल, मग तुझी इच्छा असेल तिकडे तुला पाठवून देईन.’

तिलोत्तमेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. आयेषेनें त्या पहारेकऱ्याला तिची हकीकत विचारिली; तेव्हां त्याला जितकी माहीत होती तितकी त्यानें सांगितली. तें ऐकून आयेषेनें तिलोत्तमेला आपल्याबरोबर येण्याची शंका वाटत आहे असें समजून ती तिला म्हणाली, ‘तूं मजवर असा अविश्वास कां बरें ठेवितेस ? मी तुझ्या शत्रूची कन्या आहे खरी, परंतु त्यामुळें तूं मी विश्वास ठेवण्यास पात्र नाहीं असें मात्र समजूं नको. मजकडून कोणतीही गोष्ट फुटली जाणार नाहीं, याची अगदीं खात्री ठेव. रात्र संपते आहे न संपते आहे तोंच तुला कोठें जाणें असेल तिकडे दासीबरोबर देऊन पाठवून देईन; पण कोणी, कोणाला, कोठेंही ही गोष्ट सांगूं नये बरें कां ? ’

हें सर्व आयेषा इतक्या गोड स्वरानें बोलली कीं, तिलोत्तमेला तिचा अगदींसुद्धां अविश्वास वाटला नाहीं; तिला आतां चालण्यासारखी शक्ति नव्हती, आणि जगत्सिंहापाशीं तर बसतां येत नव्हतें; म्हणून ती त्यांजबरोबर निघावयास कबूल झाली. तेव्हां आयेषा म्हणाली, ‘ तुझ्यानें तर चालवत नाहीं, म्हणून तूं या दासीचा हात धरून चल. ’

तिलोत्तमा दासीच्या खांद्यावर हात ठेवून तिच्या आधारानें हळूहळू चालूं लागली. आयेषाही राजपुत्रापासून जाण्यास निघाली. तेव्हां राजपुत्रानें तिच्या तोंडाकडे अशा रीतीनें पाहिलें कीं, ह्याचे मनांत आपल्याशीं कांहीं तरी बोलावयाचें आहे, असें आयेषेला वाटलें; ती त्याचा तो भाव समजून दासीला म्हणाली, 'तूं हिला माझ्या निजण्याच्या खोलींत नेऊन पलंगावर निजीव, आणि मग पुनः मला घेऊन जाण्याकरितां परत ये.'

दासी तिलोत्तमेला घेऊन चालली तेव्हां जगत्सिंह मनांत म्हणाला, 'तुमची आमची ही आतां शेवटचीच भेट,' व त्यानें एक मोठा उसासा टाकिला आणि तो स्तब्ध बसला. दारांतून जोंपर्यंत तिलोत्तमा त्याला दिसत होती तोंपर्यंत तो तिजकडे एकसारखा पहात होता.

तिलोत्तमेला वाटलें कीं, 'ही ह्यांची व माझी शेवटचीच भेट आहे.' जोंपर्यंत ती त्याच्या दृष्टीस पडत होती तोंपर्यंत तिनें मागें वळून पाहिलें नाहीं, आणि जेव्हां तिनें मागें वळून पाहिलें, तेव्हां जगत्सिंह तिच्या दृष्टी आड झाला होता.

अंगठी आणणारा तिलोत्तमेपाशीं येऊन म्हणाला, 'मग मी आतां जाऊं?'

तिलोत्तमा कांहींही बोलली नाहीं; परंतु दासी म्हणाली, 'जा.' तेव्हां पहारेकरी म्हणाला, 'आपणापाशीं जी खुणेची अंगठी आहे ती मला परत द्या.'

तिलोत्तमेनें अंगठी काढिली व त्याला दिली. ती घेऊन तो पहारेकरी निघून चालता झाला.

# प्रकरण १५ वें.

## उघड उघड.

तिलोत्तमा आणि दासी खोलींतून निघून गेल्यावर आयेषा बिछान्यावर जाऊन बसली; कारण तेथें बसावयास दुसरें कांहींच नव्हतें. जगत्सिंह जवळ उभा राहिला.

आयेषेनें आपल्या वेणींतील एक गुलाबाचें फूल काढून आपल्या हातांत घेतलें व त्याची एक एक पाकळी तोडीत तोडीत ती म्हणाली, 'राजपुत्र, आपल्या मुखचर्येवरून आपल्याला मजपाशीं कांहीं बोलावयाचें आहे असें वाटतें. माझ्या हातून कांहीं आपलें कार्य होण्यासारखें असल्यास तें मला सांगावयास अगदीं संकोच करूं नका. मी आपलें काम मोठ्या आनंदानें करीन.'

राजकुमार म्हणाला, 'नबाबकन्ये, तसें मला आपल्याशीं कांहीं विशेष काम नाहीं; व त्याकरितां आपल्या भेटीची मी इच्छाही केली नव्हती. माझें आपल्याला इतकेंच सांगणें आहे कीं, सांप्रत मी ज्या स्थितीला येऊन पोंचलों आहें त्या स्थितीतून सुटून पुनः आपलें दर्शन होईल असें मला वाटत नाहीं. आपण विचार करून पहा, आपल्यालाही असेंच दिसून येईल. आपण ज्या ऋणपाशानें मला पक्कें बांधून टाकिलें आहे, त्या पाशांतून नुसत्या शब्दांनीं का माझी सुटका होणार आहे? बरें, दुसरें कांहीं करून तरी त्या पाशांतून मुक्त होईन असा माझ्या नशिबाचा भरंसाही वाटत नाहीं. तरीपण मी आपली

इतकी प्रार्थना करून ठेवितों कीं, जर कांहीं आपलें काम माझ्यानें होण्यासारखें असेल, जर हे दिवस जाऊन दुसरे दिवस येतील, तर मला कोणतीही आज्ञा करण्याचा आपण अगदीं संकोच करूं नये. ज्याप्रमाणें बहीण आपल्या भावाला कोणतेंही काम सांगावयास संकोच करीत नाहीं तसेंच आपणही करावें.'

हें बोलत असतांना जगत्सिंहाचा आवाज इतका कांहीं दुःखमय व नैराश्यव्यंजक झाला होता कीं, तो ऐकून आयेषेलाही अतिशय दुःख झालें व ती म्हणाली, 'आपण इतके निराश कां होतां बरें? आपली ही स्थिति अशीच का कायम रहाणार आहे?'

जगत्सिंह म्हणाला, 'मी निराश झालों नाहीं; पण आतां मला आशा करण्याची मुळीं इच्छाच होत नाहीं. या जीवनाचा त्याग करण्याशिवाय हें जीवन धारण करण्याची मला दुसरी इच्छाच नाहीं. बरें हा कैदखाना सोडण्याचीही मला इच्छा होत नाहीं.'

राजपुत्र हे शब्द इतके करुणस्वरानें बोलला कीं, तें ऐकून आयेषेला फार आश्चर्य वाटलें, व अती दुःखही झालें. त्यावेळीं नबाबकन्येला मी नबाबाची मुलगी आहें असें भानच राहिलें नाहीं. ती अपपरता विरसली; प्रेमपूर्ण अशी स्त्रीच ती! तिनें आपल्या जातीप्रमाणें जिवाचा मोठा धडा करून आपल्या कोमल करपल्लवानें राजपुत्राचा हात धरिला, पण तिनें तो लागलाच सोडून दिला, व आपली दृष्टि त्याच्या मुखाकडे लावून ती म्हणाली, ' जगत्! इतकें दारुण दुःख आपण कां सोशीत आहां? मला आपण

परकी समजूं नका. आपण सांगाल तर मी विचारितें–वीरेंद्रसिंहाची कन्या कोण–?'

आयेषेचें बोलणें संपतें न संपतें आहे तोंच राजकुमार म्हणाला, 'त्या गोष्टीशीं आतां काय करावयाचें आहे? तें स्वप्न नाहींसें झालें आहे.'

हें ऐकून आयेषा स्तब्ध राहिली, जगत्सिंहही स्तब्ध राहिला; दोघेंही बराच वेळपर्यंत स्तब्ध होऊन राहिलीं. आयेषा आपली मान खालीं घालून बसली.

राजपुत्र एकदम दचकला. त्याच्या हातावर कढत कढत पाण्याचे थेंब पडले. जगत्सिंह खालीं वांकून आयेषेच्या तोंडाकडे पाहूं लागला, तों ती रडत आहे, व तिच्या त्या शुभ्र गालांवरून अश्रुधारा सारख्या वहात आहेत, असें त्याला दिसलें.

राजपुत्र आश्चर्य पावून म्हणाला, 'हें काय? आयेषे, आपण कां बरें रडतां?'

आयेषेनें कांहींही उत्तर न देतां हळूहळू हातांतील गुलाबाचें फूल मोडून टाकिलें; फुलाचे शेंकडों लहान लहान तुकडे करून टाकिल्यावर ती म्हणाली, 'युवराज! आज आपल्यापासून अशा रीतीनें निरोप घेण्याचा प्रसंग येईल हें माझ्या ध्यानींमनींही नव्हतें. माझ्यावर कितीही संकटें आलीं तरी मी तीं सोशीन, पण आपल्याला या कैद-खान्यांत हें मनःपीडेचें दुःख सहन करीत एकटें सोडून जाण्याचें माझें धैर्य होत नाहीं. जगत्सिंह! आपण मज-बरोबर बाहेर चला, तबेल्यांतून मी आपणांस घोडा आणून

देवविलें, तो घेऊन आज रात्रींच्या रात्रीं आपल्या छावणींत जा.'

त्यावेळीं जगत्सिंहाची इष्टदेवी भवानी साक्षात् येऊन जरी 'वर माग' असें त्याला म्हणती तरी त्याला आश्चर्य वाटलें नसतें, एतकें त्या तशा तिच्या बोलण्यानें वाटलें. राजपुत्राच्यानें तिला पहिल्यानें उत्तरच देववेना, तेव्हां आयेषा पुनः म्हणाली, 'जगत्सिंह! राजकुमार चला.'

बराच वेळ गेल्यावर जगत्सिंह म्हणाला, 'आयेषे! आपण मला कैदखान्यांतून मुक्त कां करितां?'

आयेषा म्हणाली, 'होय, याचक्षणीं.'

जगत्सिंह म्हणाला, 'आपल्या पित्याच्या आज्ञेनें का?'

आयेषा म्हणाली, 'आपण त्याबद्दल अगदीं निश्चिंत असावें. आपण आपल्या छावणींत सुखरूप पोहोंचल्यावर मी त्यांना सर्व कांहीं सांगेन.'

जगत्सिंहानें विचारिलें, 'पहारेकरी कसे जाऊं देतील?'

आयेषा गळ्यांतून एक रत्नहार काढून व तो त्यास दाखवून म्हणाली, 'या इनामाच्या आशेनें ते आपल्यास जाऊं देतील.'

राजपुत्रानें पुनः विचारिलें, 'ही गोष्ट आपल्या पित्याला कळल्यास ते आपले हाल हाल करितील, मग कसें?'

आयेषा म्हणाली, 'मग, मी कोठें त्याची काळजी करित्यें आहे?'

जगत्सिंह म्हणाला, 'आयेषे, मी नाहीं जात.'

हें ऐकून आयेषेचें मुख म्लान होऊन गेलें. ती दिल- गीर होऊन म्हणाली, ' कां बरें ? '

जगत्सिंह म्हणाला, ' आपण मला जीवदान दिलें आहे. तेव्हां आपल्याला ज्यापासून दुःख होईल अशी गोष्ट मी कधींही करणार नाहीं. '

हें ऐकून आयेषेचा गळा भरून आला व तिनें विचा- रिलें ' मग नाहींच का यावयाचें ? '

राजकुमार म्हणाला, ' आपण एकट्याच जा. '

आयेषा पुनः मुग्ध होऊन बसली. पुनः तिच्या डोळ्यां- तून घळघळां अश्रुधारा पडूं लागल्या; तिला रडूं आवरे- नासें झालें.

आयेषेला अशी मुकाट्यानें रडतांना पाहून जगत्सिहाला आश्चर्य वाटलें व तो म्हणाला, ' आयेषे ! आपण कां बरें अशा रडतां ? '

आयेषा कांहीं बोलेना. राजपुत्र पुनः म्हणाला, ' आयेषे ! माझें म्हणणें ऐका, रडण्याचें कारण मला सांगण्यासारखें अ- सेल तर सांगण्यास अगदीं अनुमान करूं नका. तुमच्या ह्या मुकाट्यानें रडण्याचें कारण नाहींसें करण्याकरितां मला माझा जीव जरी खर्ची घालावा लागला, तरी मी तो खर्ची घालण्यास तयार आहे. मी जो हा कारागृहवास पत्करिला आहे, त्या- चमुळें केवळ हे अश्रु आपल्या नेत्रावाटे बाहेर पडत आहेत असें मला नाहीं वाटत; आपल्या पित्याच्या कारागृहांत मज- सारखे दुसरे अनेक बंदिवान दुःख भोगीत पडले आहेत. '

आयेषेनें राजपुत्राच्या प्रश्नाचें कांहींच उत्तर न देतां पदरानें आपले डोळे पुशिले, आणि क्षणभर कांहीं न बो-

लतां स्वस्थ होऊन ती म्हणाली, 'राजपुत्र! इतःपर मी अगदीं रडणार नाहीं.'

आपल्या प्रश्नाचा जबाब मिळाला नाहीं असें पाहून राजपुत्राला बरेंच वाईट वाटलें व पुनः तीं दोघे खालीं मान घालून स्तब्ध बसली; इतक्यांत खोलीच्या भिंतीवर एका व्यक्तीची छाया पडली, पण हें कोणाच्या पाहण्यांत आलें नाहीं. ती तिसरी व्यक्ति त्या दोघांपाशीं येऊन उभी राहिली; तरी तिजकडे कोणीही पाहिलें नाहीं. क्षणैक स्तंभाप्रमाणें स्थिर उभ राहून नंतर रागानें कांपणाऱ्या आवाजानें ती व्यक्ति म्हणाली, 'नबाब कन्ये! फार उत्तम.'

हे शब्द ऐकतांच त्या दोघांनीं वर पाहिलें, तों पुढें उसमान उभा आहे!

उसमान अंगठी दाखविणाऱ्या आपल्या चाकरापासून सर्व हकीकत समजून घेऊन, तीवरूनच आयेषेचा शोध करण्याकरितां तेथें आला होता. उसमान तेथें अवचित आलेला पाहून राजपुत्रास आयेषेसंबंधीं मोठी धास्ती पडली व त्यामुळें कदाचित् आयेषेचा, उसमान आणि कतलुखान यांजकडून अपमान किंवा तिरस्कार होईल असें त्याला वाटूं लागलें. उसमान ज्या क्रोधप्रकाशक स्वरानें ती व्यंगोक्ति बोलला होता, त्यावरून तसें होण्याचा संभवही होता. व्यंगोक्ति ऐकतांच आयेषा उसमानच्या मनांतील सर्व मतलब समजून चुकली. क्षणमात्र रागानें तिचें तोंड लाल मात्र झालें, पण दुसरें कोणतेंही अधैर्याचें चिन्ह तिच्या चेहऱ्यावर दिसून आलें नाहीं. तिनें शांत स्वरानें त्याला विचारिलें, 'काय उत्तम आहे, उसमान?'

उसमान पहिल्याच आवाजानें म्हणाला, ' रात्रीं एकटें बंदिवानाशीं गोष्टी सांगत बसणें, हें नवाबाच्या मुलीला फारच उत्तम शोभतें. बंदिवानाला भेटण्यासाठीं रात्रींच्या प्रहरीं नियमाविरुद्ध कैदखान्यांत प्रवेश करणें, हेंही उत्तमच आहे.'

आयेषेच्या पवित्र चित्ताला हा तिरस्कार दुःसह झाला, व उसमानच्या तोंडाकडे पहात पहात ती बोलूं लागली. त्या वेळचा तिचा तो गर्वित स्वर उसमानाच्या पूर्वी कधींच ऐकण्यांत आलेला नव्हता. ती म्हणाली, ' इतक्या रात्रीं कैदखान्यांत एकटें येऊन बंदिवानाबरोबर हितगुज करणें ही माझी इच्छा आहे. माझें करणें उत्तम आहे किंवा वाईट आहे हें विचारण्याचें आपल्याला कांहीं कारण नाहीं.'

उसमानला आश्चर्य वाटलें, पण आश्चर्यापेक्षां त्याला फार राग आला व तो म्हणाला, ' कारण आहे किंवा नाहीं तें उद्यां सकाळीं नवाबाच्या तोंडानें ऐकशील.'

आयेषा पूर्वींच्याच आवाजानें म्हणाली, ' ज्यावेळीं बाबा मला विचारतील त्या वेळीं त्यांना मी जबाब देईन, आपण नका त्याची काळजी करूं.'

उसमान पहिल्याप्रमाणें व्यंगोक्तीनें म्हणाला ' बरें, मी विचारलें तर मग ?'

आयेषा एकदम उभी राहिली. कांहीं थोडावेळ पूर्ववत् तिनें स्थिर दृष्टीनें उसमानच्या तोंडाकडे पाहिलें. त्यावेळीं तिचे ते विशाळ नेत्र अधिकच मोठे झाले आहेत असें वाटूं लागलें; तिचें मुखपद्म नेहमींपेक्षां उमललेलें आहे असें दिसूं लागलें; भ्रमराप्रमाणें काळ्याभोर केसांसह तिचा

शिरोदेश किंचित् एका बाजूला सरला आहेसें वाटलें. तिचें हृदय दाट शेवाळें ज्यावर उगवलें आहे असें पाणी जसें वाऱ्याच्या जोरानें हेलकावे खातें तसें वर खालीं होऊं लागलें. अति स्पष्ट आवाजानें आयेषा म्हणाली 'उसमान, जर तूं विचारतोसच आहेस तर मीही सांगतें कीं, हा बंदिवान माझा प्राणेश्वर आहे. समजलास?'

त्या कोठडींत तत्क्षणीं जर वीज पडली असती तर तो रजपूत किंवा पठाण ह्यापेक्षां जास्ती चमकला नसता. राजपुत्राच्या हृदयांत जसा अंधःकारांत कोणी दिवा नेऊन लावावा त्याप्रमाणें उजेड पडला. आयेषेच्या मनांतले मनांत रडण्याचें कारण त्याला आतां समजून आलें. उसमानालाही कांहीं कांहीं गोष्टींवरून असें असेल असा फार दिवस संशय होताच, आणि त्यामुळें तो आयेषेचा असा तिरस्कार करीत असे; पण आयेषा असें आपल्या तोंडावर उघड बोलेल हें त्याचे स्वप्नींही नव्हतें. उसमान निरुत्तर होऊन स्वस्थ राहिला.

आयेषा पुनः बोलूं लागली, 'ऐक, उसमान, मी पुनः सांगतें कीं, हा बंदिवान माझा प्राणेश्वर आहे—जोंपर्यंत या देहांत जीव आहे, तोंपर्यंत—दुसऱ्या कोणाला ह्या हृदयांत जागा मिळणें नाहीं.—उद्यां जरी ह्यांच्या रक्तानें वधस्थान भिजून गेलें' असें बोलतां बोलतां आयेषेच्या अंगावर रोमांच उभे राहिले, "तरी ह्या मूर्तीची स्थापना माझ्या हृदयमंदिरांत करून अंतकालपर्यंत मी तिची आराधना करीन असें तुझ्या दृष्टीस पडेल. आणखी एका क्षणानंतर ह्यांचें दर्शन मला यावज्जीव जरी पुनः घडलें नाहीं, उद्यां जरी हे

सुटून शेंकडों स्त्रियांच्या प्रेमपाशांत मुग्ध होऊन राहिले, आयेषेच्या नांवाचा धिक्कार करूं लागले, तरी मी ह्यांची प्रेमाकांक्षा करणारी दासी होऊन राहीन.'

' आणखी सांगत्यें ऐक. तुझ्या मनांत येईलच कीं, मी एकटी बसून ह्यांच्याशीं काय हितगूज करीत होतें तें ! मी त्यांना सांगितलें कीं, मी पाहारेकऱ्यांना बोलून म्हणा किंवा धन देऊन म्हणा वश करून घेतें, बाबांच्या खास तबेल्यांतून घोडा आणून देतें, व त्यावर आपण स्वार होऊन आपल्या वडिलांच्या छावणींत निघून जा. पण ह्यांनीं स्वतः पळून जाण्याचें नाकारिलें, नाहीं तर ह्या वेळेस तुझ्या दृष्टीस ह्याचें नखही न पडतें.'

आयेषेनें पुनः डोळे पुशिले. कांहीं वेळ ती स्तब्ध राहिली, व नंतर दुसऱ्याच स्वरानें म्हणाली, ' उसमान, हें सगळें सांगून तुला मी क्लेश देत आहें, त्याबद्दल मला तूं क्षमा कर.'

' तूं माझ्यावर प्रेम करितोस, मींही तुजवर प्रेम करितें, तेव्हां मला तुझ्याशीं असें आचरण करणें अनुचित आहे; परंतु तूं आयेषेला आज अविश्वासी म्हणून समजतो आहेस, पण आयेषा दुसरे कोणतेही अपराध करो ती अविश्वासी नाहीं. आयेषा जें कांहीं कारते तें ती दुसऱ्या कोणालाही उघड उघड सांगावयास भीत नाहीं. ह्यावेळीं तुजजवळ जें कांहीं मी बोलत आहे तें जरूर पडल्यास मी उद्यां बाबांना देखील सांगेन.'

नंतर ती जगत्सिंहाकडे वळून म्हणाली, ' राजपुत्र, आपणही माझ्या अपराधांची क्षमा करा. उसमान आज

जर माझ्या मनाला पीडा न देता, तर या कामदग्ध हृदयाचा संताप कधींही आपल्याला दृष्टीस न पडता. इतकेंच नव्हे, तर काळत्रयींही तो कोणाच्या कानीं सुद्धां पडला नसता.'

राजपुत्र मुकाट्यानें उभा होता खरा; पण त्याचें यावेळीं हृदय संतापानें जळत होतें.

उसमानही कांहीं बोलला नाहीं. आयेषा पुनः म्हणाली, 'उसमान, पुनः एकवार मी तुला सांगतें कीं, मजकडून कांहीं दोष घडला असल्यास मला त्याबद्दल क्षमा कर. मी तुझी पूर्वीप्रमाणेंच स्नेह करणारी बहीण आहे. आणि बहीण म्हणून पूर्वीच्या आपल्या प्रेमांत तिळभरही न्यून तूं पाडूं नको. केवळ प्राक्तनाच्या दोषामुळें या दुःखसागरांत मी उडी घातली आहे. पण तूं भ्रातृप्रेमाविषयीं निराश होऊन मला ह्या अगाध सागरांत मात्र बुडूं देऊं नकोस !'

असें बोलून ती सुंदरी दासीच्या येण्याची वाट न पाहतां तेथून एकटीच बाहेर पडली. उसमानही कांहीं वेळ दुःखानें गांजून गेल्याप्रमाणें कांहीं न बोलतां तेथें तसाच उभा राहून नंतर आपल्या महालांत निघून गेला.

# प्रकरण १६ वें.

## स्वामींच्या चरणांपाशीं.

ज्या दिवशीं रात्रीं कतलुखानाच्या विलासगृहांत नृत्य चाललें होतें. त्यावेळीं तेथें कोणी बाहेरच्या नाचणाऱ्या आणिल्या नव्हत्या किंवा कोणी बाहेरचे ऐकणारेही नव्हते. मोंगल बादशाहा आपआपले वाढदिवस ज्याप्रमाणें आपल्या दरबारी लोकांबरोबर मोठ्या आनंदानें घालवीत असत, त्याप्रमाणें कतलुखानाचें नसे. त्याचें मन आपल्या एकट्याला कसा सुखाचा उपभोग घ्यावयास सांपडेल ह्या विचारांत एकसारखें गढलेलें असे व आपल्या सर्व इंद्रियांना कोणत्या रीतीनें तृप्त करावें हीच काय ती त्याला नेहमींची काळजी असे. आज रात्रीं तो एकटाच आपल्या विलास-गृहांत राहणाऱ्या स्त्रियांच्या भर गर्दीत त्यांच गाणें व नाचणें ऐकण्याच्या व पाहण्याच्या रंगांत गुंग होऊन गेला होता. विलासगृहांत खोजे लोकांशिवाय इतर पुरुषांस येण्याची सक्त मनाई होती. कित्येक स्त्रिया नाचत होत्या, कित्येक गात होत्या, कित्येक वाद्यें वाजवीत होत्या व बाकीच्या कतलुखानाच्या भोंवतीं घेरा घालून ऐकत असल्या होत्या.

इंद्रियांना मोहून टाकणारी सामुग्री तेथें रेलचेल भरून राहिली होती. प्रिय वाचकहो ! चला आपण त्या विलास-गृहांत प्रवेश करूं. प्रवेश करितांक्षणींच एकसारख्या शिंपड-लेल्या गुलाबपाण्याच्या मधुर वासानें पहा कसें सर्वांग थंड

होऊन जात आहे तें! अगणित चांदीच्या, हस्तिदंताच्या व कांचेच्या शामदानांतून सुगंधी तेलाच्या दिव्यांच्या झगझगाटानें डोळे नुस्ते दिपून जात आहेत! अपरिमित पुष्पराशी, कोठें माळा, कोठें खांब, कोठें नुस्ते ढीगचे ढीग, कोठें तुरे, कोठें वेण्या, कोठें हार, कोठें गजरे अशा रूपानें पसरून, या दीपप्रकाशाला जास्तच शोभा आणीत आहेत. कोणा स्त्रियांचे हातांत फुलांचे पंखे केलेले आहेत, कोणी तर सगळे दागिनेच फुलांचे बनविले आहेत, व कांहीं स्त्रिया एकमेकींच्या अंगावर एकसारख्या फुलें उधळून राहिल्या आहेत. फुलांचा सुगंध, गुलाबपाण्याचा सुगंध, सुवासिक तेलाच्या दिव्यांचा सुगंध, सुगंधि उटणीं लाविलेल्या विलासिनींच्या अंगाचा सुगंध, जिकडे पहावें तिकडे सुगंधि सुगंध. जिकडे तिकडे दिव्यांचें तेज, फुलांचें तेज, व त्या सुंदर स्त्रियांच्या आभरणांचे तेज फांकून राहिलें आहे, पण ह्या सर्व तेजसमूहाला एकसारख्या कटाक्षांचा वर्षाव करणाऱ्या कामिनीमंडळांचा डोळ्यांचें तेज मागें टाकीत आहे. सप्तसुरसंमिलित वीणादि वाद्यांचा मधुर ध्वनि आकाश व्यापून राहिला आहे, व त्याजबरोबर अधिक स्पष्ट व अधिक मधुर असा स्त्रियांच्या कंठांतून निघणारा गाण्याचा आवाज मिसळून गेला आहे. ह्या सर्व नादब्रह्मांत नर्तकींच्या ताललयमिलित पडणाऱ्या पावलांच्या रुमझुमण्यानें मन मोहून जात आहे.

प्रिय वाचकहो! ही पहा! पद्मवनामध्यें जशी हंसी वाऱ्याच्या जोरानें वर खालीं होणाऱ्या पाण्याच्या लाटावर अलग तरंगत राहते, त्याप्रमाणें कशी नाचते आहे

ती! तिच्या भोंवती पहा! फुललेल्या कमळाप्रमाणें मुखांच्या स्त्रिया कशा घेरा घालून उभ्या राहिल्या आहेत ह्या पहा! पहा! ही निळें वस्त्र नेसलेली स्त्री पहा! हिचा हा शालू जरीच्या कामानें कसा भरून गेला आहे, तो तर पहा! केवढाले हे तिचे डोळे! कसे मेघाप्रमाणें निळे आहेत! त्यांतून जे कटाक्ष निघताहेत ते तर प्रत्यक्ष विद्युतच! ह्या बिजावरा घातलेल्या स्त्रियेकडे तुमचे लक्ष गेलें आहे कां? तिचा तो सुंदर भांग व ज्यावर तो बिजवरा लटकतो आहे तें कपाळ, तुम्ही पाहिलेंत कां? अहाहा! किती सुंदर हें कपाळ! किती तरी हें प्रशांत, प्रशस्त व स्वच्छ आहे! अरेरे! पण अशा ह्या सुंदर कपाळावर विधात्यानें विलासगृहवास कां लिहावयाचा होता! ही फुलांचे डागिने घातलेली श्यामा तुम्ही पाहिलीत काय? हिचा ह्या श्यामवर्णाला हीं तऱ्हेतऱ्हेच्या रंगांचीं पुष्पाभरणें कशीं पण शोभा देताहेत! आह्मांला असें वाटतें कीं, रमणींच्या रमणीयत्वाला जास्ती शोभा आणण्यासाठींच ईश्वरानें हीं उत्पन्न केलीं आहेत, यांत कांहीं संशय नाहीं. ही पूर्ण सुंदर व लाल अधरोष्ठाची स्त्री ह्या बाजूला अंमळ एकीकडे उभी आहे तिच्याकडे तुमची नजर गेली आहे काय? पहा! हिचा अधरोष्ठ दांतांखालीं किंचित् दाबला गेल्यामुळें तिच्या त्या सुंदर चेहऱ्याला काय अपूर्व शोभा आली आहे ती! ही कां बरें अशी क्रुद्ध झाली आहे! हें अंतःपुर आहे! येथें एकाच वेळीं किती तरी मनोविकारांचें प्रबल युद्ध सुरू आहे, त्याचें वर्णन करणें आमच्या लेखणीला फार श्रम देईल; पण श्रम हा शब्द ह्या अशा मौजेच्या वेळीं

आम्ही काढाच कशाला! जाऊं द्या ही भामिनी! आपण आणखी पुढें जाऊं! अरे! ही एक चंद्रकळा नेसलेली सुंदरी आपल्या दृष्टीस पडत आहे! कायहो, हें ढाकयाचें अपूर्व चातुर्य! ही आमची सुंदरी वस्त्र तर नेसली आहे, पण त्यांतून हिची वर्णप्रभा तर स्पष्ट दिसत आहे! स्वच्छ काळ्याभोर पाण्यामध्यें जसें पौर्णिमेच्या चंद्राचें चांदणें दिसतें, त्याप्रमाणें हिचें हें चंद्रकळेंतून गौरांग दिसत आहे! काय असेल तें असो! अहाहा! ही हंसाच्याही मानेला लाज आणणारी स्त्री कोण? कायहो, हिच्या मानेचा हा झोंक! ही तर एकसारखी हंसते आहे व गोष्टी सांगत आहे; पण हिच्या कानांतील डूल कसे हालताहेत हें तुम्हीं पाहत आहां काय? ही इतक्या सुंदर केंसांची कोण बरें रमणी असावी? कां बरें हिनें आपले हें कुरळें केंस असे वक्षःस्थळापर्यंत पडूं दिले आहेत! कृष्णसर्प एखाद्या पद्मिनीला कसें वेटाळून राहतो, हें कां हिला दाखवावयाचें आहे?

अरे! ही कोण सुंदरी बरें! कतलुखानाजवळ बसून सोन्याच्या पेल्यानें त्याला मद्यप्राशन करवीत आहे ती! अरे! ही कोण बरें असावी? हिच्या ह्या पूर्णत्वाला पावलेल्या सुंदर देहाकडे इतक्या प्रेमानें कतलुखान कां बरें पाहत आहे? अरे ही एकसारख्या नेत्रकटाक्षांनीं कतलुखानाचें हृदय कां बरें भेदून टाकिते आहे! अरे! हे गोड कटाक्ष तर आमच्या ओळखीचे आहेत; बरोबर आहे. ही तर आपली विमला! पण इतकी सुरा कशाला बरें ह्याला पाजिते? पाजा, पाजा आणखी का पाजाना,—पण पदरा-

खालीं कट्यार आहेना ? आहे तर काय ! मग अशा कां बरें हंसत आहां ? कतलुखानानें तुमच्या चेहऱ्याकडे सारखी नजर लाविली आहे. हे काय ? कटाक्ष ! हें काय, पुनः कां ? पहा पहा ! तुम्ही तर ह्या सुरास्वादानें प्रमत्त झालेल्या यवनाला वेडें करून टाकिलें आहे. मला वाटतें कीं, ह्याच चातुर्यानें तुम्हीं सगळ्यांना मागें टाकून कतलुखानाचें अगदीं प्रेमपात्र बनून राहिला आहां. कां बरें बनून राहणार नाहीं ? असें हें हंसणें, हें मुरडणें, ह्या एकांतांतील प्रेमरसपूर्ण गोष्टी, आणि हे कटाक्ष, मग काय पाहावयावचें आहे. पुनः शराब ! कतलुखान सावध हो ! कतलुखान कांरतो काय ? विमला त्याच्याकडे कोणत्या रीतीनें पाहून मग त्याला तें सुरापात्र देत आहे, हें तुम्हीं कोठें पाहत आहां ? अहाहा ! हा कोणाचा आवाज ? हें कोण गातें आहे बरें ? हें मनुष्याचें कां गाणें आहे ? नाहीं; तर मग कोणी अप्सरा कां गात आहे ? ही आपली विमला गाणारणींबरोबर गात आहे. काय हा सूर ! काय हा आवाज, काय ही लय ! कतलुखान हें काय ? तुझें मन कोठें गेलें आहे ? पाहतो आहेस काय ? ती प्रत्येक समयाला तुला कटाक्षप्रहार करीत आहे. हे कटाक्ष कटारीपेक्षां तुझ्या हृदयांत अधिक खोल जात आहेत, हें कां पहातो आहेस ! हे नुस्ते कटाक्ष प्राण घ्यावयाचे; मग त्यांचा संगीताशीं संबंध झाल्यावर काय पाहवयाचें आहे ? प्रत्येक कटाक्ष प्रहाराबरोबर तिची ती मान थोडीशी हालते आहे, तिच्याकडे तुझें लक्ष आहे काय ? प्रत्येक मान हलविण्याबरोबर तिचे कानांतील डूल कसे हालत आहेत हें तूं पहात

आहेस काय? हाँ ! पुनः सुरा पाजा, द्या सुरा द्या, हें काय! हें काय विमला उठून नाचूं लागली आहे. किती तरी हें तिचें सुंदर नाचणें ! काय हे तिचें हावभाव ! पाजा सुरा ! काय हें तिचें अंग ! काय हा तिचा बांधा ! कतलुखान ! जाहां-पना ! स्थिर हो ! स्थिर हो ! तुझा कामानल भडकून का राहिला आहे ! ओहोहो ! कतलुखानाच्या शरीराची आग होऊन गेली आहे. मद्याचा का प्याला हवा आहे? दे प्याला ! मेरी प्यारी ! आणखी काय ? त्याच्यावर आणखी हंसणें व कटाक्षप्रहार ! शराब ! दे शराब !

कतलुखान वेडा होऊन गेला ! विमलेला हांक मारून म्हणाला, ' तूं कोठें आहेस प्रियतमे !'

विमला कतलुखानाच्या खांद्यावर एक हात टाकून म्हणाली, ' दासी स्वामींच्या चरणापाशींच आहे. ' दुसऱ्या हातीं—

तत्क्षणींच भयंकर आरोळी मारून कतलुखानानें वि-मलेला दूर ढकलून दिलें; आणि विमलाही आपण हो-ऊनच जमिनीवर धाडकन् पडली. विमलेनें त्याच्या पोटांत सबंध कटार खुपसून दिली होती !

' राक्षसणी, डाखिणी !' असें बोलून कतलुखान मो-ठ्यानें ओरडला. ओरडल्याबरोबर त्याच्या गळ्याशीं घरघर लागली: 'राक्षशीण नाहीं, डाखीण नाहीं, मीं वीरेंद्रसिंहाची विधवा स्त्री आहे बरें कां!' असें बोलून विमला त्या खोलीं-तून अति त्वरेनें पळून गेली.

कतलुखानाची बोलण्याची शक्ति ताबडतोब कमी होऊं लागली. तथापि होईल तितक्या जोरानें तो ओरडूं ला-

गला जनानखान्यांतील दुसऱ्या स्त्रियाही त्यांच्यानें ओरडवेल तितकें ओरडूं लागल्या. विमलाही ओरडत ओरडत पळत सुटली. दुसऱ्या खोलींत गेली, तेथें कोणी बोलत आहे असें तिला दिसलें. विमला धापा टाकीत पळत सुटली. पुढच्या तिसऱ्या खोलींत पाहते तों तेथें खोजे व पहारेकरी लोक बसले आहेत. त्यांनीं अंत:पुरांतील आरडाओरड ऐकून व ती अशी घाबरलेली पाहून विचारलें, 'काय? झालें आहे काय ?'

आमची विमला समयसूचकच होती. ती म्हणाली, 'सर्वस्वीं घात झाला आहे. धांवा आधीं, खोलींत चोर आले आहेत आणि मला वाटतें कीं, त्यांनीं नबाबांचा खून केला आहे.'

पहारेकरी आणि खोजे हें ऐकून जीव टाकीत पळत सुटले. विमलाही धांपा टाकीत तशीच अंत:पुराच्या दरवाजाकडे धांवत गेली. दरवाजावर पहारेकरी चैन करून थकून जाऊन स्वस्थ घोरत पडले होते, तें पाहून विमला बिनहरकत तो दरवाजा उघडून पुढें गेली. जिकडे तिकडे पहाऱ्यांची त्या दिवशीं हीच स्थिति असल्यामुळें ती बिनधोक आंतील सर्व दरवाजे उलटून गेली. बाहेरच्या दरवाजावर मात्र पहारेकरी जागत होते. त्यांतील एकजणानें विमलेला पाहून विचारिलें, 'कोण आहे? कोठें जातां?'

त्यावेळीं अंत:पुरांत एकच धामधूम उडून राहिली होती. सर्व लोक जागे होऊन तिकडेच एकसारखे धांवून जात होते. विमला त्याला म्हणाली, 'असें बसून काय

करितां? आंत गडबड काय चालली आहे ती नाहीं का तुम्हांला ऐकूं येत?'

पहारेकऱ्यांनीं विचारलें, 'काय कसली गडबड चालली आहे?'

विमलेनें उत्तर केलें, 'बाबा, अंतःपुराचा सर्वस्वीं नाश झाला. नबाबांवर कोणी घाला घातला आहे असें वाटतें?'

पहारेकरीही हें ऐकून दरवाजा उघडा टाकून अंतः-पुराकडे धांवत सुटले; आणि विमला एकदांची निर्विघ्नपणें किल्ल्याबाहेर पडली.

दाराबाहेर पडून विमला कांहीं पुढें जातें आहे तोंच एका झाडाखालीं एक पुरुष उभा आहे असें तिच्या दृष्टीस पडलें. लक्षपूर्वक पाहिल्याबरोबर हे अभिरामस्वामी आहेत असें तिनें तात्काल ओळखिलें. विमला अभिरामस्वामीपाशीं जातांच ते तिला म्हणाले, 'मी फार घाबरून गेलों होतों; पण किल्ल्यांत ही गडबड कसली ऐकूं येते आहे?'

विमला म्हणाली, 'माझ्या वैधव्याचा सूड घेऊन मी आलें आहे. पण येथें कशाला त्याची काथ्याकूट? चला लौकर आश्रमांत. तेथें मी सगळें सांगेन. पण तिलोत्तमा आश्रमांत गेली कीं नाहीं?'

अभिरामस्वामी म्हणाले; 'तिलोत्तमा ही पुढें अस्मानी-बरोबर चालली आहे. आपण जरा लौकर गेल्यास तीं वाटेंतच भेटतील.'

असें बोलून तीं दोघेंही घाईघाईनें चालूं लागलीं आणि जलदीनें आश्रमांत येऊन पोंचली, व पाहतात तों आयेषे-च्या कृपेनें तिलोत्तमा अस्मानीबरोबर तेथें येऊन नुक्तीच

बसली आहे. तिलोत्तमा अभिरामस्वामींना प्रणाम करून रडूं लागली. अभिरामस्वामी तिला धीर देऊन म्हणाले, 'ईश्वरेच्छेनें तूं आतां दुरात्म्याच्या हातून सुटली आहेस. आतां या ठिकाणीं एक क्षणभरसुद्धां थांबतां उपयोगी नाहीं. त्या दुष्ट यवनलोकांना आपला जर पत्ता लागला तर आपल्याला मारून ते आपल्या नबाबाचा मृत्युशोक निवारण करण्यास सोडणार नाहींत. आजच रातोरात आपणांस येथून दूर कोठें गेलेंच पाहिजे.'

सर्वजणांना ही युक्ति पसंत पडली.

---

# प्रकरण १७ वें.

## कतलुखानाचा शेवट.

विमला पळून गेल्यावर अगदीं थोड्यावेळानें एक अंमलदार घाबऱ्या घाबऱ्या जगत्सिंहाकडे बंदिशाळेंत येऊन म्हणाला, 'युवराज! नबाबसाहेबांचा अंतकाळ अगदीं समीप आला आहे, त्यांनीं आपली आठवण केली आहे.'

युवराज आश्चर्य पावून म्हणाला, 'म्हणतां तरी काय हें!'

अंमलदार म्हणाला, 'अंतःपुरांत कोणी शत्रु गुप्त रूपानें शिरून नबाबसाहेबांस जखमी करून पळून गेला. अद्याप त्यांनीं प्राणत्याग केला नाहीं, तरीपण आतां फार वेळ लोटणार नाहीं; आपण जलदीनें चला, नाहीं तर आपली भेट होणार नाहीं!'

राजपुत्रानें विचारिलें. 'अशावेळीं माझ्या भेटीचें काय प्रयोजन असावें बरें?'

तो अंमलदार म्हणाला, 'मला काय माहीत? मी फक्त निरोपाचा गडी.'

युवराज त्या अंमलदाराबरोबर अंतःपुरांत गेला. तेथें जाऊन पहातो, तों कतलुखानाचा जीवनप्रदीप खरोखरच अगदीं मालवावयाचे बेतांत आला होता; पण मालवला मात्र नव्हता. त्याच्या चोहोंबाजूंस उसमान, आयेषा, अज्ञान पुत्र, बायको, इतर स्त्रिया, दासी, प्रधानमंडळ वगैरे सर्व मंडळी घेरा घालून बसली होती, व त्यांच्या रडण्यानें मोठा गोंधळ होऊन गेला होता. सरसकट सर्व लहानथोर मोठमोठ्यानें रडत होते. हीं सर्व कां रडतात हें समजेना ह्मणून

मुलेंहीं सर्वांप्रमाणें रडूं लागलीं होतीं. त्या सर्वांत एकजण मात्र अगदीं टाहो फोडून रडत नव्हतें. ती आयेषा होती. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा मात्र सारख्या पडत होत्या व त्यामुळें तिच्या वक्षःस्थळावरील सर्व वस्त्रें भिजून गेलीं होतीं. कांहीं गडबड न करितां ती आपल्या बापाचें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन स्वस्थ बसली होती.

ती स्थिर व गंभीर मूर्ति पाहून ' निर्वातनिष्कंपमिव-प्रदीपम् ' ह्या उक्तीची जगत्सिहाला आठवण झाली.

युवराज तेथें येऊन दाखल होतांच खोजा इसा नांवाचा वजीर त्याचा हात धरून त्यास कतलुखानाजवळ घेऊन गेला. बहिऱ्याशीं बोलतांना ज्याप्रमाणें मोठ्यानें बोलावें लागतें, त्याप्रमाणें कतलुखानाच्या कानाशीं मोठ्यानें ओरडून तो म्हणाला, ' युवराज जगत्सिंह आले आहेत.'

कतलुखान अगदीं क्षीण स्वरानें म्हणाला, ' मी शत्रु मरत आहें–राग, द्वेष सोडून द्या.'

जगत्सिंह तो प्रसंग जाणून म्हणाला, या वेळेस मीं त्यांचा त्याग केला आहे.'

कतलुखान पुन्हा त्याच आवाजानें म्हणाला, ' विनंति–स्वीकार. '

जगत्सिंहानें विचारिलें, ' काय स्वीकार करूं ? ' कतलुखान म्हणाला, ' हात.'

कतलुखानाचे मनांत काय आहे हें उसमानास कळून आलें, व त्यानें जगत्सिहाचा हात घेऊन त्यावर कतलुखानाचा हात ठेविला.

जगत्सिंहाच्या अंगास तेव्हां अग्निवृष्टीचा भास झाला, पण त्यानें त्याचें निवारण केलें नाहीं.

कतलुखान पुन्हा म्हणाला, ' सर्व बाळक–युद्ध–फार तहान. '

आयेषेनें त्याच्या मुखांत थोडें सरबत घातलें.

' युद्ध–करण्याचें नाहीं–सल्ला.–' असें म्हणून कतलुखान स्तब्ध राहिला. जगत्सिंहानें त्याचा कांहींच जबाब दिला नाहीं. कतलुखान उत्तराकरितां त्याच्या तोंडाकडे पाहत राहिला. जबाब मिळाला नाहीं, असें पाहून त्याला वाईट वाटून तो म्हणाला, ' नाकबूल ! '

युवराज म्हणाला, पठाणांनीं दिल्लीश्वराचें वर्चस्व कबूल केल्यास मी सल्ला करण्याविषयीं विनंति करण्यास कबूल आहें. '

कतलुखान पुन: अर्धवट शब्दांनीं म्हणाला, 'ओरिस्सा ?'

त्याचा भाव समजून राजपुत्र म्हणाला, 'जर त्या कामीं मला यश आलें तर मी आपणांस वचन देतों कीं, आपले पुत्र ओरिश्याचे गादीवरून कधीं दूर होणार नाहींत. '

आतां कतलुखानाच्या मुखावर मृत्यूच्या क्लेशांपासून होणारी पीडा स्पष्ट दिसूं लागली. मुमूर्षु कतलुखान म्हणाला, 'आपण–मुक्त–जगदीश्वर-उत्तम.' जगत्सिंह तेथून जाण्यास निघाला होता. इतक्यांत आयेषेनें आपलें तोंड बापाच्या कानाशीं लावून कांहीं सांगितलें, कतलुखानानें खोजा इसाकडे पाहून जाण्यास सिद्ध झालेल्या जगत्सिंहाकडे पाहिलें; तेव्हां खोजा इसा राजपुत्रास म्हणाला, 'आपणांस दुसरें आणखीं कांहीं सांगावयाचें आहे, असें वाटतें.'

राजपुत्र माघारा आला, तेव्हां कतलुखान म्हणाला, ' कान ' राजपुत्र समजला; व परलोकास जाण्यास तयार झालेल्या कतलुखानाच्या अगदीं जवळ जाऊन त्याच्या तोंडाशीं कान लावून बसला; तेव्हां कतलुखान पहिल्यापेक्षां अधिक खोल व अस्पष्ट आवाजानें म्हणाला, ' वीर–'

इतकें बोलून तो थोडा वेळ स्तब्ध राहिला. पुन्हां बोलूं लागला; वीरेंद्रसिंह–पाणी. '

आयेषेनें पाण्याचा पेला त्याच्या तोंडास लाविला.

नंतर कतलुखान म्हणाला, ' वीरेंद्रसिंहाची कन्या. '

हें ऐकतांचे राजपुत्रास वृश्चिकदंश झाल्यासारखें झालें. तो चकित होऊन थोडा मागें सरला. कतलुखान बोलूं लागला, ' पित्याविरहित–मी पापी–अग पाणी. '

आयेषा वरचेवर त्याच्या तोंडात पाणी घालूं लागली पण कतलुखानाला आतां कांहीं शब्द उमटविणें फार कठीण होऊन गेलें. तो मोठ्यानें धांपा टाकीत बोलूं लागला ' भडका–साध्वी–तुझी पहा.'

राजपुत्रानें विचारिलें, ' काय ? ' कतलुखानाच्या कानाला हा प्रश्न मेघगर्जनेप्रमाणें भासला. कतलुखान बोलूं लागला, ' ही-क-ह्या-कन्येच्या-सारखी पवित्र-स्पर्श नाहीं. पाहिली नाहीं. तुम्ही-अरेरे-तहान-तहान-जातों-आयेषा ! '

आतां पुढें त्याच्यानें बोलवेना. शक्तीपेक्षां श्रम त्याला अतिशय झाले होते, त्यामुळें फार थकवा आल्यानें त्याची निर्जीव मान वांकडी पडली, व कन्येचें नांव मुखावटे निघतां निघतांच कतलुखानाचें प्राण विसर्जन झालें.

# प्रकरण १८ वें.

## वैर.

जगत्सिंह बंदिखान्यांतून मोकळा झाल्यानंतर तेथून निघाला, तो आपल्या बापाच्या छावणींत येऊन दाखल झाला; आणि कबूल केल्याप्रमाणें त्यानें मोंगल व पठाण यांच्यामध्यें तह करून दिला. पठाणांनीं दिल्लीच्या बादशहांची ताबेदारी पत्करिली, तरी त्यांजकडे ओरिश्याचें स्वामित्व कायम राहिलें. या तहाची इत्थंभूत हकीगत इतिहासांत दिली आहे, तेव्हां ती येथें देण्याचें कांहीं विशेष प्रयोजन दिसत नाहीं. तह झाल्यानंतर उभयपक्षांचीं सैन्यें कांहीं दिवसपर्यंत जागच्या जागींच राहिलीं होतीं. मोंगलांशीं संपादलेला हा नवीन स्नेह वाढविण्याकरितां खोजा इसा आणि सेनापति उसमान हे कतलुखानाचीं लहान लहान मुलें घेऊन राजा मानसिंहाचे छावणींत भेटावयास आले पन्नास हत्ती आणि दुसऱ्या कांहीं मौल्यवान् वस्तु त्यांनीं राजा मानसिंहाला नजर करून संतुष्ट केलें; राजा मानसिंहानेंही त्यांचा उत्तम प्रकारचा सन्मान राखून व सर्वांना वस्त्रालंकार देऊन त्यांची रवानगी करून दिली.

अशा प्रकारें तह करण्यांत आणि छावणी उठविण्यांत कांहीं दिवस निघून गेले.

शेवटीं रजपूत लष्कर पाटणा येथें जाण्यास कूच करण्याचा दिवस जवळ आला, तेव्हां जगत्सिंह आपल्या बरोबर कांहीं निवडक लोक घेऊन पठाणांच्या किल्ल्यांत उसमान वगैरे मंडळींची भेट घेण्याकरितां गेला. बंदिखान्यांतील

त्या दिवशींच्या त्यांच्या भेटीपासून उसमान पूर्वीप्रमाणें राजपुत्राशीं मोकळ्या मनानें वागत नसे. आजदेखील त्यानें इकडल्या तिकडल्या गोष्टी सांगून राजपुत्राची पाठवणी केली.

जगत्सिंहाला उसमानाची रजा घेतेवेळेस मोठें वाईट वाटलें तरीपण तसाच तो खोजा इसा याची रजा घेण्यास गेला. तेथून आयेषेची रजा घेण्याच्या हेतूनें निघाला. जनानखान्याजवळ गेल्यावर तेथील एका खोजाबरोबर त्यानें तिला सांगून पाठविलें कीं, ' माझी व आपली नबाबसाहेबांच्या मृत्युदिनापासून गांठच पडली नाहीं. आतां मी पाटण्यास जात आहें, तेव्हां आपली भेट पुनः होण्याचा संभव फारच कमी, म्हणून जातां जातां एकवार आपल्याला सलाम करून जावें इतकीच इच्छा आहे. '

थोड्या वेळानें एक खोजा तिचा निरोप घेऊन आला आणि म्हणाला कीं, ' नबाबकन्येनें असें सांगितलें आहे कीं, आपली व माझी इतःपर भेट होणें नाहीं. क्षमा करावी. '

तें ऐकून राजपुत्राला अतिशयच वाईट वाटलें व तो आपल्या छावणीकडे जावयास म्हणून किल्यांतील वाड्यांतून बाहेर पडला. तेथून तो किल्ल्याच्या दरवाजाशीं येऊन पहातो तों तेथें उसमान आपलीच वाट पहात उभा आहे असें त्यास दिसलें.

राजपुत्र उसमानला पाहून व त्यास पुनः सलाम करून जावयास निघाला, उसमानही त्याच्या मागोमाग चालूं लागला. तें पाहून राजपुत्र म्हणाला, ' सेनापति साहेब,

आपल्याला मला कांहीं आज्ञा करणें असल्यास खुशाल करावी मी ती पाळण्यास तयार आहें.'

उसमान म्हणाला, 'आपल्यास मला कांहीं विशेष सांगावयाचें आहे, आणि तें ह्या शिपायांदेखत मला सांगतां येत नाहीं; आपण यांना पुढें जाण्यास सांगा व एकटें माझ्याबरोबर चला.'

राजपुत्र मनांत कांहीं संशय न आणितां आपल्या शिपायांस अंमळ पुढें जाण्यास सांगून आपण एकटा घोड्यावर बसून पठाणाबरोबर जाऊं लागला, उसमानही एक घोडा मागवून त्यावर बसला. कांहीं थोडावेळ चालून गेल्यावर उसमान राजपुत्राला घेऊन एका वडाच्या दाट झाडींत शिरला. या झाडीच्या मध्यभागीं एक मोठा मोडका वाडा होता. फार प्राचीन काळीं कोणी तरी बंडखोरानें हा वाडा आपल्याला लपून बसण्यासाठीं बांधला असावा असा त्याच्या एकंदर स्वरूपावरून भास होई. एका वडाच्या झाडाला घोडे बांधल्यावर उसमान राजपुत्राला त्या मोडक्या वाड्यांत घेऊन गेला. वाड्यांत कोणीही मनुष्य नव्हतें. त्याच्या मध्यभागीं एक मोठा चौक होता. त्यांत एका बाजूला दफण देण्यासाठीं एक कबर तयार करून ठेविली होती, पण तेथें शव कांहीं दृष्टीस पडत नव्हतें; दुसऱ्या बाजूला एक मोठी चिता रचून तयार ठेविली होती, पण तिचे जवळही राजपुत्राला एकही मृतदेह दृष्टीस पडला नाहीं.

चौकांत आल्यावर राजपुत्रानें विचारिलें, 'हें काय?'

उसमान म्हणाला, 'हें सर्व माझ्याच हुकमानें तयार केलेलें आहे. आज जर मला मृत्यु आला तर आपण मला या

कबरींत दफण द्या; कोणाला सांगूं नका; पण आपला जर देहत्याग झाला, तर ब्राह्मणद्वारें या चितेंत आपला सत्कार करवीन, व हेंही तिसऱ्या कोणाला कळूं देणार नाहीं.'

राजपुत्र विस्मित होऊन म्हणाला, 'ह्या सगळ्याचा अर्थ काय ?'

उसमान म्हणाला, 'आम्ही पडलों पठाण, एकदां कां आम्हांला राग आला म्हणजे हें बरें किंवा वाईट ह्याच्याकडे आह्मी लक्ष देत नसतों. या पृथ्वीचे पाठीवर आयेषेवर प्रेम ठेवणाऱ्या दोघां गृहस्थांस रहाण्यास पुरेशी जागा नाहीं. दोघांतून कोणा एकाला तरी येथें प्राणत्याग केलाच पाहिजे.'

आतां मात्र राजपुत्राला सर्व गोष्टींचा उमज पडला; व त्याला अतिशय राग येऊन तो म्हणाला, 'मग आपलें काय म्हणणें आहे ?'

उसमान म्हणाला, 'आपण सशस्त्र आहांच, तेव्हां माझ्याशीं युद्ध करा, साधलें तर मला मारून आपला रस्ता मोकळा करून घ्या, नाहींतर माझ्या हातानें मरण पावून माझा तरी रस्ता मला मोकळा करून द्या.'

इतकें बोलून उसमाननें जगत्सिंहाला उत्तर देण्यासही वेळ दिला नाहीं, तो तरवार उपसून त्याजवर एकदम तुटूनच पडला. तेव्हां स्वसंरक्षणार्थ राजपुत्र अतित्वरेनें आपली तरवार म्यानांतून बाहेर काढून तिनें त्याचे वार चुकवूं लागला. उसमाननें राजपुत्राचा जीव घेण्यासाठीं वाटेल तसे वार करण्याची सुरवात केली, पण चुकून-

देखील उसमानावर तो वार करीत नव्हता, त्याचें लक्ष केवळ त्याचे वार चुकविण्याकडे मात्र होतें. दोघेही शस्त्रविद्येंत पूर्ण निपुण होते. ह्याप्रमाणें पुष्कळ वेळ युद्ध झालें तरी कोणी-ही कोणाला हटेना. सारांश, त्या पठाणाच्या तरवारीचे वार लागून लागून राजपुत्राच्या सर्वांगाला जखमा झाल्या व त्याच्या अंगांतून सारखें रक्त वाहूं लागलें; उसमानाला त्यानें एकही वार केला नव्हता; त्यामुळें त्याचें शरीर मात्र अक्षत होतें. रक्तस्रावानें आपलें शरीर क्षीण होत चाललें आहे, असें पाहून व अशाप्रकारच्या युद्धांत आपल्याला मृत्यु खास येणार असें राजपुत्राला वाटून तो अगदीं थकून जाऊन म्हणाला 'उसमाना, थांब, मी हार पत्क-रितों!'

उसमान मोठ्यानें हंसून म्हणाला, 'रजपूत सेनापति मरावयास भितात हें आजच मला कळलें. तरवार हातांत घे, मी तुला आज मारणार, सोडावयाचा नाहीं. तुला आयेषेकडे जिवंत मी नाहीं जाऊं द्यावयाचा.'

राजपुत्र म्हणाला, 'मला कोठें आयेषा हवी आहे?'

उसमान आपली तरवार परजीत परजीत म्हणाला, 'तुला आयेषा नको पण तिला तूं हवा आहेस! तें कांहीं नाहीं. तरवार घे हातांत, मी नाहीं तुला सोडावयाचा.'

राजपुत्र हातची तरवार दूर फेकून देऊन म्हणाला, 'मी नाहीं युद्ध करणार. मी संकटांत असतां तूं माझ्यावर उपकार केले आहेस; मी तुझ्याशीं युद्ध करणार नाहीं.'

उसमानानें रागानें राजपुत्राच्या छातींत एक लाथ

मारिली आणि म्हणाला, जो शिपाई असून युद्धास भितो, त्यास अशा रीतीनें मी लढाई करण्यास लावितों.'

आतां मात्र राजपुत्राच्यानें धीर धरवेना. त्यानें जलदी करून फेंकून दिलेलें शस्त्र पुनः जमिनीवरून उचलून घेतलें आणि जसा एखादा रागावलेला सिंह एखाद्या वाघावर उडी घालितो, त्याप्रमाणें त्यानें उसमानावर उडी घातली. ही जबरदस्त उडी उसमानाला सोसवली नाहीं; राजपुत्राच्या विशाल देहाच्या ओझ्यानें उसमान जमिनीवर पडला. राजपुत्रानें त्याच्या छातीवर बसून त्याच्या हातचें शस्त्र हिसकवून घेतलें आणि आपली तरवार त्याच्या गळ्यावर ठेवून तो म्हणाला, कां आतां तरी युद्धाची इच्छा पूर्ण झाली का?'

उसमान म्हणाला, 'जोंपर्यंत जिवांतजीव आहे, तोंपर्यंत तर नाहीं.'

राजपुत्र म्हणाला, 'आतां तुझा प्राण घेण्यास मला काय उशीर आहे?'

उसमान म्हणाला, 'घे, खुशाल घे; नाहींतर तुझ्या वधाची इच्छा करणारा शत्रु जिवंत राहील.'

जगत्सिंह म्हणाला, 'राहो, राहील तर, रजपुताला त्याची मुळींच भीति नाहीं. तुझा प्राण मी घेतला असता, पण तूं माझा प्राण वांचविला आहेस, म्हणून मीही आतां तसेंच करितों.'

असें बोलून त्यानें उसमानाचे हातपाय एके ठिकाणीं घट्ट बांधून ठेवून त्यांचीं सर्व शस्त्रें काढून घेतलीं. तीं घेतल्या नंतर राजपुत्रानें त्याचे हातपाय सोडिले व त्यास

मोकळें सोडून म्हणाला, 'आतां आपण निर्विघ्न घरीं जा तुम्ही यवन असून मला लाथ मारिलीत, म्हणून मी तुमची अशी दया केली, नाहींतर उपकार करणाऱ्याचा अंगाला स्पर्श करतील इतके रजपूत कृतघ्न नसतात.'

उसमान मोकळा झाल्यावर कांहीं एक न बोलतां घोड्यावर बसून एकसारखा दौडतच किल्ल्याकडे चालता झाला.

राजपुत्रानें चौकांतील विहिरींतून वस्त्रानें पाणी वर काढिलें आणि त्यानें आपलें अंग धुवून स्वच्छ केलें. शरीर धुवून स्वच्छ केल्यावर त्यानें आपला घोडा झाडाचा सोडून घेतला व त्यावर तो बसला. घोड्यावर बसल्यावर त्याच्या लगामाला वेलींनीं एक पत्र कोणी बांधिलें आहे असें त्याला आढळलें. पत्र सोडून पाहतो, तों तें मनुष्याच्या केंसांनीं बांधलेलें होतें व त्याच्या वरच्या बाजूला 'हें पत्र दोन दिवसांच्या आंत उघडूं नये, जर उघडिलें तर ह्याचा उपयोग होणार नाहीं,' असें लिहिलेलें होतें.

राजपुत्रानें थोडा वेळ विचार करून लिहिणाऱ्याच्या अभिप्रायाप्रमाणेंच करण्याचा निश्चय केला. त्यानें तें पत्र आपल्या खिशांत घालून ठेविलें व घोड्याला चाबूक मारून तो आपल्या छावणीकडे जलदीनें जाण्यास निघाला.

राजपुत्र छावणींत येऊन पोहोंचल्यावर दुसऱ्या दिवशीं त्याला आणखी एक पत्र एका जासूदानें आणून दिलें. हें पत्र त्याला आयेषेनें धाडिलें होतें. पण त्याचें वर्णन आह्मी पुढच्या भागांत देणार आहों.

---

# प्रकरण १९ वें.

## आयेषेचें पत्र.

आयेषा हातांत लेखणी घेऊन लिहिण्यास बसली आहे. तिच्या मुखाची कांति या वेळीं अत्यंत गंभीर असून स्थिर आहे. ती जगत्सिहाला पत्र लिहीत आहे. कागद घेतला व तिनें पत्र लिहिण्यास सुरवात केली. पहिल्यानें तिनें 'प्राणाधिक' असा शब्द लिहिला, पण तो खोडून त्याबद्दल 'राजकुमार' असें तिनें लिहिलें. 'प्राणाधिक' हा शब्द खोडून 'राजकुमार हा शब्द लिहितां लिहितां तिच्या डोळ्यांतून एकसारखे अश्रु निघून त्या कागदावर पडूं लागले. तेव्हां तिनें तो कागद फाडून टाकिला, आणि दुसऱ्या कागदावर तिनें पुनः पत्र लिहिण्यास प्रारंभ केला. परंतु वरच्या मायन्याच्या कांहीं ओळी लिहून होत आहेत तोंच पूर्वींप्रमाणेंच तें पत्र अश्रूंनीं पुनः भिजून गेलें. आयेषेनें पुनः तें फाडिलें. शेवटीं तिनें अश्रुचिन्हशून्य असा एक कागद लिहून पुरा केला. पुरा केल्यावर तो एकवार वाचून पाहूं लागली. वाचतां वाचतां अश्रूंनीं तिचे डोळे भरून आले व तिला मजकूर दिसेनासा झाला. तेव्हां आयेषेनें कसें तरी बंद करून तें जासुदाचे हातांत दिलें. कागद घेऊन जासूद रजपुतांचे छावणीकडे जाण्यास निघाला. आयेषा एकटी पलंगावर पडून अश्रु ढाळूं लागली.

जगत्सिंह पत्र उघडून वाचूं लागला:—

'राजकुमार—

मी जी आपल्याला भेटल्यें नाहीं, ती माझें मन माझ्या ताब्यांत नाहीं म्हणून नाहीं. आयेषेला धैर्य नाहीं असें

असें आपण मनांत आणूं नका, तसें आपल्याला घाटल्यास माझ्या मनाला अत्यंत वाईट वाटेल. उसमाननें आपल्या स्वतःच्या हृदयांत मत्सराग्नि प्रदीप्त केला आहे, व म्हणून न जाणों मी आपली भेट घेतली असतां त्यास फार वाईट वाटेल; इतक्याचकरितां मी आपल्या भेटीस आल्यें नाहीं. माझी भेट न झाल्यामुळें आपल्यास क्लेश होतील असें मला वाटत नाहीं. मला होणारे क्लेश–सर्व सुखदुःखें मीं जगदीश्वरचरणीं समर्पण केलीं आहेत. आपल्या गमनकालीं आपला निरोप घेण्याचा प्रसंग साक्षात् येता तर ते क्लेश मी आनंदानें सहन केले असते. तुमची भेट न होण्यापासून होणारे क्लेश मी पाषाणाची होऊन सहन करीत आहें.

तर मग मीं हें पत्र कां लिहीत आहें? मला आपणांपाशीं कांहीं मागावयाचें आहे, आणि त्याचकरितां मी हें पत्र लिहीत आहें. मी आपल्यावर प्रेम करित्यें, असें आपल्या ऐकण्यांत आलें असल्यास आपण तें विसरून जा. जोंपर्यंत ह्या देहांत प्राण आहे, तोंपर्यंत ही गोष्ट उघड करणार नाहीं, असा माझा संकल्प होता; पण ईश्वराच्या इच्छेनेंच केवळ ती आपणांस कळली आहे, ती आतां अगदीं विसरून जा.

मी तुमची प्रेमाकांक्षा करणारी नाहीं. मला जें कांहीं द्यावयाचें होतें तें मी तुम्हाला देऊन चुकलें आहे. त्याचा बदला आपणांपासून मिळवावा अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. माझें प्रेम इतकें दृढ आहे कीं, तुम्ही जरी माझेवर प्रेम केलें नाहीं, तरी मला त्यांत सुखच आहे. पण आतां हें सांगण्याची काय जरूर आहे?

आपणांस मी दुःखी पाहिलें होतें. पण आतां जर आपणांस सुख होत असेल तर या आयेषेचें स्मरण करून तिला तसें कळवा. पण तसें करण्याची आपली जर इच्छा नसेल तर नका कळवूं. जर कधीं आपल्या अंतःकरणाला दुःख झालें तर ह्या आयेषेचें आपल्यास स्मरण होईल काय?

आज मी आपल्याला हें पत्र लिहिलें आहे, म्हणून अथवा यदाकदाचित् आणखी पुढें कधीं लिहीन तर लोक मला दोष देतील. मी निर्दोष आहें, म्हणून लोकांनीं जरी माझी निंदा केली, तरी ती आपण मनावर घेऊं नका— जेव्हां आपल्याला वाटेल तेव्हांच मला पत्र लिहा.

आपण जात आहां, आतां आपण हा देश सोडून जात अहां, पण हे पठाण स्वस्थ बसावयाचे नाहींत, म्हणून आपल्याला इकडे पुनः यावें लागेल, असें मला वाटतें. पण आतां माझी भेट आपल्याला पुनः होणार नाहीं! वारंवार विचार करून मी हा निश्चय दृढ केला आहे. स्त्रियांचें मन अगोदरच आकळावयास अत्यंत कठीण आहे; तेव्हां त्याच्यावर जास्त ओझें लादणें हें शहाणपणाचें काम नाहीं.

पुनः एकवारच फक्त आपलें दर्शन घ्यावें अशी माझी इच्छा आहे. आपला विवाह जर या प्रांतांत झाला, तर मला कळवा, म्हणजे मी आपल्या विवाहसमयीं हजर राहून तो सुखसोहळा माझ्या डोळ्यांनीं पाहीन. आपली जी पट्टराणी होईल तिच्याकारितां म्हणून मी कांहीं खिडूक मिडूक गोळा करून ठेविलें आहे तें त्या वेळीं मी तिच्या अंगावर माझ्या हातानें घालीन.

आणखी एक आपल्यास विनंति आहे. आपणांस जेव्हां आयेषेची मृत्युवार्ता कळेल तेव्हां एकवार इकडे येण्याचें करा, व माझे बाबाचे वाड्यांत आपल्या नांवाच्या पेटीमध्यें जें कांहीं मी ठेवीन तें माझ्याकरितां म्हणून ग्रहण करा.

बाबांचें माझ्यावर अत्यंत प्रेम असल्यामुळें मी कन्या असूनही जें कांहीं त्यांनीं मला दिलें आहे, तें एखाद्या गरीबशा देशांत तर एखाद्या राजाची बरोबरी करील. अंबराधिपतीला जर तें अग्राह्य नसेल तर आपण येऊन तें आपल्या ताब्यांत घ्यावें; त्याच पेटींत ह्यासंबंधीं दानपत्रही आपणांस सांपडेल.

आणखी काय लिहूं? पुष्कळ लिहावें असें मनांत आहे पण ते व्यर्थ आहे. जगदीश्वर तुम्हांस सुखी ठेवो. आयेषेची गोष्ट मनांत आणून कधींही दुःखी होऊं नका.'

जगत्सिंहाला हें पत्र वाचून रडूं कोसळलें; तो तें हातांत घेऊन तंबूत गेला, व पुष्कळ वेळपर्यंत इकडून तिकडे व तिकडून इकडे ह्याप्रमाणें वेड्यासारखा होऊन फिरला. अखेरीस त्यानें एक कागद घेऊन खालीं लिहिलेलें पत्र लिहिलें, व स्वतः तंबूबाहेर येऊन तें जासुदाचे हातांत दिलें.

'आयेषाबिबी, आपण रमणीरत्न आहां! जगांत लोकांना मनःपीडाच सारखी द्यावी अशीच विधात्याची इच्छा आहे असें मला वाटतें! मला आपल्या एकाही गोष्टीचा जबाब लिहवत नाहीं. आपलें पत्र वाचून माझें अंतःकरण दुभंग झालें आहे; पण एवढें मात्र आपण लक्षांत ठेवा कीं, जोंपर्यंत माझ्या देहांत प्राण आहे तोंपर्यंत माझ्या

प्राणापेक्षां प्रिय अशा सख्ल्या बहिणीप्रमाणें आपणांस मानण्याविषयीं मी नेहमीं यत्न करीन.'

हें उत्तर घेऊन दूत आयेषेकडे परत जाण्यास निघाला.

## प्रकरण २० वें.

### मालवाऱ्यास झालेला दिवा.

तिलोत्तमा अस्मानीबरोबर आयेषेचा निरोप घेऊन आली, तेव्हांपासून तिचा वृत्तांत कोणासही कांहीं कळला नव्हता. तिलोत्तमा, विमला, अस्मानी आणि अभिरामस्वामी यांपैकीं एकाचाही कोणाला पत्ता लागला नव्हता. मोंगल व पठाण यांच्यामध्यें तह झाल्यापासून वीरेंद्रसिंह व त्याच्या कुटुंबाची अशी भयंकर दुर्दशा झालेली ऐकून दोन्ही पक्षांचें असें ठरलें होतें कीं, वीरेंद्रसिंहाच्या कन्येचा व स्त्रीचा शोध लावून त्यांना पुनः गडमांदारणाचें आधिपत्य द्यावें ! सबब उसमान, खोजा इसा, मानसिंहादि मंडळी, त्यांचा बारकाईनें शोध करूं लागली. पण तिलोत्तमा अस्मानीबरोबर आयेषेजवळून विचारून निघून गेली, ह्याच्यापलीकडे तिचा शोध कोणास कांहींच लागेना. शेवटीं निराश होऊन मानसिंहानें एका विश्वासु चाकराला गडमांदारणावर ठेवून त्यास हुकूम केला कीं, 'तूं येथें राहून मृत जाहागीरदाराच्या स्त्रीकन्येचा शोध कर. शोध लागल्यावर त्यांस हा किल्ला सोंपून देऊन आमच्याकडे ये. आम्ही तुला इनाम देऊं. इतकेंच नाहीं, तर आणखी जहागीरही करून देऊं.'

असा बंदोबस्त करून, मानसिंह पाटणा येथें परत जाण्याचे तयारीस लागला. मरतेवेळीं जगत्सिहानें कतलुखानाच्या तोंडचें जें कांहीं ऐकिलें होतें, त्यावरून त्याच्या मनांत कांहीं वेगळाच भाव उत्पन्न झाला होता किंवा नाहीं हें कोणास कांहीं कळलें नव्हतें. तो ह्या कामांत वाटेल तितक्या पैशाचा खर्च व अंगमेहनतही करीत होता, एवढें मात्र खरें. पण हें सर्व तो केवळ पहिल्या संबंधाची स्मृति झाल्यानें करीत होता, किंवा ज्या दुसऱ्या कांहीं कारणांनीं मानसिंहादि मंडळी त्यांचा शोध लावण्याचा यत्न करीत होती त्यामुळें करीत होता किंवा त्याचे मनांत तिलोत्तमेविषयीं पुनः प्रेम उत्पन्न झालें होतें त्यामुळें करीत होता, हें मात्र कोणाच्याही समजण्यांत आलें नव्हतें. कोणत्याही कारणानें तो यत्न करीत असो, तो सर्व निष्फळ होत होता.

मानसिंहाची सेना दुसऱ्या दिवशीं सकाळीं कूच करावयाचें म्हणून त्या तयारीस लागली. जाण्याच्या आदल्या दिवशीं जगत्सिंहाच्या घोड्याच्या लगामाला बांधलेला कागद वाचण्याची मुदत होती. राजपुत्राला मोठी उत्सुकता वाटून तो तो कागद उघडून वाचूं लागला. त्यांत केवळ इतकेंच लिहिलेलें होतें:—

'जर तुला धर्माचें भय असेल, जर ब्रह्मशापाची तुला भीति वाटत असेल, तर पत्र वाचतांच या ठिकाणी एकटा ये.' 'एक ब्राह्मण.'

तो कागद वाचून राजपुत्राला फार आश्चर्य वाटलें. त्याच्या मनांत आलें कीं न जाणो हें कोणा शत्रूचें तर कपट नसेलना, तेव्हां जावें कीं न जावें ? रजपुताला ब्रह्मशापा-

पेक्षां जास्ती असें दुसरें भयच नाहीं, आणि इतक्याच-करितां त्यानें जाण्याचा निश्चय केला. त्यानें आपल्या सेवकांना हुकूम केला कीं, 'लष्कराबरोबर जर मला येववलें नाहीं, तर तुम्ही माझी वाट न पहातां सैन्याबरोबर निघून जा, माझी काळजी करूं नका, मागाहून मी तुम्हांला वर्तमान ( बरद्वान ) किंवा राजमहाल येथें येऊन भेटेन.'

असा हुकूम देऊन तो एकटा त्या वडाच्या झाडीकडे निघून गेला.

मागें वर्णन केलेल्या त्या मोडक्या वाड्याच्या दरवाजाजवळ येऊन राजपुत्रानें आपला घोडा पहिल्याप्रमाणें वडाच्या झाडाला बांधिला, आणि चोंहों बाजूस पाहूं लागला, पण कोणीही त्याच्या दृष्टीस पडेना; तेव्हां तो त्या वाड्यांत शिरला आणि पाहतो तों चौकाच्या एका बाजूला पूर्वीप्रमाणेंच एक कबरेकरितां खाडा खणलेला आहे, व दुसऱ्या बाजूला चिता रचलेली आहे; पण चितेपाशीं एक ब्राह्मण बसला आहे व तो मान खालीं घालून रडत आहे.

त्याला पाहून राजकुमारानें विचारिलें, 'महाराज, आपणच मला येथें येण्याविषयीं आज्ञा केली आहे का?'

ब्राह्मणानें तोंड वर केलें. राजपुत्रानें पाहिलें तों ते अभिरामस्वामी !

राजपुत्राचे मनांत एकाच वेळीं आश्चर्य, कौतुहल, आल्हाद या तिघांनीं एकच गर्दी करून सोडिली. प्रणाम करून मोठ्या आतुरतेनें त्यानें विचारिलें, 'आपलें दर्शन घडावें म्हणून किती तरी यत्न केले म्हणून सांगूं? आपण येथें कां राहतां?'

अभिरास्वामींनीं आपले डोळे पुसून सांगितलें, 'आतांशां मी येथेंच राहत असतों.'

स्वामींचा जबाब पुरा होतो न होतो, तोंच राजपुत्र त्यांना प्रश्नामागून प्रश्न विचारूं लागला, 'आपण माझें कां बरें स्मरण केलें? आपण कां बरें शोक करितां?'

अभिरस्वामी म्हणाले, 'ज्या कारणानें मी रडत आहें त्यासाठींच मीं आपणास येथें बोलाविलें आहें. तिलोत्तमा अगदीं घटका पळें मोजीत आहे!'

हे शब्द ऐकतांच आमचा जगत्सिंह वीरश्रेष्ठ खरा, पण करतो काय? खरें प्रेम हें अनिवार आहे! त्याचे हातपाय मोडल्यासारखे झाले, व त्याची कंबर खचली, तो मटकन् खालीं बसला. त्यावेळेस त्याच्या मनांत अगदीं आरंभापासून घडलेल्या सर्व गोष्टी एकामागून एक येऊन मूर्तिमंत उभ्या राहिल्या; व त्याच्या अंतःकरणांत तीक्ष्ण कट्यारीचे आघात झाल्याप्रमाणें अत्यंत तीव्र वेदना होऊं लागल्या. देवालयांत घडलेलें तें तिचें पहिलें दर्शन, शैलेश्वरासमोर केलेली ती प्रतिज्ञा, तिच्या महालांत झालेल्या पहिल्याच भेटीमुळें उभयतांचे डोळ्यांतून प्रेमानें आलेले ते अश्रु, त्या काळरात्रीं घडून आलेला तो भयंकर प्रसंग, तिलोत्तमेला मूर्च्छा आली त्या वेळचा तिचा तो चेहरा, पठाणाचे घरांत झालेले तिचे हाल, त्यानें केलेला तिचा छळ, व शेवटीं तिचा असा ह्या निर्जन वनांत होत असलेला अंत, याप्रमाणें एकामागून एक सर्व गोष्टी त्याचे मनांत येऊं लागून त्याचें अंतःकरण तिळ तिळ तुटूं लागलें. त्याचा पूर्वीचा दुःखाग्नि शतपट अधिक पेटला.

राजपुत्र बराच वेळपर्यंत कांहीं न बोलतां तसाच बसून राहिला. तेव्हां अभिरामस्वामी सांगूं लागले, ' विमलेनें त्या यवनाचा वध करून ज्या दिवशीं आपल्या विधवापणाचा सूड उगविला त्या दिवसापासून मी, माझी कन्या, व नात, ह्यांना घेऊन पठाणांच्या भीतीनें लपत लपत फिरत आहें; व तेव्हांपासूनच तिलोत्तमा आजारी पडली आहे. ज्या कारणानें ती आजारी पडली आहे, तें कारण आपणास पुरें माहीत आहेच. '

हे शब्द जगत्सिहाच्या हृदयांत एखाद्या झपाट्यानें येणाऱ्या बाणाप्रमाणें भोंसकले.

' तेव्हांपासून मी तिला निरनिराळ्या ठिकाणीं नेऊन निरनिराळे औषधोपचार करून पहात आहें. मी माझ्या लहानपणीं वैद्यकशास्त्राचा अभ्यास केला आहे, अनेक रोगांची मीं चिकित्सा केली आहे, दुसऱ्या कोणांस माहीत नाहींत अशीं अनेक औषधें मला माहीत आहेत, पण हृदयांत असणाऱ्या रोगावर मात्र मला औषध माहीत नाहीं. हें स्थळ अति निर्जन आहे असें पाहून आज पांच सात दिवस येथें येऊन राहिलों आहे. दैवयोगें तुम्हांस येथें आलेलें पाहून तुमच्या घोड्याच्या लगामाला कागद मी बांधून ठेविला होता. पहिल्यापासून माझी अशी इच्छा होती कीं; तिलोत्तमेचें माझ्या हातानें रक्षण न झालें तर तुमची पुनः एकवार तिला भेट करून देऊन तिच्या मृत्युसमयीं तिच्या अंतःकरणाला संतुष्ट करीन आणि याचकरितां तुम्हांला येण्याविषयीं मीं लिहिलें. त्यावेळीं देखील तिलोत्तमा बरी होईल अशी मला आशा होतीच; पण मला असें वाटलें होतें कीं,

दोन दिवसांत तिला कांहींच गुण न पडला तर मात्र ती कांहीं अधिक वांचावयाची नाहीं, आणि इतक्याचकरितां दोन दिवसांनंतर पत्र वाचण्याविषयीं मीं तुम्हांला लिहिलें होतें. ज्याचें मला भय पडलें होतें तोच प्रसंग आतां आला आहे. तिलोत्तमेच्या जीविताची आतां मुळींच आशा राहिली नाहीं. तिचा जीवनदीप मालवायाचे बेतांत आला आहे.'

इतकें बोलून अभिरामस्वामी पुनः रडूं लागले. जगत्सिंह तर रडतच होता.

स्वामी पुनः म्हणाले, 'अकस्मात् तुम्हांला तिलोत्तमेच्या दृष्टीसमोर घेऊन जातां कामा नये, न जाणो कदाचित् तुम्हाला पाहून या अवस्थेंत तिला हर्षवायु व्हावयाचा. बाकी मजकडून मी तिला, तुम्हांस येण्याचें कळाविलें असून तुमच्या येण्याचा संभव आहे, असें अगोदरच कळवून ठेविलें आहे. आतां प्रथम तिला तुम्ही आल्याची बातमी कळवून येतों, मग आपण जाऊन तिला भेटूं.'

असें बोलून परमहंस त्या मोडक्या वाड्याच्या अंतःपुराकडे गेले. थोड्या वेळानें परत येऊन ते राजपुत्रास म्हणाले, 'चला.'

राजपुत्र परमहंसाबरोबर अंतःपुरांत गेला आणि पहातो तों आंत एकच सबंध खोली आहे; त्या खोलींत एक मोडकासा जुना पलंग आहे, व त्यावर व्याधीनें क्षीण झालेली पण रूपानें जशीच्या तशी तिलोत्तमा निजली आहे. या वेळीं देखील तिच्या पूर्वींच्या लावण्याची मृदुलतर प्रभा तिच्या शरीराला वेष्टून राहिली आहे; निर्वाणोन्मुखी, प्रभाततारांप्रमाणें ती मनमोहिनी होऊन गेली आहे. तिच्यापाशीं बसून एक

विधवा तिचे हात चोळीत आहे; ती एक अलंकारविरहित, मलिन व दीन अशी विधवा आहे. तिला पहिल्यानें राजपुत्रानें ओळखिलें नाहीं, त्यानें कसें बरें ओळखावें? जी स्थिरयौवना होती, ती आतां वृद्धा झाली आहे.

राजपुत्र तिलोत्तमेच्या बिछान्याशीं येऊन उभा राहिला तेव्हां तिनें डोळे मिटले होते. अभिरामस्वामी तिला हाक मारून म्हणाले, ' तिलोत्तमे, हे राजकुमार जगत्सिंह आले आहेत.'

तिलोत्तमेनें डोळे उघडून राजपुत्राकडे पाहिलें; ती कोमलदृष्टि केवळ स्नेहव्यंजक होती; तिच्यांत तिरस्काराचा लेशही नव्हता. तिलोत्तमेनें त्याच्याकडे पाहून आपली नजर लागलीच खालीं लाविली. पाहतां पाहतां तिच्या डोळ्यांतून खळखळ अश्रुधारा वाहूं लागल्या. राजपुत्राला आतां धीर धरवेना त्यानें लाज सोडून दिली आणि पुढें होऊन तिलोत्तमेचे पाय घट्ट धरिले.

---

# प्रकरण २१ वें.

## खोटें स्वप्न.

ती बापाशिवाय अनाथ मुलगी अंथरुणाला खिळून राहिली आहे, पण तिचेजवळ जगत्सिंह सारखा बसून राहिला आहे. दिवस जातो आहे, रात्र जात आहे, पुनः दिवस उगवतो आहे, पुनः दिवस जातो आहे, रात्र येत आहे; तरी रजपूत कुलतिलक तिच्या त्या मोडक्या पलं-

गाजवळ बसून तिची सेवा करीत आहे. त्या दीन व शांत विधवेलाही तिच्या कामांत मधून मधून मदत करीत आहे. मानसिक दुःखानें क्षीण झालेली ती आपली सुंदरी एकदां तरी आपल्याकडे पाहते किंवा नाहीं—तिच्या त्या गहिंवरानें सुकून गेलेल्या पद्मासारख्या मुखावर तें पूर्वीचें हसूं येतें आहे किंवा नाहीं, हेंच पाहण्याच्या इच्छेनें तो तिच्या तोंडाकडे एकसारखा पहात बसला आहे.

त्याची छावणी कोठें आहे? लष्कर कोठें आहे? छावणी मोडून लष्कर पाटण्याकडे निघून गेलें आहे. त्याचीं गडी माणसें कोठें आहेत? दारुकेश्वर नदीच्या कांठीं आपला धनी येण्याची वाट पहात राहिलीं आहेत, पण धनीसाहेब कोठें आहेत? ते तर भयंकर उन्हाळ्यानें अगदीं सुकून गेलेल्या अत्यंत सुकुमार अशा फुलाच्या कळीला अश्रुजलानें पुनः टवटवीत करण्याचा यत्न करीत बसले आहेत.

कळी हळूहळू फुलूं लागली आहे. ह्या संसारांत स्नेहाइतका जबरदस्त जादूगार नाहीं! व्याधिनाशक औषधांत प्रेमासारखें दुसरें औषध नाहीं! असें जर नसतें तर हृदयव्याधि दुसऱ्या कोणत्या औषधानें बऱ्या झाल्या असत्या काय?

ज्याप्रमाणें अगदीं जावयास झालेला दिवा भरण मिळाल्यानें पुनः हळूहळू मोठा होऊं लागतो, ज्याप्रमाणें उन्हाळ्यानें सुकून गेलेली वेल आषाढांतील नव्या पर्जन्यवृष्टीनें पुनः फैलावयास लागते, त्याप्रमाणें जगत्सिंहाची भेट झाल्यामुळें तिलोत्तमा दिवसानुदिवस बरी होत चालली.

हळूहळू ती पलंगावर उठून बसूं लागली. विमला नसतां उभयतां शेजारीं शेजारीं बसून इतके दिवसांच्या

मनांतील गोष्टी सांगण्यास तिला सामर्थ्य आलें. तिनें राजपुत्राला पुष्कळ गोष्टी सांगितल्या, मनानें केलेले अपराध कबूल केले, तिला मनांतल्या मनांत ज्या कांहीं आशा वाटल्या व नाहींशा झाल्या, त्याही सांगितल्या; जागीं असतां किंवा झोंपेंत असतां तिला जीं मौजेचीं स्वप्नें पडलीं तीं देखील तिनें त्याला सांगितलीं. आजारीपणीं त्या मोडक्या पलंगावर अचेतन पडून राहिली असतां तिला एक स्वप्न पडलें होतें, तेंही एके दिवशीं तिनें त्याला सांगून टाकिलें.

ती म्हणाली, 'नववसंताच्या शोभेनें परिपूर्ण असा एक लहानसा डोंगर होता व त्यावर आपण उभयतां पुष्पक्रीडा करीत होतों. मी निरनिराळ्या तऱ्हेचीं फुलें वेंचून त्यांचे ढीग घालून ठेविले व त्यांच्या दोन माळा गुंफिल्या, त्यांतली एक माळ मी स्वतां आपल्या गळ्यांत घातली व दुसरी आपल्या गळ्यांत घातली, पण आपल्या कमरेच्या तरवारीला अडकून ती तुटली. तेव्हां मी म्हणाल्यें, 'आतां आपल्या गळ्यांत मी माळ नाहीं घालावयाची पण पायांत बिडी मात्र घालत्यें. असें ह्मणून मी फुलांची बिडी करूं लागल्यें. मी बिडी आपल्या पायांत घालणार असें पाहून आपण मागें सरलां. मी पुढें सरल्यें तों आपण आणखी मागें सरलां. मी जों जों पुढें येऊं लागल्यें तों तों आपण मागें सरूं लागलां. सरते शेवटीं आपणांस धरावें ह्मणून मी आपल्या मागें धावूं लागल्यें, आपण मोठ्या झपाट्यानें तो डोंगर उतरूं लागलां. तुमच्या व माझ्यामध्यें रस्त्यांत एक लहानसा ओढा आला, तेव्हां एका उडीबरोबर आपण त्या पलीकडे गेलां. मीं पडल्यें अबला, मला बाई

आपणासारखी उडी मारितां येईना; म्हणून तो नाला तेथल्यापेक्षां जेथें अधिक अरुंद असेल तेथें तो ओलांडावा असा विचार करून, त्याच्या कांठाकांठानें मी डोंगर उतरूं लागल्यें. ओढा अरुंद होणें तर बाजूलाच राहिलें, पण जों जों मी खालीं खालीं जाऊं लागल्यें, तों तों तो अधिकच रुंदावत चालला. एवढा वेळ जो ओढा होता त्याची आतां लहानशी नदी झाली व हळूहळू त्या लहान नदीची मोठी नदी झाली; आपणही मला दिसेनासे झालां; तेव्हां मात्र नदी इतकी खोल गेली कीं, व तिच्या कांठावरील जमीन इतकी उंचसखल होती कीं, माझ्यानें बाई अगदीं चालवेना. माझ्या पायांनीं कांठावरली मातीचीं ढेंगळें सुटून खालीं नदींत पडूं लागलीं व त्यांचा फार मोठा आवाज होऊं लागला. मी खालीं पाण्याकडे पाहूं लागल्यें तों एक जबरदस्त भोंवरा त्यांत फिरून राहिला आहे. तो पाहिल्याबरोबर माझे डोळे फिरून गेले; तेव्हां नदीच्या तोंडांतून सुटून जावें म्हणून मी पुनः डोंगरावर चढून पळून जाण्याचा बेत केला; पण रस्ता अतिशय उंच व सखल असल्यानें माझ्यानें एक पाऊलही टाकवेना. मी मोठमोठ्यानें रडूं लागल्यें; इतक्यांत तो काळमूर्ति कतलुखान पुनः जिवंत होऊन माझा रस्ता अडवून समसमोर येऊन उभा राहिला ! आणि माझ्या गळ्यांतल्या त्या पुष्पमालेची एकाएकीं किती तरी जड अशी लोखंडाची सांखळी होऊन गेली ! ती फुलांची केलेली बिडी पाहल्यें तों ती माझ्या हातांतून माझ्या पायांवर पडली आणि ती बिडी खरोखरीच्या लोखंडी बिडीप्रमाणेंच माझ्या पायांत घट्ट येऊन बसली ! अकस्मात्

माझें सर्वांग तेथल्या तेथें खिळल्यासारखें झालें! तेव्हां कतलुखानानें माझी मान धरून व मला गरगर फिरवून त्या नदींत फेंकून दिलें!'

स्वप्न सांगून पुरें झाल्यावर तिलोत्तमा डोळ्यांत आसवें आणून म्हणाली, 'युवराज! हें सर्व स्वप्नांतील नव्हे; आपल्याकरितां बनविलेली ती फुलबेडी खरोखरची लोखंडी बिडी होऊनच माझ्या पायांत पडली असें मला वाटतें; जी कुसुममाळा आपल्या गळ्यांत मी घातली होती ती तर आपण तरवारीनें तोडून टाकिलीत!'

युवराज तें ऐकतांच हंसला आणि कमरेची तरवार काढून ती तिच्या पायाशीं ठेवून म्हणाला, 'तिलोत्तमे! घे ही तरवार, तुझ्या स्वाधीन केली आहे, आतां तर माळ घालून पहा, ह्या तरवारीचे तुझ्यासमोर दोन तुकडे करून टाकितों.'

तिलोत्तमा त्यावर बोलत नाहीं असें पाहून राजपुत्र म्हणाला, 'तिलोत्तमे! खरोखरच, मी थट्टा करीत नाहीं.'

तिलोत्तमा लाजून खालीं तोंड घालून तशीच बसून राहिली.

त्या दिवशीं रात्रीं अभिरामस्वामी दुसऱ्या एका खोलींत दिव्याजवळ पोथी वाचीत बसले होते, तेथें जाऊन राजपुत्र विनयपूर्वक म्हणाला, 'महाराज, मला आपणांस एक विनंति करावयाची आहे, तिलोत्तमेला आतां येथून दुसऱ्या ठिकाणीं जाण्यासारखी शक्ति आली आहे, इतक्याकरितां मी म्हणतों कीं, येथें या मोडक्या जाग्यांत राहून उगाच हाल सोसण्याचें काय कारण? उद्यांचा दिवस निघण्यास

चाईट नसेल तर तिला घेऊन आपण सर्व गडमांदारणास जाऊं. मग आपल्याला नाकबूल नसेल तर अंबराधीशाच्या वंशांत आपली दौहित्री देऊन मला कृतार्थ करा.'

अभिरामस्वामी हातची पोथी तशीच टाकून उठले आणि त्यांनीं राजपुत्राला दृढालिंगन दिलें; त्यावेळीं त्यांचा पाय पोथीवर पडला होता, त्याचें देखील त्यांना भान राहिलें नाहीं!

राजपुत्र जेव्हां स्वामीच्या भेटीस आला तेव्हां त्याच्या त्या जाण्याचें कारण समजून विमला आणि अस्मानी त्याच्या मागोमाग आल्या व बाहेर उभ्या राहून त्यांनीं आंतील सर्व ऐकिले. राजपुत्र बाहेर आला आणि पाहतो तों विमलेची चर्या अकस्मात् पालटली जाऊन तिचा चेहरा पूर्वीसारखा दिसूं लागला आहे! ती एकसारखी हंसत होती व अस्मानीची थट्टा करीत होती.

अस्मानीही तिच्या थट्टा तृणवत् समजून उलट तिला आपल्या नर्तनकौशल्याची परीक्षा देत होती. हा प्रकार पाहून राजपुत्र तेथून एका बाजूनें हळूच निघून गेला.

---

## प्रकरण २२ वें.

### समाप्ति.

---

फूल तर फुललें. अभिरामस्वामींनीं गडमांदारण गांवीं जाऊन मोठ्या समारंभानें जगत्सिंहाला आपली नात दिली.

ह्या मंगल कार्याकरितां जगत्सिहानें आपल्याबरोबर मंडळीस जाहानादेहून बोलावून आणविलें होतें. तिलोत्तमेच्या चुलते वगैरे बापाकडील मंडळीलाही मूळ चिठ्या पाठविल्या होत्या, त्यामुळें तेही ह्या शुभकार्यास आले होते. दोहोंपक्षांकडील मंडळी आली असल्यामुळें लग्नमंडपास मोठी शोभा आली होती व सर्व लग्नघर आनंदमय झालें होतें.

आयेषेची विनंति ध्यानांत ठेवून जगत्सिहानें तिलाही लग्नसमारंभास येण्यास निमंत्रण केलें होतें. व तीही आपले चाकटे भाऊ व गडी माणसें बरोबर घेऊन या लग्न समारंभाकरितां आली होती.

आयेषा जरी यवनी होती, तरी जगत्सिह आणि तिलोत्तमा यांचे तिजवर अत्यंत प्रेम असल्यामुळें त्यांनीं तिला गडावरील अंतःपुरांतच रहावयास जागा दिली होती. आमच्या वाचकांना कदाचित् असें वाटेल कीं, आयेषेचें मन उद्विग्न झालें असल्यामुळें तिला त्या लग्नसोहळ्याच्या आनंदांत आनंदानें येऊन मिसळणें गोड लागलें नसेल. पण खरोखरच पाहतां तशी गोष्ट नव्हती. आयेषा तेथें येऊन आपल्या आनंदी स्वभावानें सर्वांना आनंदी करूं लागली. शरदृतूंतील पूर्ण फुललेल्या कमळांच्या मंद मंद हलण्याप्रमाणें तिच्या त्या मृदु व मधुर हंसण्यानें सर्वांचीं मुखें अधिकच मनोहर दिसूं लागलीं.

विवाहकार्य संध्याकाळीं आटोपलें. तेव्हां आयेषा आपल्याबरोबर आलेल्या मंडळीसह जाण्याच्या तयारीला लागली. हंसत हंसत ती विमलेचा निरोप घ्यावयास गेली. विमलेला कांहींच ठाऊक नव्हतें, म्हणून सहज ती हंसून

म्हणाली, 'शाहाजादि ! आतां आपण आपल्या लग्नाला आह्मांला बोलावून न्यालच ना !'

विमलेचा निरोप घेऊन आयेषा तिलोत्तमेकडे आली, आणि तिला एका एकांताच्या जागीं घेऊन गेली, व तिचे गळ्यांत आपले हात घालून म्हणाली, 'प्रिय भगिनी, मी आतां जात्यें; पण तुम्ही दोघें अक्षय्य सुख भोगा, हा माझ्या कायावाचामनानें मी तुम्हांला आशीर्वाद आहे.'

तिलोत्तमा म्हणाली, 'आतां किती दिवसांनीं आपली पुनः भेट होईल !'

आयेषा म्हणाली, 'आतां भेटीची आशा कशाला करित्येस?'

हें ऐकून तिलोत्तमेला फार वाईट वाटलें. दोघींही स्तब्ध बसल्या.

थोड्या वेळानें आयेषा म्हणाली, 'भेट होवो वा न होवो पण तूं मला विसरणार नाहींस ना ?'

तिलोत्तमा हंसून म्हणाली, 'आपल्याला जर मीं विसरून गेल्यें तर युवराज माझें तोंडही पहाणार नाहींत !'

आयेषा अंमळ गंभीर मुद्रा धारण करून म्हणाली,'एवढ्याच बोलण्यानें नाहीं माझें समाधान होत. तूं कधींही माझी गोष्ट युवराजांजवळ काढणार नाहींस असें मला वचन दे.'

जगत्सिंहाकरितां आपण सर्व जन्माच्या सुखावर पाणी सोडिलें आहे, व त्यामुळें त्यांना अत्यंत वाईट वाटत आहे, हें आयेषेला पक्कें माहित होतें; तिचें नुस्तें कोणीं नांव जरी घेतलें तरी त्याचें तें दुःख दुणावें, हेंही ती जाणून होती.

तिलोत्तमेनें तसें करण्याचें कबूल केलें; तेव्हां आयेषा म्हणाली, 'तर मग मला नको आतां विसरूं बरें ! माझी

आठवण रहावी, म्हणून हें जें कांहीं तुला मी देत्यें, त्याचा अव्हेर नको करूं!'

असें बोलून दासीला हाक मारून तिनें कांहीं तिला सांगितलें. आज्ञेप्रमाणें दासी हस्तिदंताच्या तबकांत रत्नालंकार घेऊन आली. आयेषेनें दासीला तेथून जाण्यास सांगितलें, आणि ती आपल्या हातांनीं त्या ताटांतील अलंकार घेऊन ते तिलोत्तमेच्या अंगावर घालूं लागली.

तिलोत्तमा जरी एका धनाढ्य जाहागिरदाराची कन्या होती, तरी देखील त्या अलंकारांची अद्भुत कारागिरी आणि त्यांतील अमूल्य हिरे वगैरे रत्नांचें विलक्षण तेज पाहून तिला आश्चर्य वाटलें. वस्तुतः आयेषेनें बापानें दिलेले डागिने मोडवून तिलोत्तमेकरितां, दुसऱ्या कोणाला मिळण्याला कठीण, असे हे सर्व रत्नालंकार तयार करवून ठेविले होते. ते दागिने पाहून तिलोत्तमा त्यांची स्तुति करूं लागली. आयेषा म्हणाली, 'भगिनी, ह्यांची कांय स्तुति करत्येस? तूं आज जें रत्न धारण केलें आहेस त्यांच्या पायाच्या धुळीच्या एका कणाचीही ह्या दागीन्यानें बरोबरी होणार नाहीं,' असें बोलत असतां तिचे डोळे असवांनी भरून आले. तीं आंवरावयास तिला किती श्रम पडले हें बिचाऱ्या तिलोत्तमेला कोठून कळणार?

अलंकार घालणें झाल्यावर तिचे दोन्ही हात आपल्या हातांत धरून ती तिच्या मुखाकडे पाहूं लागली व मनांतल्यामनांत विचार करूं लागली कीं, 'हें सरलप्रेमप्रतिममुख पाहून मला वाटतें कीं, प्राणेश्वरांच्या मनास कधींही खेद होणार नाहीं. जर विधात्याची दुसरी कांहीं

इच्छा नसेल तर त्याच्या चरणापाशीं माझी एवढीच विनंति आहे कीं, हिच्या संगतीनें त्यांना नेहमीं सुख होवो!'

नंतर ती तिलोत्तमेला म्हणाली, 'तिलोत्तमे! मी आतां जात्यें. तुझे पतिराज आतां गडबडींत असतील, त्यांच्या भेटीला मी गेलें असत्यें, पण उगाच उशीर मात्र होईल. जगदीश्वर तुम्हां दोघांना दीर्घायु करो! मी जे अलंकार दिले आहेत, ते अंगावर घालीत जा. आणखीं माझें-तुझें जें मुख्य रत्न तें आपल्या हृदयमंजूषेंत जपून ठेव.'

'तुझें जें मुख्य रत्न' असें म्हणतां म्हणतां आयेषेचा गळा दाटून आला. तिलोत्तमा पाहते तों आयेषेचे नेत्र-पल्लव पाण्याच्या ओझ्यानें दबून जाऊन कांपत आहेत!

तिलोत्तमेनें समदुःखिनीप्रमाणें, 'अशा कां बरें रडतां?' इतकें विचारतांच आयेषेच्या डोळ्यांतून असवांचा लोट वाहूं लागला.

आयेषा तेथें एक क्षणही न थांबतां फारच जलदीनें वाड्याच्या बाहेर पडली व आपल्या मेण्यांत जाऊन बसली.

आयेषा आपल्या घरीं येऊन पोंचली तों रात्र पडली होती. ती आपला पोषाख बदलून खिडकीशीं गार वारा खाण्यासाठीं येऊन उभी राहिली. त्यावेळीं तिनें सोडून टाकलेल्या वस्त्रांपेक्षां अधिक कोमल अशा नीलवर्णाच्या गगनमंडळांत असंख्य तारे चमकत होते; मंदमंद अशा वाऱ्याच्या झुळकांबरोबर अंधेरांतील झाडांच्या पानांचा आवाज ऐकूं येत होता, व किल्ल्याच्या शिखरावर घुबड हकूहकू व गंभीर आवाज करीत होते. समोर किल्ल्याच्या तटाच्या बुडाशीं जेथें ती उभी होती, त्याच्याच खालच्या भागीं

पाण्यानें भरलेल्या त्या किल्ल्याच्या खंदकांत शांत असें आकाशाचें प्रतिबिंब पडून राहिलें होतें.

आयेषेनें खिडकींत बसून पुष्कळ वेळ विचार केला; तिनें आपल्या बोटांतून एक अंगठी काढिली. त्या अंगठींत विष घातलेलें होतें. 'तींतील विष एकदांचें पिऊन जाऊन सर्व दुःखांतून मुक्त व्हावें' असेंही तिला त्यावेळीं वाटूं लागलें. पुनः तिनें विचार केला कीं, 'विधात्यानें हेंच करण्यासाठीं कां मला संसारांत घातलें आहे? त्यानें जर मला ह्या संसारांत घातलें आहे, तर मला ह्या संसारांतील दुःखें जर काढवलीं नाहींत तर मी बायकोचा जन्म तरी कशाला घेतला? बरें जगत्सिंहांच्या जर हें कानावर गेलें तर ते तरी काय म्हणतील?'

पुनः ती अंगठी तिनें बोटांत घातली. आणखी तिनें कांहीं विचार केला व पुनः ती अंगठी काढिली. पुनः तिनें विचार केला कीं, 'हा लोभ आवरणें हें बायकांना असाध्य आहे; म्हणून ह्या लोभमूलक वस्तूचाच . [illegible] करावा हेंच चांगलें.'

अस[illegible] आयेषेनें ती [illegible] काढलेली अंगठी किल्ल्या-भोंवतालच्या खंदकांत फे[illegible]

